


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)








महाराष्ट्र शासन

मराठी भाषा विभाग

**राज्य मराठी विकास संस्था**

एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,

धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६

संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

## दि वा ळी वि शे षां क

वर्ष ३७ । अंक २–३ । नोव्हेंबर–डिसेंबर १९८३
किंमत १५ रुपये । वार्षिक वर्गणी ३० रुपये



अध्यक्ष व विश्वस्त
तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

संपादक
मे. पुं. रेगे

संपादकीय पत्रव्यवहार :
मे. पुं. रेगे,
संपादक, ' नवभारत ' मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई–४१२ ८०३ (जि. सातारा)

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
श्री. ग. दीक्षित,
व्यवस्थापक, ' नवभारत ' मासिक,
द्वारा : दी प्राज्ञ प्रेस, वाई–४१२ ८०३.
( जि. सातारा )

मुखपृष्ठ :
विलास सिदकर

' नवभारत'चे लेखक, वर्गणीदार, वाचक, जाहिरातदार व हितचिंतक यांना दिवाळी व नूतन वर्षानिमित्त हार्दिक शुभेच्छा !

या नियतकालिकाच्या प्रकाशनार्थ महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाकडून अनुदान मिळाले आहे.

अनुक्रमणिका








# नवभारत १९८३

**दि वा ळी वि शे षां क : देशापुढील काही ज्वलंत समस्या ????**


## अ नु क्र म



$ एकाच विषयावरील वेगवेगळ्या अंगांनी लिहिलेले हे तीन लेख.

## लेखक-परिचय

■ **तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी :** विद्वान, विचारवंत, लेखक व मराठी विश्वकोशाचे प्रमुख संपादक, वाई–४१२ ८०३. ■ **वसंत नगरकर :** स्वातंत्र्यसैनिक; इस्लाम धर्माचे तसेच विविध राजकीय प्रश्नांचे व्यासंगी अभ्यासक; सेवानिवृत्त पोलिस अधिकारी; प्लॉट क्र. ५८, सेक्टर २५; पिंपरी–चिंचवड नवनगर; सिंधुनगर, निगडी, पुणे–४११ ०३५. ■ **सुहास पळशीकर :** राज्यशास्त्राचे प्राध्यापक, सर परशुरामभाऊ कॉलेज, पुणे–३०; २४/३ यशदा, स्वप्नमंदिर, एरंडवणा, पुणे–४. ■ **प्र. म. बांदिवडेकर :** रामनारायण रुइया कॉलेज, माटुंगा येथे राज्यशास्त्राचे प्राध्यापक; तसेच विविध सामाजिक–राजकीय समस्यांचे साक्षेपी अभ्यासक; ४६/१५८१, सुभाषनगर, चेंबूर, मुंबई–४०० ०७१. ■ **मे. पुं. रेगे :** विद्याभारती, पुणे–२९ या संस्थेच्या गो. ध. पारीख शैक्षणिक अभ्यासकेंद्र, मुंबई–९८ या शाखेचे प्रमुख; रागिणी, साहित्य सहवास, बांद्रे (पूर्व), मुंबई–५१. ■ **ना. र. इनामदार :** लो. टिळक प्राध्यापक व प्रमुख, राज्यशास्त्र व लोकप्रशासनविभाग पुणे विद्यापीठ, विविध नियतकालिकांतून व्यासंगी लेखन. ■ **सुनील आडगांवकर :** नेताजी सुभाषचंद्र बोस कॉलेज, नांदेड येथे प्राध्यापक,नांदेड. ■ **सुनीती पुंगलिया :** स्त्रीमुक्ती चळवळीतील एक आघाडीच्या कार्यकर्त्या; स्त्रीमुक्तीचे कार्य करणाऱ्या लीग फॉर सोशल जस्टिस ह्या समाजप्रबोधक संस्थेच्या अध्यक्षा; समाजशास्त्र व सामाजिक मानसशास्त्र ह्या विषयांत लंडन विद्यापीठाची बी. एस्सी. पदवी; बार-ॲट-लॉ; कौटुंबिक प्रश्नांवर गेली काही वर्षे मोफत कायदेशीर सल्ला देणाऱ्या केंद्राच्या चालक; समर व्हिला, भोसलेनगर, गणेशखिंड पुणे–४११ ००७. ■ **सत्यरंजन साठे :** प्राचार्य, आय. एल. एस. लॉ कॉलेज, पुणे. ■ **दिगंबर रघुनाथ राणे :** प्रमुख, अर्थशास्त्र विभाग व पदव्युत्तर शिक्षण संशोधन केंद्र, कला, वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय, शिरपूर (जि. धुळे). ■ **प्रभाकर पाध्ये :** मराठी साहित्यिक, सौंदर्यमीमांसक, पत्रकार व विचारवंत; ३ कमलबाग, गोखले रोड, चतुःशृंगी, पुणे–१६. ■ **सय्यद नईमुद्दीन :** सेवानिवृत्त प्राचार्य, विदर्भ महाविद्यालय, अमरावती; भाषासाहित्याचे, फार्सीचे व्यासंगी; इन्सार हाऊसजवळ, इंकैय्यापुरा; अमरावती कँप, अमरावती–४४४ ६०२.



अनुक्रमणिका

## संपादकीय

### धैर्य दे !

देशाच्या आजच्या स्थितीचा सर्वांगीण आढावा घेणे हा ह्या अंकाचा उद्देश नाही. देशापुढील काही समस्यांचे विवेचन करणे एवढाच त्याचा मर्यादित हेतू आहे.

देशाची आजची स्थिती निराशाकारक किंबहुना भयभीत करील अशी आहे, यात शंका नाही. ह्या परिस्थितीतही ज्यांच्यापासून काही धीर घेता येईल अशा गोष्टीही देशात आढळतात.

देशाची राजकीय एकता टिकवून धरणे, भारतीय संघराज्याची चौकट सुरक्षित ठेवणे हे भारतीय समाजाचे आजचे कदाचित सर्वांत महत्त्वाचे ठरेल असे उद्दिष्ट असले पाहिजे. ह्या एकतेला मोठा आणि साक्षात धोका आज निर्माण झाला आहे असे नाही. परंतु खलिस्तानचे आंदोलन, आसामची समस्या यांमुळे ह्या उद्दिष्टाच्या महत्त्वाची जाणीव अधिक तीव्र झाली आहे यात शंका नाही. सुदैवाने भारतीय एकतेला प्राचीन सांस्कृतिक-सामाजिक परंपरेचा मजबूत आधार आहे. ह्या परंपरेविरुद्ध दलित इ. बंड करून उठले असले—आणि हे बंड स्वागतार्ह आहे— तरी राजकीय एकतेचे हे खरे अधिष्ठान आहे. भारतीय समाजाची अस्मिता (आयडेन्टिटी) ह्या परंपरेवर आधारलेली आहे. बंड घरगुती आहे. ही परंपरा हिंदू आहे. (केवळ वैदिक, ब्राह्मणी इ. नाही.) तिच्यात अनेक धागे मिसळलेले आहेत. ह्या परंपरेत जे समाज अंतर्भूत होतात ते फुटून जाणार नाहीत. त्यांची फुटण्याची भाषा वैतागाची असते.

दुर्दैवाने इस्लामी संस्कृतीला पचविण्याचे बौद्धिक सामर्थ्य या परंपरेने दाखविले नाही. ह्या दुबळेपणाचे कारण ज्याप्रमाणे ह्या परंपरेत होते, त्याप्रमाणे इस्लामी संस्कृतीच्या वैशिष्ट्यातही होते. तरीही भारतीय मुसलमानावर ह्या परंपरेचा स्पष्ट छाप आहे.

हिंदू परंपरेचे भक्कम अधिष्ठान ह्या देशाच्या एकतेला आहे ही उघड गोष्ट मान्य करायला अनेकजण कचरतात, ही कुतूहलजनक गोष्ट आहे. त्यांना कदाचित असे म्हणायचे असेल, की हे अधिष्ठान पुरेसे नाही. किंबहुना ह्या परंपरेवर आधारलेल्या समाजाचे आधुनिक राष्ट्रात रूपांतर केले नाही, तर ही परंपरा घातक ठरेल. हे म्हणणेही पूर्णपणे सत्य आहे. व्यक्तीची स्वायत्तता आणि प्रतिष्ठा, समता, सामाजिक बंधुभाव या मूल्यांवर आधारलेल्या आधुनिक राष्ट्रात या प्राचीन समाजाचे रूपांतर करणे ही आपली ऐतिहासिक जबाबदारी आहे. ह्या आधुनिकीकरणातूनच हिंदू-मुस्लिम भांडण किंवा जातिजातींतील कलह यांना शांती देता येईल. सुदैवाने आधुनिक मूल्ये आणि आधुनिक विचार पचविण्याचे असाधारण सामर्थ्य हिंदू परंपरेत वाढलेल्या व्यक्तींनी आणि समूहांनी दाखविले आहे. हे आपले बलस्थान आहे. भारतीय राज्यघटनाच याची ग्वाही देते.

आज 'खालच्या' जाती, दलित स्त्रिया इ. जागे झाले आहेत. समतेवर आधारलेला सामाजिक न्याय प्रस्थापित होईपर्यंत त्या स्वस्थ राहणार नाहीत. आतापर्यंत आपापले कसब आणि कारागिरी, प्रतिकूल परिस्थितीत जगण्यातून आलेले खोल शहाणपण आणि माणुसकी हा आपला परंपरागत वारसा घेऊन त्या आपापल्या जागी जगत होत्या. आता त्या भारतीय समाजात ही सारी कमाई घेऊन, मोकळ्या होऊन सर्वत्र संचार करणार आहेत, सर्व सर्वांत मिसळणार आहेत. ह्यातून जे चैतन्य आणि ज्या शक्ती उफाळून येणार आहेत त्या मानवी इतिहासात अभूतपूर्व ठरतील.








अनुक्रमणिका

आज राजकारणाची कोंडी झाली आहे आणि भ्रष्टाचाराने सर्व जीवन नासले आहे. पण गुंड लोक, भ्रष्टाचारी म्हणून ज्यांना सर्वजण ओळखतात असे लोक, राजकारणात यशस्वी का होतात, सर्वसामान्य लोक त्यांना बहुसंख्येने का निवडून देतात, सत्ता त्यांच्या हाती का सोपवितात याचाही आपण विचार केला पाहिजे. भीतीमुळे ? पैशाच्या लालचीने ? ही उत्तरे अपुरी ठरतील. कदाचित आजच्या एकंदर परिस्थितीत तेच समर्थ ठरतात, काही घडवून आणू शकतात, लोकांना जे पाहिजे आहे ते काही प्रमाणात तरी त्यांच्या पदरी घालू शकतात आणि उलट, जी चांगली माणसे असतात ती स्वच्छ राहतात, भ्रष्टाचाराचा निषेध करतात पण काही बांधू शकत नाहीत, लोकांच्या पदरात काही घालू शकत नाहीत असा लोकांचा अनुभव असेल. मग स्वच्छ लोकांना घाण साफ करण्यासाठी घाणीत हात घालायला शिकावे लागेल

लोकांच्या आशाआकांक्षांना आता राजकीय महत्त्व आहे. ह्या आशा-आकांक्षांचे प्रतिनिधित्व करण्याने, त्यांचे समाधान करण्याचे आश्वासन देण्याने आणि त्यांचे प्रत्यक्षात समाधान करण्याने किंवा समाधानाचा प्रयत्न करण्याचा भास निर्माण केल्याने सत्ता मिळते. लोक सोशिक आहेत, व्यवहारी आहेत, व्यवहारात ते स्वप्नांच्या मागे लागत नाहीत, वास्तवावरची त्यांची पकड, शक्य काय आहे याविषयीचे त्यांचे भान पक्के आहे, हे निवडणुकांच्या निकालांनी सिद्ध केले आहे. वास्तव पर्यायांमधून शहाणपणाने ते निवड करतात. जनतेचा हा राजकीय शहाणपणा हेही भारतीय लोकशाहीच्या सामर्थ्याचे एक स्थान आहे.

ह्या अंगभूत शहाणपणाला राजकीय शिक्षणाची जोड द्यावी लागेल. लोकांच्या अर्धस्फुट आकांक्षा स्वच्छ स्वरूपात त्यांच्यापुढे मांडाव्या लागतील, त्यांचे खरेखुरे समाधान करायचे तर कोणता आर्थिक–सामाजिक कार्यक्रम आखून पार पाडावा लागेल, त्याची कोणाकोणाला किती आणि कोणत्या प्रकारची किंमत मोजावी लागेल हे त्यांच्यापुढे स्पष्ट करावे लागेल. म्हणजे आजचे फसवेगिरीचे किंवा केवळ निषेधाचे राजकारण वास्तव आणि विधायक राजकारणाचे पर्व सुरू होईल. कृती घोषणांची जागा घेईल.

उच्चशिक्षित तरुण देश सोडून पाश्चात्त्य देशांत वसती करायला वीस वर्षांपूर्वी जात, त्यापेक्षा आज अधिक जातात. पण मागासलेल्या जातिजमातींशी एकरूप होऊन त्यांना जागृत। आणि संघटित करण्यासाठी, त्यांचे लढे लढण्यासाठी वीस वर्षांपूर्वी जेवढे उच्चशिक्षित, शिक्षित-अशिक्षित तरुण पुढे येत, त्यापेक्षा आज कितीतरी अधिक येतात. जागजागी कामे करणारे हे तरुण आणि तरुणी आमच्या समाजाचे आशास्थान आहे. स्वातंत्र्याच्या चळवळीचा उन्माद ओसरल्यानंतर ते जाणीवपूर्वक पुढे आले आहेत. त्यांचे इमान ह्या देशाच्या भवितव्याशी आहे. ते आमच्या जीवनाचे मीठ आहेत.

खेद करण्यासारखे, लज्जा बाळगण्यासारखे, निराश होण्यासारखे खूप आहे. पण ज्याच्या आधारे आशा बाळगावी, धीर धरावा, अभिमान वाटावा असेही खूप आहे.

दारुण विप्लव माझे
तव शंखध्वनि गाजे, संकटदुःखत्राता ।



# वाढता हिंसाचार

## तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

भारतात स्वातंत्र्यप्राप्तीनंतरच्या गेल्या ३६ वर्षांच्या कालखंडात राजकीय हिंसाचारावाचून एकही वर्ष गेलेले दिसत नाही. भारतात सत्तांतर झाले, ते शांततेच्या मार्गाने. परंतु सत्तांतर होत असताना भारत आणि पाकिस्तान असे जे विभजन झाले त्या विभजनाच्या प्रक्रियेत सत्ता प्राप्त करणाऱ्या दोन धार्मिक समाजांमध्ये आपसात भयानक व अतोनात हिंसाचार घडून आला. परंतु हे सत्तांतर होताना ज्यांच्या हातांतून सत्ता भारतीय जनतेस प्राप्त झाली त्यांचे हात आणि सत्ता स्वीकारणारे भारताचे हात सत्तांतरकाळी अगदी स्वच्छ होते.

भारताची स्वतंत्र घटना अमलात आल्यानंतर प्रादेशिक राज्ये व केंद्रसत्ता यांच्यांत विग्रह निर्माण होऊ लागले. या विग्रहांचे दोन प्रकार आहेत. एक प्रकार म्हणजे भारतातून फुटून सार्वभौम सत्ता मिळविण्याच्या आकांक्षेने उत्पन्न झालेले विग्रह आणि प्रदेशराज्यांच्या स्वाधिकारामध्ये वाढ व्हावी या इच्छेने घडणारे विग्रह. असे दोन प्रकारचे विग्रह सध्या चालू असून त्यांत राजकीय हिंसाचार अधूनमधून उफाळून येतो. भाषावार प्रांतरचनेच्या संदर्भातही विग्रह पेटले. परंतु भाषावार प्रांतरचनेचे तत्त्व केंद्रसत्तेस सामान्यतः मान्य होते व त्याकरिता आयोगही नेमला व त्या आयोगाचे निर्णय सर्वत्र अमलातही आणले. त्यात अनेक दोष राहिले, त्याकरिता झगडेही झाले; अंशतः अजून चालू आहेत. परंतु तो विषय बराच मागे पडला आहे. भारतीय सार्वभौम सत्तेस नकार देणारा, स्वायत्ततेसाठी संघर्ष करणारा प्रदेशवाद फार मर्यादित स्वरूपाचा आहे. उदा., नागालँडमध्ये आणि (द्रविड मुन्नेत्र कळघम् या प्रादेशिक पक्षनेतृत्वाखाली) तामिळनाडूमध्ये भारतीय सार्वभौम सत्तेस आव्हान देणारा संघर्ष निर्माण झाला. परंतु तो आता थंडावला आहे. तामीळनाडूमध्ये तो पूर्णपणे थंडावला आहे आणि नागालँडमध्ये बीजरूपानेच तो शिल्लक आहे. परंतु हिमालयातील ईशान्य दिशेतील प्रदेशांमध्ये (उ. मिझोराम) ख्रिश्चन पाद्र्यांच्या प्रचारातून भारतापासून फुटून निघण्याची प्रवृत्ती बळावत असून त्यात लाल डेंगासारखे प्रादेशिक नेते सशस्त्र उठावाचा प्रयत्न करीत असतात. तसेच भारतातून फुटून वेगळे पंजाबचे स्वायत्त राज्य स्थापन करण्याकरिता उठाव करणारे अल्पसंख्याक लोक पंजाबमध्ये दिसू लागले आहेत. त्यांच्या त्या चळवळीला 'खलिस्तान चळवळ' असे म्हणतात. परंतु सर्वसाधारण पंजाबी जनतेचा किंवा अकाली शिखांचा या खलिस्तान चळवळीला विशेषसा पाठिंबा मिळू शकत नाही. ही फाळणीची प्रवृत्ती वाढीस लागण्याचा धोका सत्ताधारी पक्ष बोलून दाखवत आहे. विशेषतः कर्नाटक, आंध्र, तमिळनाडू इ. प्रदेशराज्ये काँग्रेस (आय्) च्या अधिसत्तेपासून मुक्त झाल्यानंतरच्या काळात अधिक अधिकारांची मागणी जोराने सुरू झाली आहे. केंद्रसत्तेला या मागणीत फाळणीच्या मागणीचा वास येतो. पण हा वास म्हणजे केंद्रीय सत्तेची केवळ बतावणी आहे. अधिक अधिकारांच्या मागणीने केंद्रसत्ता दुबळी होईल, अशी भीती व्यक्त होते; पण ती अनाठायी आहे.

राजकीय हिंसाचार हा गेल्या तीन–चार वर्षांत आसाममध्ये वारंवार घडून येत आहे व तो प्रश्न सुटेपर्यंत तो थांबणार नाही. हा हिंसाचार उभयपक्षी घडत आहे. सत्ताधारी पक्षाने प्रादेशिक राज्याच्या निवडणुका खऱ्याखुऱ्या आसामी जनतेवर लादून भल्याबुऱ्या मार्गाने स्वपक्षीय सत्ता निर्माण केली. ही निर्माण करीत असताना सत्ताधारी पक्षानेच फार मोठ्या प्रमाणात कत्तली केल्या, अशा तऱ्हेचा आरोप आसामी जनतेच्या खऱ्याखुऱ्या लढाऊ संघटनांनी सत्ताधारी पक्षावर केला आहे. आणि हा आरोप खरा आहे, अशी तेथे निर्वाचनाच्या कालखंडात प्रत्यक्ष उपस्थित असलेल्या विदेशी वार्ताहरांनी ग्वाही दिली आहे. परप्रांतीय आणि विशेषतः लाखो विदेशी नागरिकांच्या गटाने आसामचा विस्तृत प्रदेश व्यापला आहे आणि ते तेथे खरेखुरे नागरिक म्हणून मिसळून गेले आहेत; परंतु तेथील नैसर्गिक नागरिकांशी ते कोणत्याही प्रकारे, समरस होऊ शकत नाहीत. विशेषतः भाषिक व सांस्कृतिक






रूपाने पूर्वीचा पूर्व पाकिस्तान व आजचा बांगला देश यामधून जनतेचे मोठमोठे लोंढे ३०–३५ वर्षे आसाममध्ये शिरत आहेत आणि नागरिकहक्क भोगत आहेत. तेथील खऱ्याखुऱ्या नैसर्गिक नागरिकांना या परकीयांना संपूर्ण हाकलून देण्याची गरज भासत आहे. त्यामुळे त्रिपक्षीय राजकीय हिंसाचार तेथे अटळ ठरत आहे. त्रिपक्ष म्हणजे सत्ताधारी पक्ष, परकीय लोक आणि स्थानिक लोक हे होत.

आज पंजाब पेटला आहे. भारतातले पंजाब हे आर्थिक दृष्टया पुढारलेले प्रदेशराज्य असूनही तेथील असंतोष हिंसाचारी बनला आहे. अकाली शिखांच्या धर्मगुरूंनी या पंजाबी आंदोलनाचे नेतृत्व स्वीकारले आहे, त्यामुळे या आंदोलनातील द्वेषाची आणि आणि त्वेषाची भावना अधिक तीव्र बनली आहे. त्याचे केवळ शुद्ध राजकीय स्वरूप राहिले नाही. हिंदू विरुद्ध शीख असेही विपर्यस्त रूप या आंदोलनास आले आहे. धर्मगुरूंचे नेतृत्व नसते, तर पंजाब विरुद्ध केंद्रसत्ता यांचा हा खराखुरा राजकीय संघर्ष होय, असे निश्चितपणे म्हणता आले असते. खरोखर खोलात जाऊन पाहिले असताना पंजाब विरुद्ध केंद्रसत्ता यांच्यांतलाच हा तंटा आहे, असे निश्चितपणे म्हणता येते.

हिंदू आणि शीख यांच्यामध्ये अनेक शतके सामाजिक समरसता सतत राहिली आहे. शिखांच्या सुवर्ण मंदिरात दर्शन घेण्याकरता हिंदूंची शिखांपेक्षा अधिक गर्दी होत असलेली शतकानुशतके लोक पाहत आले आहेत. गेल्या शतकातील भारताच्या सांस्कृतिक राष्ट्रवादामध्ये गुरू नानकांपासून तो गुरू गोविंदसिंगांपर्यंतच्या गुरूंच्या पराक्रमाचे गुणगान केले जात होते. पंजाबी भाषा बोलणारे हिंदू फार मोठ्या प्रमाणात पंजाबमध्ये आढळून येतात. शिखांची धार्मिक अस्मिता ही हिंदूंच्या धार्मिक अस्मितेशी यत्किंचितही तत्त्वतः विसंगत नाही. गुरुपूजा ही साधना शीख धर्माला हिंदुधर्मापासून प्राप्त झाली आहे. 'ओं', 'सत्' हे परमेश्वराचे निर्देश भगवद्गीतेने शीखधर्माला दिले आहेत. ग्रंथसाहेब या शिखांच्या मुख्य पवित्र ग्रंथात संत नामदेवांच्या ६७ पदांचा समावेश होतो; हे सर्व लक्षात घेतले म्हणजे हा हिंदुधर्माचाच एक सुधारलेला पंथ आहे हे मानावे लागते. आणखी असे, की पंजाबातील हिंदू आणि शीख या दोघांनीही पंजाबच्या आर्थिक विकासात एकमेकांशी पूर्ण सहकार्य केलेले पदोपदी अनुभवास येते.

परंतु गेल्या तीन वर्षांत, विशेषतः प्रकाशसिंग बादल यांचे अकाली दलाच्या पाठिंब्यावर उभारलेले शासन एप्रिल १९८० मध्ये बरखास्त करण्यात आले तेव्हापासून पंजाब पेटू लागला; हिंदू व शीख यांच्यांत बेबनाव सुरू झाला. दरबारासिंग यांच्या नेतृत्वाखाली इंदिरा कॉंग्रेसचे शासन जून १९८० मध्ये निर्माण झाले व तेव्हापासून अकाली दलाच्या नेतृत्वाखाली उठाव सुरू झाले. १९८१ च्या मध्यापर्यंत २५ हजारांपेक्षा अधिक अकालींची धरपकड झाली. पंतप्रधान गांधींकडे शिखांनी ४५ मागण्या मांडल्या. त्याबरोबरच चंदीगढ येथील 'खालसा दिवाण' या संघटनेतर्फे गंगासिंग धिलन या नेत्याने वेगळ्या शीख राष्ट्राच्या स्थापनेची चळवळ सुरू केली. शिखांच्या मागण्यांचे दोन प्रकार–धार्मिक व राजकीय–आर्थिक म्हणजे इहवादी. शीख हे शस्त्रपूजक आहेत. भारतात नागरिकाला परवान्याशिवाय शस्त्र धारण करता येत नाही; परंतु शिखांनी कृपाण हे शस्त्र धार्मिक चिन्ह म्हणून कायम बाळगण्याचा आग्रह धरला. धार्मिक मागण्यांमध्ये अमृतसर हे शिखांचे पवित्र नगर म्हणून केंद्राने मान्य करावे, या मागणीचा प्रामुख्याने अंतर्भाव आहे. भारतात शिखांची शेकडो गुरुद्वारानामक धार्मिक मंदिरे आहेत; त्यांच्यांत शासकीय अधिकाऱ्यांना प्रवेशाची बंदी आहे. धार्मिक नेत्यांच्या संमतीशिवाय शासकीय अधिकाऱ्याने या धार्मिक मंदिरांत प्रवेश करता कामा नये, अशीही मागणी त्यात अंतर्भूत आहे. सुवर्णमंदिर किंवा अन्य गुरुद्वारानामक मंदिरे यांच्याजवळ तंबाखू, सिगरेट, विड्या, दारू इत्यादिकांची दुकाने असता कामा नयेत, अशा प्रकारच्या विविध मागण्यांची जंत्री शीख नेत्यांनी सादर केली. त्यांतील बहुतेक मागण्या केंद्र शासनाने मान्य केल्या. परंतु केंद्र शासन विरुद्ध शीख, असा विग्रह सतत प्रकोपास जात आहे. रायफली, पिस्तुले, बॉंब यांचा वापर करून सशस्त्र कायदेभंग मधून मधून उफाळून येतो. त्याचा प्रतिकार प्रथम प्रदेश–राज्य शासन करीत राहिले, आता राष्ट्रपती–राजवट करू लागली. त्यामध्ये अनेक शिखांचे, विशेषतः जहाल




स्वयंसेवकांचे मुडदेही पडत आहेत; पोलिसांच्याही हत्या होत आहेत. १९८० पासून एप्रिल १९८३ पर्यंतच्या कालावधीत केंद्र सरकार आणि अकाली दलाचे नेते यांच्यामध्ये वारंवार तडजोडीकरता व समेटाकरता बैठकी होत आहेत; परंतु समेट दुरावतच आहे.

शीख अनुयायी आणि शीख नेते यांचे तीन गट पुढे आले आहेत. संत जरनेलसिंग भिंद्रनवाले हे जहाल नेते पुढे आले असून ते शीख आणि हिंदू यांच्यामधील दुफळी वाढवीत आहेत; नानकनिवासामध्ये सशस्त्र बंदोबस्तात राहून या हिंसक चळवळीचे नेतृत्व परिणामकारक रीतीने करीत आहेत. मध्यममार्गी पण एक प्रकारचे लढाऊ नेतृत्वही करणारे इतर नेते पुढे आले आहेत. हरचनसिंग लोंगोवाल हे या मध्यममार्गीयांचे प्रमुख होत. शिखांचे नेमस्त नेतृत्व हे आता मागे पडले आहे.

आर्थिक दृष्टीने अत्यंत महत्त्वाची मागणी म्हणजे सतलज आणि बिआस या नद्यांच्या पाणी–वाटपासंबंधी आहे. पंजाब आणि हरयाणा हे दोन प्रदेश एकत्र असताना या एकत्रित पंजाबने शेतीच्या क्षेत्रात हरितक्रांती केली. आता हरयाणा हे प्रदेशराज्य वेगळे झाले आहे. एकेकाळी हरयाणा पंजाबचा भाग असल्यामुळे या पाणी–वाटपामध्ये हरयाणाची उपेक्षा करून भागणार नाही; पंजाबची पाणी–मागणी ही नैसर्गिक तत्त्वावर आधारलेली आहे. म्हणून ती मोठ्या प्रमाणावर मान्य व्हायला पाहिजे. चंदीगढ हे नगर मुळात पंजाबकरता उभारले गेले. ते पंजाबला मिळायला पाहिजे. पाण्याचा आणि चंदीगढचा प्रश्न निकालात लागला, तर हा पंजाबचा व केंद्राचा विग्रह किंवा झगडा शांत होण्यास वेळ लागणार नाही, असे तटस्थ राजकीय निरीक्षकांचे मत आहे.

पंजाबचा प्रश्न समाधानकारक रीतीने सोडवणे हे भारताच्या सुरक्षिततेच्या दृष्टीने अत्यंत आवश्यक आहे. शीख ही नाणावलेली लढाऊ जमात आहे. ही जमात शस्त्रपूजक आहे. सशस्त्र युद्ध म्हणजे धर्मयुद्ध होय, अशी त्यांची श्रद्धा आहे. म्हणून हा पंजाबमध्ये सुरू असलेला सशस्त्र चढाऊ गटांचा ' मोर्चा ' शक्य तितक्या लवकर विसर्जित होणे नितान्त आवश्यक आहे. कारण पंजाबची सरहद्द पाकिस्तानशी मिळालेली आहे. पाकिस्तानची शस्त्रसज्जता प्रचंड प्रमाणात चालू आहे. पाकिस्तानातील जनतेचा असंतोष तेथील लष्करी राजवटीविरुद्ध भडकत आहे. तो शांत करण्यास भारताशी युद्ध पुकारणे हे आजच्या लष्करी सत्तेच्या दृष्टीने आवश्यक ठरू शकते, या गोष्टीकडे केंद्रनेतृत्वाने दुर्लक्ष करता कामा नये. प्रादेशिक राज्यांचा प्रश्न त्यांच्या अधिक अधिकारांच्या युक्त मागण्या मान्य करून चांगल्या रीतीने सुटू शकतो. वस्तुतः प्रदेशराज्ये तत्त्वतः भिन्न भिन्न राष्ट्रेच. ब्रिटिश सार्वभौम अधिसत्ता १५० वर्षे नांदली, म्हणूनच ही भाषिक प्रदेशराज्ये स्वतंत्र राष्ट्रे म्हणून अस्तित्वात आली नाहीत. युरोपचा नकाशा पाहिला असताना एकेक भाषिक प्रदेश म्हणजे एकेक राष्ट्र म्हणूनच दृष्टोत्पत्तीस येते. हे लक्षात घेऊन प्रादेशिक राज्यांच्या अधिक अधिकारांच्या मागण्या समंजसपणे मान्य केल्या पाहिजेत. त्यामुळे प्रादेशिक अहंकारातून निर्माण होणारा राजकीय हिंसाचार समाप्त होणे अत्यंत शक्य आहे.

पाकिस्तानच्या निर्मितीनंतर जवळजवळ एक दशांश किंवा त्यापेक्षा अधिक मुसलमान लोकसंख्या स्वतंत्र नागरिकत्वाच्या हक्काने भारतात नांदत आहे. भारताशिवाय अन्यत्र कोणत्याही मुसलमान देशातल्या मुसलमानाला असे स्वतंत्र नागरिकत्वाचे हक्क उपलब्ध नाहीत. ही गोष्ट येथील मुसलमान नागरिकांच्या मनात बिंबलेली दिसत नाही. लोकशाही जीवनपद्धतीचा नागरिक-स्वातंत्र्य हा पाया आहे. हिंदू नेत्यांनी याच तत्त्वावर स्वातंत्र्याचा लढा लढविला; मुसलमान नेत्यांनी मात्र या तत्त्वाची दखल घेतली नाही. म्हणून भारतीय मुसलमानही बाकीच्या मुसलमानांप्रमाणे अजून मध्ययुगीन धार्मिक अलगतेच्या आहारी गेलेला दिसतो. त्यामुळे हिंदू–मुसलमानांचे आपसातले हत्याकांड कायम विराम पावलेले दिसत नाही. धार्मिक–सामाजिक अहंता ही आत्मरक्षणाच्या दृष्टीने आणि आत्मविश्वासाच्या दृष्टीने काही काळपर्यंत अजून आवश्यक आहे असे जरी मानले, तरी ही अस्मिता आक्रमक होण्याचे कारण नाही. त्यात उभयपक्षी धोके उत्पन्न होतात आणि राष्ट्रीय एकात्मतेच्या अभावी सहकार्याच्या योगाने प्राप्त होणारे विकासाचे फायदे मिळू शकत नाहीत.

अनुक्रमणिका

शेवटचा परंतु अत्यंत महत्त्वाचा प्रश्न म्हणजे दलित आणि दलितेतर यांच्या सामाजिक सामरस्याचा, लक्षात घ्यावा लागतो. सवर्ण किंवा स्पृश्य जमाती अस्पृश्यांच्या घरादारांवर, स्त्रियांवर मधून-मधून काही निमित्त उद्भवून मनमुराद हिंसाचार करीत असतात. प्रत्येक गावात आणि शहरात, तालुक्यात आणि जिल्ह्यात अस्पृश्य दलित हे अल्पसंख्यच आहेत. ग्रामीण भागातील स्पृश्य किंवा सवर्ण हे नेहमीच शिरजोरपणाने वागत असतात व दलितांना व त्यांच्या स्त्रियांना आणि मुलाबाळांना-देखील वेठीस धरून राबवितात. अशा स्थितीत दलितांनी आत्मरक्षणार्थ विरोध किंवा प्रतिकार केला, तर त्यांच्या हत्या करण्यास आणि त्यांची घरेदारे जाळण्यासही स्पृश्य व सवर्ण मागेपुढे पाहत नाहीत. हा दलितांवरील हिंसाचाराचा प्रश्न सोडवणे हे स्थानीय राजकीय नेत्यांच्या अखत्यारीत आहे. परंतु अडचण अशी आहे, की मते साठवणारी त्यांची बँक ही व्यवस्थित रीतीने चालणे आणि फुगत राहणे, ही गोष्ट सवर्ण मतदारवर्गाच्या हातीच आहे. म्हणून हा स्पृश्य सवर्ण पुढारीवर्ग या हत्याचारांकडे कानाडोळा करतो; त्या प्रश्नाकडे कायम पाठ फिरवून बसला आहे. त्याच्या भाषेत मात्र स्पृश्यास्पृश्य-भेद नाही. या बाबतीत त्याची भाषा गोड असते. पण ही गोडी त्याच्या कृतीत उतरू शकत नाही; कारण मतांची बँक भरून राहिली पाहिजे, हा विचार मनात जागा असतो.

ज्यांच्या ध्येयवादामध्ये वर्तमान भारतीय समाजात मौलिक क्रांती करून वर्गरहित समाजरचना निर्माण करायची आहे, असे समाजवादी वा साम्यवादी पक्ष या देशात गेल्या ५०-६० वर्षांत अस्तित्वात आले आहेत; त्यांतील बहुतेकांचा मतपरिवर्तन करून लोकशाहीच्या शांततापूर्ण मार्गाने क्रांती घडविण्यावर विश्वास नाही. ते लोकशाही शासनपद्धतीचा पुरस्कार करत असले, तरी राज्यसत्ता किंवा शासन बहुमताच्या जोरावर काबीज केल्यानंतर शांततापूर्ण पद्धतीला विसरतात आणि राजकीय हिंसाचाराचाही अवलंब करतात; मात्र उघडपणे नाही. पश्चिम बंगालमध्ये डाव्या आघाडीच्या शासनाखाली असे हिंसाचार सारखे घडून येत आहेत. गेल्या १२ वर्षांचा इतिहास पाहिला, तर असे राजकीय हिंसाचार मधूनमधून उसळून येतात. या साम्यवादी आणि मार्क्सवादी राजकीय पक्षांची, लोकशाहीविचार आणि प्रचारस्वातंत्र्याचा शांततामार्गाने पूर्ण उपयोग करून समाजवादी किंवा साम्यवादी क्रांती घडवून आणता येईल, या तत्त्वावर श्रद्धाच नाही. या तत्त्वावर श्रद्धा असलेला आणि श्रद्धा वारंवार व्यक्त करणारा सत्ताधारी इंदिरा काँग्रेसपक्षसुद्धा अलीकडच्या ११-१२ वर्षांच्या सत्तेच्या कालावधीत हिंसाचारी बनत चालला आहे. काही वर्षांपूर्वी प. बंगालमध्ये फार जबरदस्त मारामाऱ्या या पक्षाने केल्या आहेत आणि आसाममध्ये जी सार्वत्रिक प्रादेशिक निवडणूक झाली, तीमध्ये कत्तलीही केल्या आहेत असा आरोप या पक्षावर केला गेला आहे, ही गोष्ट आम्ही वर सांगितलीच आहे. या पक्षाची युवकसंघटना अनेक वेळा प्रतिस्पर्ध्यांचा हिंसाचाराने निकाल लावून बंदोबस्त करीत असते. या सत्ताधारी पक्षाचे व साम्यवादी पक्षांचे अनुकरण इतर भारतीय राजकीय पक्ष करू लागण्याची फार शक्यता आहे. आणि हाच भारतीय लोकशाहीला मोठा धोका आहे. तसे म्हटले, तर इंदिरा काँग्रेस किंवा इतर काँग्रेस नामधारी पक्ष, त्याचप्रमाणे जनता पक्ष व भारतीय जनता पक्ष हे सगळेच म. गांधींच्या मार्गाचे अनुसरण करण्याची प्रतिज्ञा वारंवार करू लागले आहेत; याचे मुख्य कारण येथील वरिष्ठ, उद्योजक, धनिक, भांडवलदार, साखर-कारखानदार इत्यादिकांना आश्वासन देऊन खूष ठेवायचे आहे.

○ ○ ○

अनुक्रमणिका

# कश्मीर प्रश्न

वसंत नगरकर

स्वातंत्र्यानंतर कैक वर्षे गाजलेल्या कश्मीर प्रश्नाचे आंतरराष्ट्रीय स्वरूप अलीकडे कालबाह्य होऊ लागले असले, तरी देशातल्या अनेक गुंतागुंतीच्या प्रश्नांत याचाही ठळकपणे समावेश करावा लागेल. परंतु त्याच्या आताच्या स्वरूपाचा विचार करताना कश्मीरची अशी आगळी पार्श्वभूमी सतत डोळ्यांसमोर ठेवणे आवश्यक आहे.

१९४७ साली भारताची फाळणी झाली, तेव्हा ब्रिटिश हिंदुस्थानातील सलग मुस्लिम वस्ती असलेल्या विभागांचे पाकिस्तान झाले. आपली संस्थाने उर्वरित भारतात सामील करावी की पाकिस्तानात, याचा निर्णय संस्थानिकांकडे सोपविण्यात आला. त्या वेळी मुस्लिम बहुसंख्य असलेल्या जम्मू आणि कश्मीर संस्थानचे अधिपती महाराजा हरिसिंग हे होते. त्यांनी निर्णय घेण्याअगोदरच शस्त्रबळाने संस्थान बळकावण्याचा पाकिस्तानने प्रयत्न केला. महाराजा हरिसिंगांनी भारताची मदत मागितली, भारतात सामील होण्याची तयारी दर्शविली व पहिले भारत-पाकिस्तान किंवा कश्मीर युद्ध झाले. दीर्घ लढायांनंतर कश्मीर खोरे, जम्मू आणि लडाख हे विभाग आक्रमकांपासून मुक्त झाले. पण वायव्येकडील विरळ वस्तीचा, विशाल पर्वतराजी असलेला मुलूख पाकिस्तानी सेनेच्या ताब्यात राहिला.

कश्मीर खोऱ्यात मुसलमान, जम्मूत हिंदू आणि लडाखमध्ये बौद्ध धर्मियांची अनुक्रमे बहुसंख्या आहे. कश्मीरच्या सध्याच्या ७५ विधानसभा मतदारसंघांपैकी कश्मीर खोऱ्यातील ४२ आणि जम्मूच्या १२ मध्ये मुस्लिम मतदारांची बहुसंख्या आहे. १९३३ पासून राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या धर्मनिरपेक्ष लढ्याच्या प्रवाहात असलेल्या शेख अब्दुल्लांचा आणि त्यांच्या नॅशनल कॉन्फरन्स या पक्षाचा मुस्लिम जनतेवर विलक्षण प्रभाव होता. त्यांनी पाकिस्तान की भारत या वादात भारताच्या बाजूने कौल दिला. तथापि भारतात कश्मीर संस्थान सामील करण्यासाठी काही अटी घातल्या : भारतीय संघराज्यात कश्मीरला खास दर्जा असला पाहिजे. हा दर्जा जास्तीत जास्त स्वायत्तता देऊन आणि राज्याच्या शासनव्यवस्थेचा आराखडा ठरविण्यासाठी वेगळी घटनासमिती मान्य करूनच प्रत्यक्षात उतरू शकेल. शेवटची आणि सद्यःकालीन प्रश्नाशी निगडित अट अशी होती, की १९३० पासून कश्मीरच्या महाराजांनी संस्थानचे मूळचे प्रजाजन व त्यांचे वंशज आणि कश्मीरमधले इतर रहिवासी यांच्या हक्कांबाबत जो भेदभाव केला आहे तो अबाधित राहिला पाहिजे. या अटी पंडित नेहरूंनी मान्य केल्या. पुढे भारतीय घटनेतील ३७० कलमान्वये त्यांच्यावर शिक्कामोर्तब झाले. भारताच्या इतर भागांतल्यापेक्षा किंवा इतर प्रश्नांपेक्षा सध्याचा कश्मीर प्रश्न आगळा होण्याचे हे एक महत्त्वाचे कारण आहे. कश्मीरच्या वेगळ्या घटनेप्रमाणे तेथील विधानसभेने पसार केलेल्या बिलाला राज्यपालांची मंजुरी लागते. पण तशी न देता बिल फेरविचारासाठी परत धाडले आणि विधानसभेने ते पुन्हा पास केले तर राज्यपालांची मंजुरी आवश्यक ठरत नाही. या घटनेमधल्या कलम ७ अन्वये पाकव्याप्त कश्मीरमधल्या कश्मीरी प्रजाजनांना कश्मीरचे नागरिक करून घेण्याचा राज्य शासनाने प्रयत्न करावा, अशी आज्ञा देण्यात आली आहे. या घटनेप्रमाणे कश्मीरचे मूळ प्रजाजन किंवा त्यांचे वंशज यांच्याखेरीज इतर कोणालाही तेथील स्थावर मिळकत विकत घेण्याचा, धारण करण्याचा किंवा कसल्याही अधिकृत निवडणुकीत मतदानाचा हक्क किंवा नागरिकत्वाचा हक्क असणार नाही. या तरतुदीमुळेच फाळणीच्या किंवा पहिल्या कश्मीर युद्धाच्या वेळी जम्मू विभागात आलेल्या आणि गेली छत्तीस वर्षे तेथे राहत असलेल्या पश्चिम पाकिस्तानी निर्वासितांना (बव्हंशी हिंदू/शीख) कश्मीरमध्ये अद्यापही नागरिकत्वाचे हक्क मिळालेले नाहीत.

कश्मीर खोऱ्यातील मुसलमान ३०० वर्षांपूर्वी सुफी संतांच्या प्रभावामुळे हिंदू धर्मातून गेलेल्यांचे वंशज आहेत. त्यांची कश्मीरी ही स्वतंत्र भाषा आहे. वंश आणि भाषा यांमुळे ते भारतीय उपखंडा-










तील इतर मुसलमानांपेक्षा वेगळे आहेत. त्यांच्यावर सनातन इस्लामचा किंवा वहाबी पुनरुत्थानवादी इस्लामचा फारसा प्रभाव नाही. त्यांच्या वेगळेपणात कश्मीरी अस्मितेची बीजे आहेत. राष्ट्रीय स्वातंत्र्य-संग्रामाच्या वेळी जिनांच्या अनुयायांच्या मुस्लिम कॉन्फरन्सऐवजी त्यांनी शेख अब्दुल्लांना कौल दिला ही एका अर्थाने प्रादेशिक अस्मितेने सर्वसमावेशक मुस्लिम जातीयवादावर केलेली मात होती. शेख अब्दुल्लांनी भारतात सामील होण्यापूर्वी ज्या अटी घातल्या, त्याही प्रादेशिक अस्मितेच्या द्योतक होत्या. १९५२ अखेरीस त्यांची प्रादेशिक अस्मिता एवढी उफाळून आली, की ते कश्मीर समस्या आंतरराष्ट्रीय पटावर चिघळली असताना स्वतंत्र, सार्वभौम कश्मीर निर्माण करण्याच्या दिशेने पावले टाकीत असल्याचे जाणवू लागले. तेव्हा त्यांना बडतर्फ करण्यात येऊन त्यांचे वारस समजल्या जाणाऱ्या मिर्झा अफजल बेग यांच्यासह स्थानबद्ध करण्यात आले. भारतातील सामीलीकरणाच्या पूर्णपणे बाजूने असलेल्या नॅशनल कॉन्फरन्सच्या नेत्यांकडे कश्मीर राज्याची सूत्रे आली. १९६५ च्या दुसऱ्या भारत–पाक किंवा दुसऱ्या कश्मीर युद्धानंतर नॅशनल कॉन्फरन्स काँग्रेसमध्ये विलीन झाली. पुढील नऊ-दहा वर्षे अशा काँग्रेसकडे अधिकृतपणे सत्ता राहिली. या दीर्घ काळात कश्मीरी जनतेचे शेख साहेबांवरचे प्रेम तिळमात्र कमी झाले नाही. पाकधार्जिण्या आणि जमाते इस्लामीसारख्या पुनरुत्थानवादी पक्षांनी भडक प्रचाराची शर्थ केली; पण त्यांचा कश्मीरी मुसलमानांवर प्रभाव पडला नाही. कश्मीरी जनता तशी धकाधकीच्या राजकारणाबाबत उदासीनच असते. १९५२ साली कश्मीर घटनासमिती आणि विधानसभेसाठी झालेल्या निवडणुकांत शेख अब्दुल्लांच्या नॅशनल कॉन्फरन्सने ७५ पैकी ७३ जागा अविरोध जिंकल्या. त्या नंतर १९७७ पर्यंत झालेल्या निवडणुकांमध्ये दर वेळी किमान २० किंवा त्याहून अधिक उमेदवार लढतीखेरीज विजयी झाले. ते बहुतेकजण नॅशनल कॉन्फरन्स किंवा काँग्रेसचे उमेदवार होते, हे सांगावयास नकोच. पण याचा अर्थ या दोन दशकांत शेख अब्दुल्लांना राजकारणापासून दूर ठेवले असल्यामुळे त्यांची लोकप्रियता कमी झाली, असा नव्हता. त्यांच्या जनमानसातील विशेष स्थानाबाबत इतर इतकी बोलकी चिन्हे होती, की कायद्याने रीतसर निवडणुका होऊन सत्तारूढ झालेल्यांनाही आपल्याला नैतिक अधिष्ठान नसल्याची जाणीव होती. दरम्यान आपण भारताशी पूर्णपणे एकनिष्ठ असून कश्मीरबाबतचा भारत–पाक वाद पाकव्याप्त कश्मीर भारतातल्या कश्मीरशी जोडण्यापुरताच मर्यादित असल्याचे शेखसाहेबांनीही वेळोवेळी जाहीर केले. शेवटी १९७५ च्या फेब्रुवारीत त्यांच्याशी तडजोड झाली. कश्मीर विधिमंडळ काँग्रेस पक्षाने त्यांची नेता म्हणून निवड केली. मुख्यमंत्री सय्यद मीर कासीम यांनी त्यांच्यासाठी राजीनामा दिला आणि शेख अब्दुल्ला पुन्हा २२ वर्षांनी सत्तारूढ झाले.

आजचा कश्मीर प्रश्न आंतरराष्ट्रीय, भारत–पाक संघर्षाचा नाही, असे म्हणणे धाडसाचे होईल. पण या संदर्भात तो ज्वलंत नाही. आत्यंतिक प्रादेशिक अस्मिता, विभागीय असमतोल, आपल्याविरुद्ध सतत चालू असलेल्या पक्षपातामुळे जम्मूच्या जनतेतील असंतोष, जम्मूची बहुसंख्या हिंदू आणि कश्मीर-शासन खोऱ्यातील मुसलमान नेत्यांच्या हातांत, यामुळे या असंतोषाला आलेली जातीय धार, जम्मूत १९४७ पासून स्थायिक झालेल्या पश्चिम पाकिस्तानातून आलेल्या हिंदू–शीख निर्वासितांचे भवितव्य, केन्द्र–राज्य संघर्ष इ. मुद्द्यांवर आजची कश्मीर समस्या केन्द्रित झालेली आहे.

जम्मू–लडाखची एकत्र लोकसंख्या राज्यात ३५ टक्के असूनही राज्य नोकऱ्यांत येथील जनतेला फक्त १५–१६ टक्केच प्रतिनिधित्व आहे. हस्तव्यवसाय, पर्यटन, केशर, सफरचंद आणि दोन चार मोठे उद्योग फक्त खोऱ्यात आहेत. राज्याच्या एकूण ५०,००० बेकारांपैकी बहुतेक जण जम्मू विभागातले आहेत. तांत्रिक किंवा वैद्यकीय महाविद्यालयांतून प्रवेश देण्याच्या बाबतीत जम्मूच्या विद्यार्थ्यांविरुद्ध पक्षपात केला जातो. राज्य सरकारच्या कोणत्याही महत्त्वाच्या जागेवर जम्मूचे अधिकारी नाहीत. विकासाच्या बाबतीत तर ढळढळीत अन्यायच होतो. उदाहरणार्थ, कश्मीर खोऱ्याच्या मानाने जम्मू विभाग दुष्काळी असूनसुद्धा तेथील सिंचनाचा (एरिगेशन) दर कश्मीर खोऱ्यातील दराच्या चौपट आहे. गमतीची गोष्ट अशी, की पक्षपाताविरुद्ध कोर्टात गेले






आणि न्यायालयाने शासनाविरुद्ध निर्णय दिला तर ती अमलात आणण्याचा शिरस्ता कश्मीरमध्ये नाही. शेख अब्दुल्लांचे जावई गुलाम महंमद शाह आणि धाकटा मुलगा तारीक यांनीसुद्धा न्यायालयीन निर्णयांना धुडकावून लावल्याची उदाहरणे आहेत. जम्मूचे जे लोक मूळच्या संस्थानचे प्रजाजन किंवा त्यांचे वंशज आहेत त्यांना नागरिकत्वाचे हक्क आहेत; पण प्रत्यक्षात त्यांना दुय्यम नागरिकाचीच वागणूक मिळते. वर्षानुवर्षे या पक्षपाताचे बळी पडलेल्यांनी जनसंघाला पाठिंबा देऊन आपल्या गाऱ्हाण्यांना वाचा फोडण्याचा प्रयत्न केला. त्याचा उपयोग होईना, तेव्हा गेल्या तीनचार वर्षांत त्यांनी निर्वासितांच्या नागरिकत्वाचा प्रश्न हाती घेतला.

१९४७ पासून स्थायिक झालेल्या या निर्वासितांची व त्यांच्या मुलाबाळांची संख्या आता ७ लाख झाली आहे, असे १९८१ च्या जनगणनेत दिसून आले. त्यांची स्थिती सीलोनमधल्या नागरिकत्व नसलेल्या तमिळ भाषिकांसारखी आहे. आसाममध्ये अगदी परवापरवापर्यंत आलेल्या परकीयांना नागरिकत्व मिळते, ते मिळकती धारण करू शकतात, सर्व निवडणुकांत मतदानही करू शकतात; मग गेली ३६ वर्षे जम्मूत आलेल्या निर्वासितांनी काय पाप केले, असा प्रश्न उभा राहतो. त्याला आपल्या पंतप्रधान किंवा कश्मीरचे सत्ताधारी उत्तर देऊ शकत नाहीत. अलीकडेच 'डीलिमिटेशन कमिटी'ने १९८१ च्या जनगणनेनुसार जम्मूला कश्मीर विधानसभेत दोन अधिक जागा मिळाव्यात अशी शिफारस केली होती. कमिटीच्या एका म्हणजे कश्मीर खोऱ्यातील सदस्याने तिला विरोध केला. जम्मूची लोकसंख्या वाढली, ती पंजाबी निर्वासितांमुळे आणि ते तर कश्मीरचे नागरिक होऊ शकत नाहीत, असे कायदेशीर कारण देण्यात आले. शिफारस बारगळली.

हे प्रश्न नवीन नाहीत. राजकीय सत्तास्पर्धेमध्ये ते अधिक तीव्र, अधिक जटिल होऊन बसले आहेत. त्यासाठी एकट्या कश्मीर खोऱ्यातील सत्ताधारी गटाला जबाबदार धरता येणार नाही. दिल्लीच्या ओंजळीने पाणी पिणारे शासन १९५३ पासून १९७५ पर्यंत होते. त्या वेळी जम्मूच्या लोकांविरुद्धचा पक्षपात थांबविण्यासाठी प्रयत्न का झाले नाहीत, हा सवाल अनाठायी होणार नाही. आसामात येणारे परकी लोकांचे लोंढे थांबविण्याचे आश्वासन पंडित नेहरूंनी आसाम नेत्यांना १९३७ मध्ये लेखी पत्राद्वारे दिले होते. त्यानंतर १९६२ च्या सुरुवातीस लोकसभेत भाषण करताना १९५२ नंतर आलेल्या परकीयांना आसाममध्ये नागरिकत्व मिळणार नाही, अशी अधिकृत घोषणा पंतप्रधानांनी केली होती. ही आश्वासने का पाळली गेली नाहीत ? आसाम आंदोलकांशी बोलण्याची गुऱ्हाळे सुरू असता १९७१ नंतर आलेल्यांनाच फक्त परत धाडले जाईल असा दिल्लीच्या केन्द्र सरकारने हट्ट धरला आणि बोलणी फिसकटली. पण १९७१ नंतर आलेल्यांनाही सढळ हाताने नागरिकत्व बहाल केले जात होते आणि १९८३ मध्ये लादलेल्या निवडणुकांतही इंदिराजींच्या या कल्पनेप्रमाणेसुद्धा परकी असलेल्यांनीही मतदान केले. संघराज्याचे स्वरूप पालटून त्याचे केन्द्र सरकार करणाऱ्या आणि अधिकृतपणे दिलेली आश्वासने न पाळणाऱ्या अखिल भारतीय सत्ताधारी नेतृत्वावर विश्वास कसा ठेवावा ? अशाने प्रादेशिक अस्मिता वाढेल, की कमी होईल ? या परिस्थितीत आसामी जनता आपली वेगळी घटनासमिती मागू शकली नाही हे तिचे दुर्दैव असेच म्हणावे लागते.

'केन्द्र' सरकारशी बोलणी चालू असता १९५१ नंतर आलेल्या सर्व परकीयांना हाकून द्या या आपल्या मागणीला मुरड घालून आसामी नेत्यांनी १९६१ सालानंतर आलेल्यांचे नागरिकत्वाचे हक्क काढून घ्या आणि १९७१ नंतरच्यांना बाहेर घालवा अशी तडजोड सुचविली. शेख अब्दुल्लांशी जुळते घेतले असते, निवडणुकांत संघर्ष करून त्यांना सत्तेवरून खाली खेचण्याचे प्रयत्न झाले नसते, तर जम्मूमधल्या निर्वासितांच्या नागरिकत्वाच्या प्रश्नावरही काही तोडगा निघू शकला असता. पण वास्तववादी, शहाणपणाची भूमिका न घेतल्यामुळे पुनर्वसन बिलाचे भूत मात्र उभे राहिले,

१९७५ साली पुन्हा मुख्यमंत्री म्हणून आल्यावर शेख अब्दुल्ला देशातल्या इतर काँग्रेस मुख्यमंत्र्यांप्रमाणे सदैव दबून राहतील ही अपेक्षाच फोल होती. ते आणि इंदिराजी यांच्या व्यक्तिमत्त्वांत बरेच साम्य आहे. दोघेही अत्यंत महत्त्वाकांक्षी, एकाधिकारशाही वृत्तीचे, आपल्या घराण्यात सत्ता राहावी यासाठी धडपडणारे, दोघांचीही भ्रष्टा-

अनुक्रमणिका

चाराकडे आणि न्यायसंस्थेकडे पाहण्याची समान दृष्टी आणि दोघेही जनतेत लोकप्रिय. तशात शेखसाहेब इंदिराजींच्या पिताजींचे दोस्त. ते का इतरांप्रमाणे ताटाखालचे मांजर बनणार होते ! इंदिराजींची राजनीती आणीबाणीतल्या काळात म्हणजे शेखसाहेब मुख्यमंत्री झाल्यानंतर चारपाच महिन्यांनीच स्पष्ट होऊ लागली होती. स्थानिक नेतृत्व खच्ची करण्याचे नवे युग सुरू झाले होते. या गोष्टी न कळण्याइतके का शेर-ए-कश्मीर भोळे होते ? त्यांनी नॅशनल कॉन्फरन्सचे पुनरुज्जीवन केले आणि काँग्रेसनेच कश्मीरमधून गाशा गुंडाळावा अशी मागणी केली. आणीबाणीच्या काळात त्यांनी थोडी तरी सावधगिरी बाळगली. पण १९७७ साली सत्तेवर आलेल्या जनता पक्षानेही वास्तव ओळखले नाही. कश्मीरमध्ये शेख अब्दुल्लांच्या ठळक विरोधकांची मदत घेऊन निवडणुकांतून जनता शासन आणण्याचा प्रयत्न केला. परिणामी जनता आणि इंदिरा काँग्रेस या दोन्ही पक्षांशी लढत देऊन शेख अब्दुल्लांनी त्या दोघांचाही धुव्वा उडविला.

१९८० तल्या निवडणूक-यशाने इंदिरा काँग्रेस पक्षाचा आत्मविश्वास एवढा वाढला, की दोन वर्षांपूर्वी काश्मीरमध्ये काय घडले, याचे त्या पक्षाला पूर्ण विस्मरण झाले. पुढच्याच मार्चमध्ये आपल्या कश्मीर दौऱ्याच्या वेळी जम्मू भागातल्या जाहीर सभांतून राज्यातल्या हिंदू आणि हरिजन अल्पसंख्याकांच्या भवितव्याबद्दल इंदिराजींनी चिंता व्यक्त केली. त्या वेळी अर्थातच त्यांच्याजवळ जम्मूच्या लोकांनी निर्वासितांना नागरिकत्व देण्याची मागणी केली आणि आसाममध्ये परकी नागरिकांचे स्वागत होते तर जम्मूत १९४७ पासून स्थायिक झालेले निर्वासित अधिकारवंचित राहतात यांतील विरोधाची जाणीव करून दिली. शेखसाहेबांशी झालेल्या बोलण्यात परस्परांनी पक्षविसर्जनाचीही मागणी आली. निर्वासितांच्या नागरिकत्वाबद्दल सुचविण्यात आले. शेवटी बोलणी फिसकटल्यावर इंदिराजींनी फक्त एवढेच जाहीर केले, की काँग्रेस पक्ष आपले स्वतंत्र अस्तित्व कायम राखील. इंदिराजींच्या या दौऱ्यातच भाजप आणि नॅशनल कॉन्फरन्स ह्यांच्याशी अनुक्रमे जम्मू आणि कश्मीर खोऱ्यांत लढत देण्याचा त्यांचा इरादा स्पष्ट झाला.

शेख अब्दुल्लांचे वय झाले होते, प्रकृती बिघडली होती या गोष्टी १९८१–८२ मध्ये कोणालाही दिसल्या असत्या. शेख साहेबांनी १९७८ मध्ये मिर्झा अफजल बेग यांना अर्धचंद्र दिल्यानंतर वारसा मागणारे दोनच उरले. एक शेख अब्दुल्लांचे जावई गुलाम महंमद शाह आणि दुसरे, पुत्र डॉ. फारूक. शाह कडवे प्रादेशिकता–जातीयवादी, दिल्लीशी नेहमी फटकून वागणारे, कोर्टाचे आदेश लाथाडणारे आणि गरम डोक्याचे. डॉ. फारूक याहून अगदी वेगळे. शेवटी जावयाच्या उतावीळपणामुळे मुलाला वारसा मिळाला. पक्षानेही संमती दिली. त्यांच्याशी जुळवून घेणे सुलभ होते. मुख्यमंत्री म्हणून सत्ताग्रहण केल्याबरोबर त्यांनी आपले आगळेपण दाखवून दिले. शेख अब्दुल्लांच्या वेळच्या सर्व मंत्र्यांना काढून नवीन मंत्री नेमले. भ्रष्टाचारविरोधी वटहुकूम काढला. हायकोर्ट, सुप्रीम कोर्टाचे सर्व आदेश अंमलात आणले. दिल्लीशी सहकार्याची भाषा केली. पण कश्मीरमध्ये काही बदल होत आहे व तो एकूण देशाच्या हिताचा आहे या उघड सत्याकडे पाठ फिरवून निव्वळ दुराग्रहामुळे डॉ. फारूक अब्दुल्ला यांच्यावरही इंदिराजींनी टीकास्त्र सोडले.

१९८१–८२ मध्ये शेख अब्दुल्ला हयात असतानाच नॅशनल कॉन्फरन्सला पराभूत करून कश्मीरमध्ये (इं.) काँग्रेस सरकार आणण्याची तयारी चालू झाली होती. जम्मूमध्ये भाजपला खडे चारण्यासाठी असंतुष्ट जनतेचे प्रश्न आम्ही सोडवू, असा दिलासा देण्यात आला होता. हिंदूंचे भवितव्य धोक्यात आहे असे जेव्हा इंदिराजींनी जम्मू भागातल्या सभांतून मार्च १९८१ मध्ये जाहीरपणे सांगितले, तेव्हाच पक्षपात आणि निर्वासितांचे प्रश्नही इंदिरा काँग्रेसने भाजप आणि नॅशनल कॉन्फरन्सवर दबाव आणण्यासाठी हाती घेतले असल्याची शेखसाहेबांची खात्री झाली. जम्मूमधल्या सर्व जागा आणि कश्मीर खोऱ्यातल्या काही जिंकल्याशिवाय इं. काँग्रेस राज्यात सत्तेवर येऊ शकत नसल्यामुळे आपले स्थान टिकवायचे असेल तर खोऱ्यातली एकही जागा इं. काँ. ला मिळणार नाही असे धोरण आखणे नॅशनल कॉन्फरन्सला आवश्यक होऊन बसले. कश्मीर खोऱ्यात शेख अब्दुल्लांच्या घराण्यावर टीकेचे सतत प्रहार करणाऱ्या मुफ्ती महंमद सैद यांना जम्मू–







अनुक्रमणिका

कश्मीर प्रदेश (इं.) काँग्रेसमध्ये उच्च पद देण्यात आले होते. अब्दुल्लांचे दुसरे विरोधक गुलाम नबी आझाद राज्याबाहेर निवडणूक लढवून दिल्लीला मंत्री झाले होते. त्यांचीही कश्मीरमध्ये राजकीय हालचाल चालू राहिली. कोंडीत सापडल्यावर सत्ता टिकविण्यासाठी कश्मीरी खोऱ्यातील मुसलमानांच्या प्रादेशिक आणि जातीय भावना भडकावण्याचा मार्ग शेख अब्दुल्लांनी चोखाळला.

जम्मूतील निर्वासितांना नागरिकत्वाचे हक्क द्या, असा लकडा सुरू झाल्यावर शेखसाहेबांनी कश्मीर घटना कलम ७ चा आधार घेऊन पुनर्वसन बिल आणले. पाकव्याप्त कश्मीरमधले जे मूळ संस्थानाचे प्रजाजन/वारस भारतीय कश्मीरमध्ये वास्तव्या-साठी येतील त्यांना नागरी हक्क देण्यासाठी हे बिल होते. हे सर्व लोक अर्थातच मुसलमान असणार यात शंका नव्हती. या बिलाने अनर्थ होईल, देशाच्या संरक्षणाला धोका निर्माण होईल अशी टीका ताबड-तोब सुरू झाली. निर्वासितांना ३५ वर्षे राज्यात वास्तव्य करून नागरिकत्व मिळत नाही आणि पाक-व्याप्त कश्मीरमध्ये तेवढाच काळ राहिलेल्यांना मात्र नागरिकत्वाचे अधिकार देतो, तुमचे स्वागत आहे असे आवाहन करण्यात येते, अशीही ओरड झाली. हेच सूत्र चालवून कश्मीरमध्ये मुसलमानांची बहु-संख्या असताना पंजाबी हिंदू/शीख निर्वासितांकरवी मुसलमानांना अल्पसंख्य करण्याचा कट चालू आहे, असा आरोप शेखसाहेब जाहीरपणे करू लागले. डाव आपल्या अंगलट येतो आहे हे इंदिराजींनी ओळखले नाही. कश्मीर इं. काँ. चे ज्येष्ठ नेते आणि माजी मुख्यमंत्री सय्यद मीर कासीम यांनी सबुरीचा व शेखसाहेबांशी जुळवून घेण्याचा सल्ला दिला. तो झिडकारण्यात आला. राज्यसभेच्या दोन जागा भरायच्या होत्या. एक नॅशनल कॉन्फरन्सला मिळेल हे स्वच्छ होते. आमची जादा मते मीर कासीमना देतो म्हणजे तुमचाही उमेदवार येईल, अशी शेख अब्दुल्लांनी सूचना केली. पण मीर कासीम स्वतः इच्छुक असताना त्यांना तिकिट न देता एका शेख अब्दुल्लाविरोधी माणसाला उभे करण्यात आले. परिणामी भाजपचा उमेदवार सफल झाला. तेव्हा नॅशनल कॉन्फरन्सने हिंदू जातीयवाद्यांशी हात-मिळवणी केली, असा इंदिराजींसकट त्यांच्या सर्व सहकाऱ्यांनी आरोप केला.

या पार्श्वभूमीवर तर फारूक अब्दुल्लांशी संघर्ष टाळणे आवश्यकच होते. पण पुनर्वसन बिल आणि इतर प्रश्नांवर संघर्ष चालू राहिला. कश्मीरच्या राज्यपालांनी पुनर्वसन बिल फेरतपासणीसाठी परत धाडले. कश्मीर असेंब्लीने ते पुन्हा एकदा पास करून त्याचे कायद्यात रूपांतर केले. निवडणुकांच्या वेळी सर्वांची व्यूहरचना पक्की झाली होती. जम्मूच्या हताश जनतेला इंदिरा काँग्रेसला पाठिंबा देण्याने आपले प्रश्न अधिक लवकर सुटतील, अशी आशा वाटली. भाजपचा आणखी एक बालेकिल्ला ढासळला. या निवडणुकांत सत्ताधारी पक्षाने हिंसेचा मार्ग पत्करला, अनेक गैरप्रकार केले, शासनयंत्रणेचा दुरुपयोग केला अशी टीका सर्व इं. काँ. नेत्यांनी केली. विजयी नॅशनल कॉन्फरन्सच्या प्रत्येक सफल उमेद-वाराविरुद्ध निवडणूक याचिका सादर केली जाईल, असे सांगण्यात आले आहे.

सुदैवाने कश्मीरच्या राजकारणात सीमित न राहता डॉ. फारूक अब्दुल्ला आता राष्ट्राच्या राज-कीय आखाड्यात उतरले आहेत. विरोधी पक्षांचे ऐक्य आणि समान कार्यक्रम आखण्यासाठी हातभार लावीत आहेत. कश्मीर नेत्याची ही वाटचाल देशाला हितावह ठरेल आणि राष्ट्रीय स्तरावर प्रश्नांचे निराकरण करताना फारूक अब्दुल्लांना आपल्या राज्यातील प्रश्नांचीही न्याय्य उकल शोधावी लागेल. विभागीय असमतोल आणि पक्ष-पाताची नीती यांच्यावर फक्त राजकीय तोडगाच परिणामकारक ठरेल. विरोधी पक्षीयांच्या राष्ट्रीय स्तरावरच्या नेत्यांबरोबर वावरत असताना फारूक-साहेबांना आपल्या स्वतःच्या स्थानाबद्दल अस्थिरता वाटणार नाही आणि आत्मविश्वासाने ते राज्यातील प्रश्नांचा राष्ट्रव्यापक भूमिकेतून विचार करू शकतील, अशी आशा वाटण्यासारखी आताची परिस्थिती आहे.

००








# केंद्र-राज्य संबंध आणि स्वायत्ततेचा प्रश्न

सुहास पळशीकर

भारताच्या राजकारणातील एक कालखंड 'संसद श्रेष्ठ की न्यायालय श्रेष्ठ' ह्या वादाने गाजविला. त्या वेळेस घटनेचा खरा अर्थ काय, घटनाकारांना काय अभिप्रेत होते आणि भारताच्या विकासासाठी काय आवश्यक आहे, असे प्रश्न उपस्थित झाले होते. विचारवंत, घटनापंडित, राजकारणी मंडळी असे सर्वचजण ह्या वादात ओढले गेले होते. १९८० नंतर असाच एक वाद विविध पातळ्यांवर उभा राहिलेला दिसतो. भारताने स्वीकारलेल्या संघराज्याच्या चौकटीत केंद्र शासन आणि राज्य सरकारे ह्यांचे संबंध कशा स्वरूपाचे असावेत, असा प्रश्न निर्माण झालेला दिसतो. ह्या वादामध्येही राजकारणी लोकांबरोबरच काही घटनातज्ज्ञ, अभ्यासक, विविध नियतकालिके यांनी भाग घेतलेला दिसतो. 'संसद वि. न्यायालय' असा वाद झाला त्या वेळेपेक्षा विरोधी पक्ष आज थोडेसे बऱ्या स्थितीत आहेत. त्यामुळे परिषदा भरवून, शिखर-संमेलने भरवून 'केंद्र वि. राज्य' वाद रंगविला जात आहे.

आपण हे लक्षात ठेवायला पाहिजे, की असे वाद घटनात्मक विकासाचाच एक भाग असतात. घटनेने जो राजकीय चौकट तयार केली तिचा व्यवहारातील तपशील अशा वादांमुळे ठरत असतो. त्यामुळे हे वाद अंतिमतः आपल्या राजकीय विकासालाच हातभार लावीत असतात. केंद्र विरुद्ध राज्य ह्या वादाच्या संदर्भामध्ये तर हे विशेष लक्षात ठेवायला हवे; नाहीतर हळव्या राष्ट्रीय भावनेपोटी असा वाद हा आपल्या ऐक्यालाच धोकादायक आहे, अशी भीती वाटू लागते ! विशेषतः अलीकडच्या काळातील पंजाब-आंदोलनाच्या पार्श्वभूमीमुळे केंद्र विरुद्ध राज्य हा वाद फुटीर (आणि बाह्य ?) शक्तींचा कट आहे, असा समज करून घेणे फारच सोपे झाले आहे.

संघराज्यपद्धती स्वीकारलेल्या देशांमध्ये अशा प्रकारचे संघर्ष ही नित्याची बाब दिसते. याचे कारण संघराज्य पद्धतीमध्ये काही अधिकार केंद्रशासनाला आणि काही राज्यांना अशा प्रकारे सत्तावाटप केलेले असते. सैद्धान्तिकदृष्टया विचार केला तर आपापल्या क्षेत्रात केंद्रसरकार आणि प्रादेशिक सरकारे पूर्णपणे स्वतंत्र असतात. पण व्यवहारात आपले अधिकार वापरताना त्यांना एकमेकांवर अवलंबून राहावेच लागते. दुसरी गोष्ट अशी, की मूळ सत्तावाटपापेक्षा अधिक प्रमाणात सत्तेचा वाटा आपल्याला मिळावा, असा प्रयत्न केंद्रसरकार आणि प्रादेशिक सरकारे करतात. त्याशिवाय, मुळात जे सत्तावाटप घटनेने केलेले असेल, त्याच्या निश्चित अन्वयार्थाबद्दल वाद निर्माण होतात. त्यामुळे घटनात्मक मुद्द्यांवर आणि व्यावहारिक मुद्द्यांवर संघराज्यामध्ये केंद्रशासनाशी राज्यांचे वाद होतात. भारताच्या राज्यघटनेनेही संघराज्यपद्धती स्वीकारलेली असल्यामुळे ह्याच स्वरूपाचे वाद येथेही होणे स्वाभाविकच आहे.

भारताचा अवाढव्य प्रादेशिक विस्तार, सगळ्याच प्रदेशांमधील भाषा, संस्कृती वगैरेंचा वेगळेपणा या गोष्टींचा विचार करून आपल्या राज्यघटनेने ही संघराज्यपद्धत स्वीकारली. त्यानुसार केंद्रशासनाकडे काही ठराविक अधिकार सोपवून संपूर्ण देशाच्या कारभाराची जबाबदारी सोपविली गेली. तसेच प्रत्येक प्रदेशाला ( घटकराज्याला ) आपल्यापुरते काही निर्णय स्वतंत्रपणे घेता येतील, अशी व्यवस्था केली गेली. मात्र घटकराज्यांना **संघराज्यातून बाहेर पडण्याचे स्वातंत्र्य दिले गेले नाही**. शिवाय आपल्या राज्यघटनेने केंद्र सरकारला काही जादा अधिकार देऊन **प्रबळ केंद्र सरकार** निर्माण केले. ह्या घटनात्मक तरतुदींमुळे बरेच वाद निर्माण होतात, म्हणून त्यांचे स्वरूप लक्षात घेणे उपयुक्त ठरेल.








अनुक्रमणिका

## केंद्राचे वर्चस्व

केंद्राने कोणत्या विषयांवर कायदे करावेत आणि राज्यांनी कोणत्या विषयांवर हे ठरविण्यासाठी घटनेने तीन याद्या (सूची) केल्या आहेत. संघसूची-मध्ये (union list) केंद्राच्या अखत्यारीत येणारे विषय आहेत. राज्यांच्या विषयांची यादी राज्यसूची (state list) मध्ये दिली आहे. त्याखेरीज काही विषयांवर केंद्र आणि राज्ये दोघांनाही कायदे करता येतात. त्यांची यादी संयुक्त सूचीमध्ये (concurrent list) दिली आहे.[१] ह्याशिवाय उर्वरित अधिकार म्हणजे ह्या तीन सूचींमध्ये न आलेले विषय केंद्राकडे सोपविले आहेत [कलम २४८]. तसेच संयुक्त सूचीमधील एखाद्या विषयावर केंद्राने आणि घटकराज्याने केलेल्या कायद्यांमध्ये विसंगती असली तर केंद्राचा कायदा हाच अंतिम समजला जातो [कलम २५४]. त्यामुळे संयुक्त सूचीतील विषयांवर केंद्राचे वर्चस्व राहू शकते. राज्यसूचीतील विषयांवरदेखील केंद्राला म्हणजे संसदेला कायदा करता येतो; मात्र त्यासाठी राज्य-सभेने २/३ बहुमताने ठराव करून तो विषय संसदे-कडे सोपविणे आवश्यक असते [कलम २४९]. हे झाले अधिकारांचे वाटप. त्याखेरीज घटकराज्यामध्ये केंद्रीय सुरक्षादल पाठविण्याचा केंद्राला अधिकार आहे. तसेच केंद्रसरकार आपल्या कायद्याच्या अमलबजावणीचे काम राज्यसरकारांवर आणि त्यांच्या प्रशासकीय यंत्रणांवर सोपवू शकते [कलम २५८].

राज्याच्या विधिमंडळाने संमत केलेल्या विधेय-कास राज्यपालाची संमती आवश्यक असते. राज्यपाल संमती देण्याऐवजी त्याचे मत नोंदवून पुनर्विचारा-साठी विधेयक परत पाठवू शकतो. त्याचप्रमाणे राष्ट्रपतींच्या संमतीसाठी ते विधेयक राखून ठेव-ण्याचा राज्यपालांना अधिकार आहे. अशा विधेय-यकाला राष्ट्रपती संमती नाकारू शकतात किंवा ते विधिमंडळाकडे पुनर्विचारासाठी परत पाठविता येते (कलम २००-२०१). म्हणजेच राज्याच्या विधेय-कांच्या बाबतीत राज्यपालांना विशेषाधिकार असतात. राज्यपालांची नेमणूक केंद्रीय मंत्रिमंडळाच्या सल्ल्याप्रमाणे राष्ट्रपती करीत असतात. राज्यातील मंत्रिमंडळाच्या नियुक्तीच्या संदर्भात राज्यपाल आपले अधिकार वापरू शकतात, तसेच बडतर्फी-साठीदेखील. त्यामुळेच राज्यपालपद हे अनेक वेळा वादग्रस्त बनते.

राज्यपालांच्या अधिकाराशी संबंधित असा आणखी एक मुद्दा म्हणजे घटकराज्याची विधानसभा विसर्जित करून किंवा स्थगित ठेवून राष्ट्रपती-राजवट लादण्याचा अधिकार. कलम ३५६ मधील तरतुदीप्रमाणे राष्ट्रपती राज्यपालांच्या सूचनेवरून किंवा स्वतंत्रपणेदेखील एखाद्या घटकराज्यात राष्ट्रपती-राजवट जारी करू शकतात. ह्या तरतुदी-मुळे घटकराज्यांपेक्षा केंद्रशासन घटनात्मकदृष्ट्या श्रेष्ठ असल्याचेच दिसून येते.

ह्या विविध तरतुदींचा अर्थ काय? त्यावरून भारत संघराज्य नाही असे सिद्ध होते काय? संघ-राज्याविषयी जे सिद्धान्त आहेत, त्यांच्याप्रमाणे ह्या तरतुदी नक्कीच संघराज्याला साजेशा नाहीत. परंतु आपल्या घटनाकारांनी निव्वळ सैद्धान्तिक दृष्टिकोन न स्वीकारता अधिक व्यापक दृष्टि-कोनातून लवचीक (flexible) संघराज्य निर्माण केले. संघराज्य निर्माण केले तरी देशाचे ऐक्य आणि केंद्रसरकारची शक्ती यांना धक्का लागू नये अशी काळजी त्यांनी घेतली. कोणत्याही आधुनिक संघ-राज्यात दुर्बळ किंवा नाममात्र केंद्रसरकार असूच शकत नाही, याचे भान त्यांना होते. शिवाय १९४६ ते १९४९ ह्या काळात भारताला ज्या विविध गंभीर समस्यांना तोंड द्यावे लागले, त्यांचा अनुभव असल्या-मुळे केंद्रसरकार मजबूत असणे आवश्यक आहे हेही घटनाकारांना पटले होते. शिवाय नेहरूंच्या नेतृत्वा-खालील आधुनिकतावादी श्रेष्ठजनवर्गाला खरे तर केंद्रीकरणाचेच आकर्षण होते आणि त्याद्वारे विकास घडवून आणता येईल असा विश्वास होता.[२] आणखी एक महत्त्वाची गोष्ट अशी, की वर आपण पाहिल्या त्यांपैकी कित्येक तरतुदी अपवादात्मक परिस्थिती-मध्ये वापरण्यासाठीच केल्या होत्या. त्या करीत असताना घटनाकारांची अपेक्षा अशी होती, की अगदी नाइलाज होईल तेव्हाच ह्या तरतुदी वाप-रल्या जातील. मात्र ह्या तरतुदींमध्ये तसे बंधन न घालता त्यांची भाषा व्यापक आणि संदिग्धच ठेवली गेली आणि भविष्यकाळातील राजकीय नेतृत्वावर त्यांचे भवितव्य सोपविले गेले. म्हणूनच केंद्र-राज्य

अनुक्रमणिका

संबंधाच्या तणावाची जबाबदारी नुसतीच घटनेतील तरतुदींवर टाकता येणार नाही; तर त्यांचा वापर गेल्या तीस–पस्तीस वर्षांत कसा झाला, हेही पाहावे लागेल.

## राष्ट्रपती-राजवटीचे राजकारण

राष्ट्रपती-राजवटीची तरतूद ही सर्वांत वादग्रस्त ठरलेली तरतूद आहे. केंद्र–राज्य संबंधांचा नमुना म्हणून आपण तिचेच उदाहरण घेऊ. घटकराज्यात शासनयंत्रणा कोलमडून पडली आहे असे राष्ट्रपतींचे मत बनले, तर राष्ट्रपती तेथील मंत्रिमंडळ बडतर्फ करून राष्ट्रपती-राजवटीची घोषणा करू शकतात. हे करीत असताना राष्ट्रपती मुख्यतः राज्यपालांच्या अहवालावर अवलंबून राहतात. आपल्याकडे पूर्वापार-पासूनच राष्ट्रपतींनी मंत्रिमंडळाचा सल्ला मानण्याची पद्धत आहे आणि आता ४२ व्या घटनादुरुस्तीने तर मंत्रिमंडळाचा सल्ला मानणे राष्ट्रपतींवर बंधन-कारकच केले आहे. म्हणजेच व्यवहारात असे म्हणता येईल, की केंद्रीय मंत्रिमंडळ राज्यपालांची नेमणूक करते; आणि केंद्रीय मंत्रिमंडळच घटकराज्यात राष्ट्रपती-राजवट लागू करते. शासनयंत्रणा कोल-मडली आहे असे केव्हा म्हणता येईल? ह्याला कोणतेच निश्चित निकष नाहीत. पण ह्या मुद्द्यावर न्यायालयात आव्हान देता येत नाही. ‘ राष्ट्रपतींची त्याविषयी खात्री होणे ’ हे पुरेसे असते.

पंडित नेहरू पंतप्रधान असतानाच राष्ट्रपती-राजवट लागू करण्याचे सहा प्रसंग घडले. पंजाबमध्ये मुख्यमंत्री प्रेमचंद भार्गव यांचे मंत्रिमंडळाच्या विस्तारावरून नेहरूंशी मतभेद झाल्यानंतर राष्ट्रपती-राजवट लागू केली गेली (१९५१). आंध्रमध्ये पक्षांतरांमुळे काँग्रेसमंत्रिमंडळ धोक्यात आले. मंत्रि-मंडळाने राजीनामा दिल्यानंतर राज्यपालांनी विरोधी कम्युनिस्ट पक्षाला संधी न देताच राष्ट्रपती–राज-वटीचा सल्ला दिला (१९५४). केरळमध्ये १९५६ आणि १९५९ मध्ये राष्ट्रपती-राजवट लादण्यात आली. त्यांपैकी १९५९ मध्ये कम्युनिस्ट मंत्रिमंडळ बहुमतामध्ये असताना राष्ट्रपतींनी ते बडतर्फ करून राष्ट्रपती-राजवट जारी केली. फक्त पेप्सू आणि ओरिसातील राष्ट्रपती-राजवट कमी वादग्रस्त ठरली.[३] हा जुना तपशील पाहिला तर असे दिसते, की राज्यकर्त्या काँग्रेस पक्षातील मतभेद दडपण्या-साठी, विरोधी पक्षांना संधी मिळू नये म्हणून किंवा विरोधी पक्षाचे मंत्रिमंडळ (भ्रष्टाचाराच्या अथवा अन्य कारणाने ) बडतर्फ करण्यासाठी राष्ट्रपती-राजवट वापरण्याचा प्रघात थेट नेहरू–युगापासूनच पडला आहे. मात्र नेहरूंच्या १९५० ते १९६४ ह्या पंतप्रधानपदाच्या काळात खरोखरच संशयास्पद आणि निव्वळ राजकीय डावपेचाचा भाग असलेले दोनच निर्णय होते– आंध्र आणि केरळबद्दलचे.

ह्याउलट, १९६६ मध्ये श्रीमती गांधी पंतप्रधान झाल्या तेव्हापासून १९७७ पर्यंतच्या त्यांच्या अकरा वर्षांच्या सलग कारकीर्दीत अठ्ठावीस वेळा राष्ट्रपती-राजवटीची घोषणा वेगवेगळ्या राज्यांमध्ये केली गेली. हा नुसताच संख्येचा फरक घडून आला असे नाही, तर त्यांपैकी अनेक निर्णय वादग्रस्त ठरले. राज्यपालांनी विरोधी पक्षाला मंत्रिमंडळ बनविण्याची संधी न देणे, सोयीप्रमाणे मंत्रिमंडळाला अधिवेशन बोलावण्यास लावणे किंवा अधिवेशन पुढे ढकलणे, मध्येच अधिवेशन तहकूब करणे, ह्या सर्व कार-वायांनी हा कालखंड गाजला. हा सर्वच तपशील राज्यपालपदाचा आणि कलम ३५६ चा कसा विविध प्रकारे गैरवापर होऊ शकतो, हे दाखवितो.[४]

## १९६६ नंतरचे स्थित्यंतर

१९६६ नंतर घडून आलेल्या ह्या फरकाचे एक वरवरचे कारण म्हणजे विरोधी पक्षांना अनेक राज्यांमध्ये मिळालेले बहुमत आणि आघाड्या बनविण्यात आलेले अपयश. परंतु त्याहीपेक्षा खोल-वरचे कारण म्हणजे राजकीय शैलीमध्ये–कार्य-पद्धतीमध्ये झालेला गुणात्मक बदल. श्रीमती गांधींनी १९६६–६७ नंतरच्या काळात काँग्रेसचे सहिष्णू धोरण बदलून आक्रमक धोरण स्वीकारले. राजकीय अनेकता ( plurality ) न स्वीकारता त्यांनी एककेंद्री समूहवादी ( populist ) धोरणांचा पाठपुरावा केला. त्या धोरणात्मक चौकटीत विरोधी पक्षीय सरकारचे अस्तित्व जसे बसू शकत नाही; त्याचप्रमाणे भक्कम, सुस्थिर राजकीय संस्थाही बसत नाहीत. त्यामुळे विविध राजकीय संकेत, प्रघात, संस्था यांचे विकृतीकरण करून त्या पोकळ बनविण्यावर लक्ष केंद्रित झाले. ह्या धोरणाचा एक भाग म्हणून राज्यपालपद, राज्यातील मुख्यमंत्री, मंत्रिमंडळ यांचे अवमूल्यन करण्यात आले. ह्या समूह-



अनुक्रमणिका

वादी धोरणाचे दोन तोंडावळे आहेत : इतर विरोधी पक्षांच्या संदर्भात आपल्या पक्षाच्या वर्चस्वाचा आग्रह धरणे म्हणजे वर्चस्वनीती आणि पक्षांतर्गत पातळीवर पक्ष अधिकाधिक एकसाची ( monolithic ) बनविणे. ह्या दोहोंसाठी जे अनेक कार्यक्रम राबविले गेले त्यांपैकी एक म्हणजे राज्यांमध्ये केंद्राचा हस्तक्षेप. राष्ट्रपती-राजवट हे त्या हस्तक्षेपाचे एक ठळक उदाहरण म्हणून आपण पाहिले. परंतु खुद्द काँग्रेसपक्षाची सरकारे ज्या प्रांतांमध्ये होती तेथेही केंद्राचा हस्तक्षेप होत राहिलाच. मात्र हा हस्तक्षेप केंद्रशासनाबरोबरच पक्षाच्या केंद्रीय मंडळाचा असे / असतो. केंद्र–राज्य संबंधांना संघर्षाचे स्वरूप आले ते मुख्यतः केंद्रशासनाने विरोधी पक्षांच्या मंत्रिमंडळांना घटकराज्यात कारभार करू न देण्याचा प्रयत्न केल्यामुळे.

१९६७ ते १९७२ ह्या काळात काही वेळा अशीही परिस्थिती उद्‌भवली, की विरोधी संयुक्त आघाडीला राज्यकारभार करताच आला नाही किंवा मंत्रिमंडळही बनविता आले नाही. परंतु राष्ट्रपती-राजवटीमुळे त्या त्या राज्यांमध्ये केंद्रविरोधी भावना निर्माण करणे तेथील नेतृत्वाला शक्य झाले. केंद्रातील सत्ताधारी पक्षाची वर्चस्वनीती आणि केंद्रीकरणाकडे असलेला कल ह्यांमुळे ठिकठिकाणी प्रदेशवादाला प्रोत्साहनच मिळाले. हे सर्वच राज्यांमध्ये घडले असे नाही. पण ज्या प्रदेशांना वेगळेपणाचा आणि प्रादेशिक चळवळींचा इतिहास होता, तेथे ही प्रक्रिया वेगाने घडून आली. ह्यातून दोन परस्परसंबंधित आणि परस्परपूरक गोष्टी घडल्या– अ) त्या त्या प्रदेशापुरती आपली राजकीय महत्त्वाकांक्षा सीमित केलेला प्रादेशिक श्रेष्ठजनवर्ग उदयाला आला. ह्या प्रादेशिक श्रेष्ठजनांनी प्रदेशाभिमानाची विचारसरणी ( ideology ) लोकप्रिय बनवून केंद्र विरुद्ध तो प्रदेश असा लढा कमीअधिक प्रमाणावर जिवंत ठेवला. मात्र त्याचबरोबर त्या त्या घटकराज्यामध्ये सत्ता मिळविण्यासाठी राज्यकर्त्या पक्षांतर्गत स्वतंत्र गट स्थापन केला किंवा मर्यादित पक्ष स्वतंत्रपणे उभा केला. ब) प्रादेशिक श्रेष्ठजनांनी केंद्र–राज्य संघर्ष तीव्र करण्यासाठी नुसताच केंद्रीकरणाला विरोध केला असे नाही, तर त्याला पर्याय म्हणून स्वायत्ततेची मागणी करण्यासही सुरुवात केली. स्वायत्ततेच्या मागणीमुळे आपल्या प्रांतात लोकप्रियता मिळण्याची सोय झाली, तसेच त्या निमित्ताने सर्व 'स्वायत्ततावादी' शक्तींना एकत्र येण्याचा मार्ग मोकळा राहिला. स्वायत्ततेचा विचार एकाच वेळेला प्रदेशवादाला पोषक म्हणून आणि संघराज्यालाही पोषक म्हणून वापरता येतो. अशा प्रकारे १९६७ नंतर सुरू झालेल्या वर्चस्वस्थापनेच्या प्रक्रियेला घटकराज्ये आणि विरोधीपक्ष यांनी दिलेला प्रतिसाद म्हणजे प्रदेशवाद आणि स्वायत्ततेची मागणी.

आज जरी हे प्रतिसाद स्पष्ट दिसू लागले असले, तरी मला वाटते त्यांचे मूळ जुनेच आहे. काँग्रेसची फूट, त्यानंतरचे ध्रुवीकरण, आणीबाणी ह्या सर्व घटनांमुळे हा प्रतिसाद सुप्त राहिला किंवा बाजूला पडला. परंतु हा काही आज एकाएकी निर्माण झालेला प्रतिसाद नाही. प्रादेशिक चळवळींचा इतिहास जुनाच आहे, प्रादेशिक श्रेष्ठजनवर्गाचा उदय अलीकडचा आहे. स्वायत्ततेच्या मागण्या काही काळापूर्वीच केल्या गेल्या, आज त्यांनी आपल्या राजकारणाच्या विषयपत्रिकेवर वरची जागा पटकावली आहे, एवढेच.

## स्वायत्ततेच्या मागण्यांचे स्वरूप

स्वायत्ततेच्या मागण्या दोन वेगळ्या प्रकारच्या आहेत. एक गट मुख्यतः राजकीय स्वायत्ततेचा पुरस्कार करणारा आहे. त्याचा रोख घटनेतील सत्तावाटप, राज्यपालांचे अधिकार इत्यादी बाबींवर प्रामुख्याने आहे. राज्यसूचीतील विषय वाढवावेत, संयुक्त सूचीतील विषय वाढवावेत, राज्यपालपदाविषयी निश्चित संकेत ठरवावेत–किंवा ते पदच रद्द करावे– अशा स्वरूपाच्या मागण्या आणि आनुषंगिक घटनादुरुस्तीच्या मागण्या ह्यांचे उद्दिष्ट राजकीय स्वायत्तता हे आहे. ह्याउलट, मार्क्सवादी कम्युनिस्ट पक्षाने सातत्याने स्वायत्ततेच्या आर्थिक बाजूवर भर दिला आहे. आपल्या घटनात्मक चौकटीत राज्ये आर्थिक उत्पन्नासाठी केंद्रावर फार मोठ्या प्रमाणावर अवलंबून राहतात. त्यामुळे राज्याच्या आर्थिक विकासावर, धोरणांवर मर्यादा पडतात. त्याशिवाय नियोजन मंडळासारख्या यंत्रणांमुळे केंद्राचे वर्चस्व वाढते. त्यामुळे आर्थिक स्वायत्ततेच्या दिशेने प्रयत्न केले पाहिजेत, असा

युक्तिवाद केला जातो. सर्वच विरोधी पक्ष केंद्रावर आर्थिक बाबतीत पक्षपाताचा आरोप करतात, तसेच विकासयोजनांचे राज्यांमध्ये वाटप होताना राजकीय दृष्टीने विचार होतो, असाही आरोप केला जातो; पण आर्थिक स्वायत्ततेमध्ये मार्क्सवादी पक्षाखेरीज इतरांना फारसे स्वारस्य नाही. वस्तुस्थिती अशी आहे, की सगळीच राज्ये विकासाच्या साधनांच्या बाबतीत केंद्रावर अवलंबून आहेत, आपल्या केंद्रीय नियोजनाचाच तो भाग आहे, आणि त्या बाबतीत स्वावलंबी होणे राज्यांना कितपत रुचेल हा प्रश्नच आहे. राज्यसरकारे पटकन लोकप्रिय होण्यासाठी भरमसाठ योजना आखतात, त्यांच्यासाठी केंद्राकडे पैसे मागतात आणि त्यांच्या अपयशाबद्दल केंद्राच्या उदासीनतेला जबाबदार धरतात. पूर, दुष्काळ वगैरे नैसर्गिक आपत्ती आल्यावरही राज्याच्या पातळीवर त्यांचा मुकाबला न करता सर्वच जण केंद्राकडे (नुकसानीचा आकडा फुगवून) मदत मागतात, असे आजचे चित्र आहे. त्यावरून केंद्रीकरणाची प्रचीती येते, तसेच राज्यांना आर्थिक स्वायत्तता नको असल्याचीही प्रचीती येते.

म्हणजे मग खरा वाद कोठे उरला? तर राजकीय स्वायत्ततेपुरता. राजकीय स्वायत्ततेच्या प्रश्नाची चिकित्सा दोन प्रकारे करता येते. निव्वळ घटनात्मक–कायदेशीर दृष्टिकोनातून पाहिल्यास आपल्याला असे दिसेल, की स्वायत्ततेची मागणी पूर्ण करण्यासाठी घटनेत बदल केले पाहिजेत. राज्यांच्या स्वायत्ततेला घटनेचे अधिक भक्कम संरक्षण मिळवून दिले म्हणजे स्वायत्त राज्यांचे स्वप्न पूर्ण होऊ शकेल हा एक दृष्टिकोन झाला. दुसरा मार्ग म्हणजे प्रत्यक्ष राजकीय व्यवहारांच्या संदर्भात ह्या प्रश्नाचा विचार करायचा. म्हणजे घटना आणि घटनादुरुस्ती ह्यांच्यावर भर न देता प्रत्यक्ष व्यवहारात स्वायत्तता का नाही, हे शोधायचे. ते जर सापडले, तर (आणि आपल्याला स्वायत्तता हवी असेल तर) स्वायत्ततेला मारक असे घटक राजकीय व्यवहारातून कसे बाजूला काढायचे ह्याचा विचार करता येईल!

## घटनादुरुस्तीचा पर्याय

घटनादुरुस्तीचा मार्ग माझ्या मते अगदीच मर्यादित उपयोगाचा ठरेल. त्याचे कारण जोपर्यंत आपण राजकीय वर्तनाचे परिपक्व मानदंड विकसित करीत नाही, तोपर्यंत घटनेत फार भव्य-दिव्य कलमे घातल्याने फारसा फरक पडणार नाही. आपण वर पाहिले त्याप्रमाणे राष्ट्रपती-राजवटीचे कलम अगदी निरुपाय म्हणून वापरले जाईल अशी घटनाकारांची अपेक्षा होती. हा विवेक प्रत्यक्ष व्यवहारात उरला नाही. त्यामुळे सर्व तरतुदी, त्यांच्यावरील निर्बंध यांची लेखी जंत्री केल्याने फारशी सुधारणा होणार नाही. "...राज्यघटनेच्या लिखित तरतुदींबरोबरच अनेक अलिखित तरतुदी लोकशाही संस्कृतीचा भाग म्हणून कार्यवाहित यायला हव्या असतात. त्या आलेल्या नाहीत... राज्यपालाने कसे वागावे? त्याची नेमणूक कशी करावी? राज्यसरकार केव्हा बडतर्फ करावे? हे सर्व लेखी घटनेत समाविष्ट होऊच शकत नाही..."[१] पण घटनादुरुस्ती उपयुक्त ठरेल काय, हा दूरवरचा प्रश्न झाला. कारण आज राष्ट्रीय पक्षांपैकी फारसे कोणी अशा प्रकारच्या घटनादुरुस्तीला अनुकूल नाहीत. काँग्रेस, लोकदल, भा. ज. पक्ष हे तर स्वायत्ततेच्या प्रस्तावाला विरोध करतीलच; पण जनता आदी पक्षांनाही स्वायत्ततेबद्दल फारसा उत्साह नसणार, हे स्पष्ट आहे.

## प्रादेशिक पक्ष

प्रत्यक्ष व्यवहारातील स्वायत्ततेच्या वादाचे उत्साही पुरस्कर्ते कोण? तर मुख्यतः काही प्रदेशवादी पक्ष आणि ठराविक प्रदेशात सत्ताधारी असणारे/असू शकणारे पक्ष. त्यामुळे आज अकाली दल, नॅशनल कॉन्फरन्स, तेलगू देसम वगैरे पक्ष केंद्रविरोधी मोहिमेत पुढे असलेले दिसतात. इतर राष्ट्रीय विरोधी पक्षांना राष्ट्रीय पातळीवर पर्याय उभा करण्यात अपयश आल्यामुळे विविध प्रादेशिक पक्षांचे स्थान आता जास्त महत्त्वपूर्ण बनले आहे. प्रादेशिक श्रेष्ठजनांच्या उदयाच्या संदर्भात प्रादेशिक पक्षांचा आपण वर ओझरता उल्लेख केला आहे. प्रादेशिक पक्षांची निर्मिती ही जुनी घटना आहे. १९६० नंतर राजकारणात त्यांचे स्थान महत्त्वाचे बनू लागले. भारताच्या प्रत्येक प्रांतात कधी ना कधी त्या प्रांतापुरता पक्ष निर्माण झालेला आहे असे म्हटले तर अतिशयोक्ती होणार नाही. त्यातच राजकीय जागृतीवर भर देऊन लोकांमध्ये वाढती जागृती निर्माण करण्याच्या प्रयत्नांमुळे अशा

अनुक्रमणिका

प्रादेशिक पक्षांचे महत्त्व वाढलेले दिसते.[६] आपल्याकडील व्यक्तिकेंद्रित पक्षीय राजकारणाची पद्धत प्रादेशिक पक्षांच्या वाढीला अनुकूल ठरलेली दिसते.

१९८० पूर्वीदेखील काही प्रांतांमध्ये प्रादेशिक पक्षांची मंत्रिमंडळे येऊन गेली होती. तामिळनाडू आणि काश्मीर या दोन्ही राज्यांत बराच काळ तेथील स्थानिक पक्षांचीच सरकारे आहेत. पंजाबमध्येही अकाली दलाने सत्तेमध्ये भागीदारी केली आहे. त्यात आता आंध्रची भर पडली. उत्तरपूर्व सीमेवरील प्रांतांमध्येही स्थानिक पक्षांचेच वर्चस्व होते. परंतु काँग्रेसने त्यांपैकी बरेच स्थानिक पक्ष गिळंकृत करून तेथे स्वतःची मंत्रिमंडळे स्थापन केली आहेत.

प्रादेशिक पक्ष, काँग्रेस आणि इतर राष्ट्रीय पक्ष यांचे संबंध लक्षात घेतले म्हणजे प्रादेशिक पक्षांची भूमिका स्पष्ट होते. बहुतेक सर्व प्रादेशिक पक्ष कोणत्या ना कोणत्या राष्ट्रीय पक्षाशी जवळीक साधण्यास उत्सुक असतात. दुसरे वैशिष्टय म्हणजे जवळपास प्रत्येक प्रादेशिक पक्षाने निदान एकदा तरी काँग्रेसशी जवळीक साधून सहकार्य केलेले आहे आणि निदान एकदा तरी काँग्रेसला विरोध करून संघर्षाची भूमिका घेतलेली आहे ! त्याखेरीज काही प्रादेशिक पक्षांनी योग्य मोबदला घेऊन काँग्रेसमध्ये स्वतःचे विसर्जन केले आहे. (कर्नाटक क्रांती रंगाच्या एका गटाने काँग्रेसबरोबर तर एकाने 'जनता' बरोबर विलीनीकरण पत्करले !). ह्याचाच अर्थ प्रादेशिक पक्ष एक तर मध्यस्थाची भूमिका बजावतात किंवा स्थानिक सुभेदाराची. राष्ट्रीय पक्षांना अनेक प्रांतांमध्ये स्थान नाही. अशा वेळी प्रादेशिक पक्ष हे राष्ट्रीय पक्ष आणि राज्यातील जनता यांच्यांतील मध्यस्थ बनून त्या राष्ट्रीय पक्षाला लोकसभेवर काही जागा मिळवून देतात. ह्यासाठी अर्थातच त्या राष्ट्रीय पक्षाला प्रादेशिक पक्षाशी मिळते घऊन आघाडी करावी लागते. त्यामुळे प्रादेशिक पक्षाचेही स्थान बळकट होण्यास मदत होते. मात्र 'मध्यस्था'च्या भूमिकेत प्रादेशिक पक्षाला स्वतःचे महत्त्व टिकविणे सोपे असते. कारण त्याचे व्यक्तित्व कोठेही दुय्यम न बनता प्रतिष्ठेने हे सर्व घडून येते. याउलट, प्रादेशिक पक्ष एखाद्या राष्ट्रीय पक्षाचा–केंद्रातील राज्यकर्त्या पक्षाचा–सुभेदार/मांडलिक म्हणून राज्य करू शकतो. श्रीमती गांधींनी अशी व्यवस्था आणण्याचा प्रयत्न काही प्रमाणात केला. पण ह्या व्यवस्थेत प्रादेशिक पक्षाला एकप्रकारे आपले वेगळे अस्तित्वच गुंडाळून ठेवावे लागते. त्यामुळे तामिळनाडु, काश्मीर या ठिकाणी हा प्रयोग यशस्वी झाला नाही. पण प्रादेशिक पक्षांनी असा स्वतंत्र पवित्रा घेतल्यामुळे त्यांना काँग्रेसशी शत्रुत्व पत्करावे लागले. त्यामधूनच स्वायत्ततेच्या अधिक जोरदार मागणीवर त्यांचे लक्ष केंद्रित झाले आहे.

भारतात ज्या विभागांमध्ये स्थानिक प्रदेशाभिमान तीव्र आहे अशा ठिकाणी प्रादेशिक पक्षाला वगळून राज्य करण्याचे प्रयत्न यशस्वी होत नाहीत, असा अनुभव आहे. त्यामुळे प्रादेशिक पक्षांचे तात्पुरते स्थान मान्य करावेच लागते. त्याचबरोबर हेही लक्षात ठेवले पाहिजे, की प्रादेशिक पक्ष हा काही कायमचा उपाय होऊ शकत नाही. प्रादेशिक पक्ष सर्वसाधारणपणे निश्चित विचारसरणी नसलेले, संकुचित हितसंबंधांचे प्रतिनिधित्व करणारे आणि व्यक्तिकेंद्रित असल्यामुळे श्रीमती गांधींच्या वर्चस्वव्यूहामध्ये त्यांना फारसे उपद्रवमूल्य नाही.

खरे तर प्रादेशिक पक्ष विरुद्ध केंद्रसत्ता ह्या वादामुळे स्वायत्ततेच्या प्रश्नाला चुकीचे स्वरूप प्राप्त होते. कारण रोमेश थापर यांनी अलीकडे म्हटल्याप्रमाणे भारतामध्ये आपण भांडवलशाही अर्थव्यवस्था निर्माण केली असल्यामुळे तिचे प्रादेशिक घटक आणि राष्ट्रीय भांडवली हितसंबंध ह्यांच्यांत संघर्ष उभा राहतो. प्रादेशिक हितसंबंध दुय्यम स्थान स्वीकारायला तयार होत नाहीत.[७] स्वायत्ततेला अनुकूल भूमिका घेणे म्हणजे ह्या प्रादेशिक हितसंबंधांची बाजू घेणे नव्हे. पण काहीजण मात्र असे मानतात, की स्वायत्ततेची प्रत्येक मागणी ही भांडवलदारांचा कट आहे आणि केंद्रीकरण हे नेहमीच समाजवादी व्यवस्था निर्मिण्यासाठी उपयुक्त ठरते. हाच युक्तिवाद करून कॉ. डांगे पुढे म्हणतात, " समाजवादाच्या चौकटीतही विकेंद्रित शासन बसणार नाही. भांडवलशाही अगर समाजवादी व्यवस्थेत केंद्रानुवर्ती संघराज्यच असले पाहिजे. "[८]

थापर आणि डांगे दोघेही भारतात भांडवलशाही आहे असे म्हणतात. त्यांचा हा दावा योग्यच

आहे. पण डांगे म्हणतात त्याप्रमाणे आपण केंद्रीकरणाचा पुरस्कार करून चालेल काय? माझे उत्तर नकारार्थी आहे. भारतात ' केंद्रानुवर्ती संघराज्य ' असण्याचा आपल्याला अनुभव आहेच. पण त्याने काय साधले ? तर भारतामध्ये भांडवलशाही अर्थव्यवस्था त्यामुळे पक्की झाली. म्हणजे केंद्रीकरणाने भांडवलशाहीच्या विकासालाच मदत झाली. ह्या पार्श्वभूमीवर केंद्रीकरणाचा पाठपुरावा केल्याने समाजवाद न येता वर्चस्ववादी शक्तींना मात्र मदत होईल.

## राजकीय व्यवहाराचा प्रश्न

भारतात दुर्बल किंवा पंगू केंद्र असून चालणार नाही. त्यामुळे नव्याने अधिकारवाटप करण्याची आनंदपूरसाहिब योजना हा उपाय ठरू शकत नाही. त्याचप्रमाणे केंद्रात राष्ट्रीय पक्ष आणि प्रांतात प्रांतीय–प्रादेशिक पक्ष अशी विभागणीही उपयोगाची नाही. कारण प्रादेशिक पक्षांचे स्थान बळकट केल्याने प्रश्न सुटणार नाही. आज प्रादेशिक पक्ष अस्तित्वात आहेत याचे कारण पक्षपद्धतीची झालेली मोडतोड हे आहे. खरा प्रश्न आहे तो घटक राज्यांना व्यावहारिक स्वातंत्र्य देण्याचा. सत्ताधारी काँग्रेसपक्ष हा एकसाची बनल्यामुळे त्याची राज्यातील मंत्रिमंडळे ही नावापुरती, शोभेपुरती उरली आहेत. आपल्यापुढे खरा प्रश्न आहे तो असा, की आपला राजकीय व्यवहार संघराज्याच्या व्यवस्थेला अनुरूप असा होणार की नाही ? स्थानिक प्रश्न, स्थानिक भांडणे, स्थानिक सत्तास्पर्धा ह्या गोष्टी स्थानिक पातळीवर सोडविल्या जाणार की केंद्रीय पातळीवर ? म्हणजेच केंद्र–राज्य संबंधाचा प्रश्न नुसता घटनात्मक नसून राजकीय व्यवहाराशी संबंधित आहे. संघराज्याला अभिप्रेत असणारे विकेंद्रीकरण नुसते घटनेत असून उपयोगाचे नाही; आपल्या पक्षीय राजकारणात ते विकेंद्रीकरण दिसले पाहिजे. पक्षीय राजकारण (आणि सर्वांत मोठा पक्ष असलेल्या काँग्रेसचे राजकारण) मुख्यत: 'केंद्रानुवर्ती' स्वरूपाचे आहे. त्याचे परिणाम आपण पाहतो–अनुभवतो आहोत. केंद्रानुवर्ती राजकारण वर्चस्ववादाला खतपाणी घालते. आणि इतर विरोधी पक्षही व्यक्तिकेंद्रित आहेत, त्यामुळे तेही 'केंद्रानुवर्ती' राजकारणाकडेच झुकतात.

सारांश, आपल्या देशातील केंद्र–राज्य संघर्षात (आणि खरे तर इतरही राजकीय संघर्षांमध्ये) दोन प्रश्न मूलभूत आहेत : आपण निर्माण केलेल्या राजकीय रचनांच्या ( structures ) आशयाशी आपण प्रामाणिक राहणार आहोत की नाही ? आणि औपचारिक राजकीय रचनांच्या हेतूंना अनुरूप असे राजकीय वर्तनाचे ( behaviour ) आकृतिबंध आपण निर्माण करणार आहोत का ? ह्या दोन्ही प्रश्नांची उत्तरे आपल्या राजकीय नेतृत्वाला द्यावी लागतील. जर ती होकारार्थी असतील, तरच राजकीय संघर्षातून काही विधायक निष्पत्ती होऊ शकेल.

## संदर्भ व टीपा :

१. मूळ घटनेमध्ये संघसूचीत ९७, राज्यसूचीमध्ये ६६ आणि संयुक्तसूचीत ४७ विषय होते. विविध घटनादुरुस्त्यांनी काही विषय कमी केले तर काहींची भर घातली. त्यामुळे सध्या ही संख्या अशी आहे– संघसूची–९८, राज्यसूची–६१ आणि संयुक्तसूची ५२ (सातवे परिशिष्ट).

२. "...the modernist elite was much attracted to... the idea of a centralized nation-state..." रजनी कोठारी, 'Politics in India' दिल्ली, ओरिएन्ट लाँगमन, १९७०, पृ. ८९.

३. अधिक तपशीलासाठी पहा : श्रीराम महेश्वरी, 'President's Rule in India' दिल्ली, मॅकमिलन, १९७७, प्रकरण ३ रे, पृ. २४–५२.

४. अधिक तपशीलासाठी– महेश्वरी, वरीलप्रमाणे. महेश्वरी यांनी १९५१ ते ७७ ह्या काळातील प्रत्येक राष्ट्रपती-राजवटीमागील परिस्थितीचा तपशील दिला आहे. अर्थात त्यांचे पुस्तक १९७७ पूर्वी

लिहिलेले असल्यामुळे त्यापुढील अनेक प्रसंगांचा तपशील त्यात नाही. १९७७ नंतर जनता पक्षाने आणि १९८० नंतर काँग्रेसने एकेकदा नऊ राज्यांत एकदम घाऊकरीत्या राष्ट्रपती-राजवट आणली !

५. सत्यरंजन साठे, 'केंद्र-राज्य संबंध : काही घटनात्मक प्रश्न', साधना, स्वातंत्र्यदिन विशेषांक, १९८३ (वर्ष ३६, अंक १–२), पृ. २५–२६.

६. रजनी कोठारी, पूर्वोक्त, पृ. १६६.

७. रोमेश थापर, 'दी प्रॉब्लेम' सेमिनार, २८९, सप्टें. १९८३, पृ. १२. ('सेमिनार'चा हा अंक 'संघराज्य' ह्याच विषयावर आहे.)

८. कॉ. श्रीपाद अमृत डांगे, 'राज्यांची जादा अधिकारांची मागणी राष्ट्रीय एकात्मतेस विघातक साधना, पूर्वोक्त, पृ. ३१–३३ (अवतरण, पृ. ३२).







अनुक्रमणिका

# आसामचा प्रश्न

प्र. म. बांदिवडेकर

## प्रास्ताविक

सकृत्दर्शनी आसामचा प्रश्न परकीय अतिक्राम-कांना देशाबाहेर हाकलून देण्यापुरता मर्यादित आहे, असे वाटते. परंतु अधिक खोलवर जाऊन या प्रश्नाचा शोध घेतला असता त्यामधील विलक्षण गुंतागुंत जाणवते. स्वातंत्र्योत्तर कालामध्ये भारताला ज्या अनेकविध स्वरूपाच्या बिकट आर्थिक, राजकीय, सामाजिक, सांस्कृतिक व धार्मिक समस्यांना सात-त्याने तोंड द्यावे लागत आहे, त्या सर्व समस्यांतून निर्माण होणारे महत्त्वाचे प्रश्न आसामच्या प्रश्नात एकवटले आहेत, असे दिसून येते. दीर्घकाळ या प्रश्नाची उपेक्षा झाल्याने आता एकाएकी या प्रश्नाची उकल करणे हे अतिशय कठीण कार्य झालेले आहे.

तसे पाहिले, तर आसामातील आजची चळवळ १९७९ मध्ये सुरू झाली. परंतु प्रश्न फार जुना आहे. ऑल आसाम स्टूडंट्स युनियन (आसू)ने १९७४ मध्ये जाहीरपणे जेव्हा हा प्रश्न उपस्थित केला, तेव्हादेखील या प्रश्नातून मोठे आंदोलन निर्माण होणार आहे व ते वणव्याप्रमाणे पेट घेणार आहे याची कल्पना कोणत्याही राजकीय पक्षाला व विचारवंतांना आली नाही. याचे मुख्य कारण म्हणजे भारताच्या ईशान्य कोपऱ्यातील या राज्याकडे भारतीय नेत्यांचे तसे स्वातंत्र्यपूर्वकालापासून दुर्लक्षच झालेले आहे. एकंदरित भारतीय जनतेलादेखील आसामी लोक व त्यांची संस्कृती यांची इतर घटक-राज्यांपेक्षा कमी ओळख आहे. आसामबाबतची ही अनास्था खूप जुनी आहे. महात्मा गांधींनी आपल्या 'हिंदस्वराज्य' मध्ये आसामात पूर्वी ठग व पेंढाऱ्यांसारखे लोक राहत होते, असे आसामी लोकांच्या भावना दुखावणारे विधान केले. पुढे म. गांधींना आपली चूक उमजली व त्यांनी 'यंग इंडिया'त 'सुंदर आसाम!' या नावाचा लेख लिहून आपल्या पूर्वीच्या विधाना-बाबत पश्चात्ताप व्यक्त केला आणि चुकीची भरपाई करण्याचा प्रयत्न केला. भारतीय संघराज्याला सध्याचे एकसंध स्वरूप प्राप्त करून देणारे झुंजार नेते सरदार वल्लभभाई पटेल यांना आसामच्या समस्येचे काहीसे आकलन झालेले होते, असे वाटते. परंतु पंडित जवाहरलाल नेहरू किंवा मौलाना अबुलकलम आझाद यांच्यासारख्या अन्य राष्ट्रीय नेत्यांच्या बाबत तेवढेही म्हणता येत नाही. पहिल्या प्रमादानंतर महात्मा गांधींनी मात्र आसामची वेदना कोणाही अन्य राष्ट्रीय नेत्याहून अधिक प्रमाणात जाणून घेतली व त्याबद्दल आसामी जनतेमध्ये आजही कृतज्ञतेची भावना आढळते. या पार्श्वभूमीवर चरणसिंग किंवा चंद्रशेखर यांच्या-सारखे राजकीय नेते आसामबाबतच्या आपल्या अज्ञानाची मनमोकळी कबुली देतात किंवा इंदिरा गांधींनासुद्धा या प्रश्नाचे गांभीर्य जरा उशीराच जाणवले, यात आश्चर्य मानण्याचे कारण नाही.

आसाम प्रश्नाचा विचार करताना प्रारंभीच दोन महत्त्वाच्या गोष्टी लक्षात घेतल्या पाहिजेत. एक तर आसामचा प्रश्न हा केवळ आसामचाच नसून त्याचा अभ्यास ईशान्य भारताच्या समस्येचा एक भाग म्हणून केला पाहिजे. दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे या प्रश्नाला कमीत कमी सातशे वर्षांची पार्श्वभूमी आहे. निदान त्यांपैकी अलीकडच्या सुमारे दीडशे वर्षांचा संदर्भ नीट विचारात घेतला पाहिजे. त्या-शिवाय या समस्येचे खरे स्वरूप आकलन होणार नाही. या दोन्ही गोष्टी दोन स्वतंत्र लेखांचे विषय आहेत. त्यामुळे तत्संबंधी काही महत्त्वाच्या गोष्टींचाच निर्देश करून प्रस्तुत लेखामध्ये आसामच्या सध्याच्या समस्येचे स्वरूप, तेथील आंदोलन व समस्ये-वरील उपाययोजना यांवर अधिक लक्ष केंद्रित केले आहे.

## ऐतिहासिक पार्श्वभूमी

आसामची भौगोलिक रचना व स्थान वैशिष्टयपूर्ण आहे. हे राज्य सिलीगुडीच्या पूर्वेला भारताशी चिंचोळ्या पट्टीने जोडलेले आहे. साहजिकच भारताची मुख्यभूमी व हे राज्य यांत दळणवळण व वाहतूक या संबंधीच्या अनेक अड-चणी निर्माण झाल्या आहेत. १५ ऑगस्ट १९४७ ते २६ जानेवारी

अनुक्रमणिका

१९५० या कालावधीत तर आसामचा भारताच्या मुख्यभूमीशी रेल्वेमार्गाने तसेच भूमार्गाने संबंध तुटलेला होता. ही चमत्कारिक अवस्था हिंदुस्थानच्या फाळणीमुळे व पूर्व पाकिस्तानच्या (आताचा बांगला देश) निर्मितीमुळे झाली होती. फाळणीमुळे आसामचा सिल्हेट जिल्हा पूर्व पाकिस्तानमध्ये गेला. डिसेंबर १९६३ मध्ये आसामच्या प्रदेशातून नागालँड हे स्वतंत्र घटकराज्य व एप्रिल १९७० मध्ये मेघालय हे स्वायत्त राज्य निर्माण करण्यात आले. यानंतर जानेवारी १९७२ मध्ये मेघालयास स्वतंत्र घटकराज्याचा दर्जा मिळाला आणि मिझोराम व अरुणाचल प्रदेश हे दोन केंद्रशासित प्रदेश म्हणून आसामपासून अलग करण्यात आले. अशा रीतीने स्वातंत्र्यानंतर आसाम हे भारतातील एकमेव असे घटकराज्य आहे, की ज्याचे विच्छेदन होऊन मूळचा भूप्रदेश बराच कमी झाला आहे. अशा या आजच्या आसामचे क्षेत्रफळ ७९,५२३ चौ. किलोमीटर असून १९७१ च्या जनगणनेप्रमाणे लोकसंख्या १,४६,२५,१५२ इतकी आहे. आसामच्या वायव्येस व उत्तरेस भूतान, उत्तरेस व ईशान्येस अरुणाचलप्रदेश व त्यापलीकडे तिबेट, पूर्वेस अरुणाचलप्रदेश, नागालँड व मणिपूर, दक्षिणेस मेघालय व मिझोराम, नैऋत्येस त्रिपुरा आणि पश्चिमेस बांगला देश व पश्चिम बंगालचे जलपैगुरी व कुचबिहार हे जिल्हे आहेत. आसामची पूर्वीची राजधानी शिलांग मेघालयात गेल्याने सध्या राजधानीचे ठिकाण गौहत्तीमधील दिसपूर हे आहे.

आसामला फार मोठी ऐतिहासिक आणि सांस्कृतिक परंपरा आहे. दुर्दैव एवढेच, की आसामच्या या प्राचीन परंपरेची आज आपणाला पुरेशी ओळख राहिलेली नाही. रामायणकाळात आसाम प्राग्ज्योतिष व प्राचीनकाळात कामरूप या नावांनी विख्यात होता. आसामचे भूतपूर्व मुख्यमंत्री श्री. गोपीनाथ बोर्डोलोई यांनी मे १९४९ मध्ये डेहराडून येथे भरलेल्या अखिल भारतीय काँग्रेस समितीच्या अधिवेशनात भाषण करताना असे उद्गार काढले, की आजच्यापेक्षा निदान पूर्वीच्या भारतीयांना तरी आसामची ओळख अधिक होती. त्यांचे हे उद्गार आजच्या परिस्थितीत अगदी सार्थ वाटतात. प्रस्तुत लेखाच्या संदर्भात आसामच्या या सांस्कृतिक वारशाचा शोध न घेता आपण तेराव्या शतकापासून सुरवात करू. या शतकामध्ये सध्याच्या थायलंडमधील शानवंशीय किंवा ताई लोक ब्रह्मदेशावाटे ब्रह्मपुत्रेच्या खोऱ्यात येऊन स्थायिक झाले व पुढे राज्यकारभार करू लागले. स्थानिक लोकांनी त्यांना 'अहोम' हे नाव दिले व बहुधा त्यावरूनच आसामला आसाम हे सध्याचे नाव प्राप्त झाले असावे ('असम' या संस्कृत शब्दापासूनही आसामची व्युत्पत्ती सांगता येते). अहोमांनी आसाममध्ये केवळ आपली सत्ताच प्रस्थापित केली असे नव्हे, तर त्यांनी आसामवरील मुघलांची आक्रमणे यशस्वी रीतीने थोपवून धरली. लचित बारफूकन या अहोम सेनापतीने मुघल सैन्याचा पराभव केला, त्या शौर्याच्या आठवणी आसामी जनतेने आपल्या हृदयात जपून ठेवल्या आहेत. मुघल सैन्याच्या केलेल्या पराभवाविषयी आसामी जनतेला अभिमान वाटतो, या ऐतिहासिक संदर्भाला महत्त्व आहे.

अठराव्या शतकाच्या पूर्वार्धात अहोमांनी हिंदुधर्माचा पूर्णतया स्वीकार केला. त्यांनी विद्याकलांना उत्तेजन दिले. पाईकपद्धती नावाची एक सारावसुलीची अभिनव पद्धती सुरू केली. त्यामध्ये सैन्यभरती आणि जमिनीची कसणूक या दोन्ही गोष्टींची सांगड घालण्यात आली होती. या पाईकपद्धतीने आसाममध्ये एक प्रकारचे सामाजिक स्थैर्य निर्माण करण्याचा अहोमांनी प्रयत्न केला. परंतु यानंतर मात्र अहोमांवर शाक्त पुरोहितवर्गाने आपले वर्चस्व प्रस्थापित केल्याने धार्मिक कलहांना ऊत आला. परंतु सुदैवाने त्याअगोदरच्या शतकात श्रीशंकरदेव या थोर पुरुषाने स्थापन केलेल्या एकसारनीय पंथाने हिंदुसंस्कृतीची वैशिष्ट्ये टिकवून धरली. नाहीतर कदाचित आसाम हा ब्रह्मदेशाचाच एक भाग झाला असता. आसाममधील अंतर्गत कलहात ब्रह्मदेशाने हस्तक्षेप करून आपली सत्ता प्रस्थापित करण्याचा प्रयत्न चालवला होता. याच वेळी म्हणजे अठराव्या शतकाच्या उत्तरार्धापासून ईस्ट इंडिया कंपनीचा आसामशी व्यापार चालू करण्याचा प्रयत्न होताच. अहोमांनी ब्रह्मदेशापासून संरक्षण करण्याच्या इराद्याने १८१७ पासूनच ब्रिटिशांची मदत मागण्यास सुरवात केली होती. अखेरीस १८२४ मध्ये ब्रिटिशांनी अहोमांना मदत देऊ केली व दोन वर्षे ब्रह्म-









देशाशी युद्ध करून यांदबोच्या तहानुसार १८२६ मध्ये आसाममध्ये आपले पाय रोवले. हळूहळू १८४२ पर्यंत आसाम व सभोवतालचा सर्व प्रदेश कंपनीने खालसा केला. ब्रिटिशांचा आसामसंबंधीचा सर्व कारभार प्रारंभी कलकत्त्याहून चालत असे व आसामसाठी फक्त एक आयुक्त नेमलेला होता. साहजिकच या काळात आसाम हा बंगालचाच एक भाग होता. सुमारे पन्नास वर्षांनी ही स्थिती बदलण्यात आली व आसाम हा एक स्वतंत्र प्रांत करून त्यासाठी मुख्य आयुक्ताची नेमणूक करण्यात आली.

## वाढत्या लोकसंख्येची समस्या

कालांतराने ब्रिटिशांनी आपल्या व्यापारी व साम्राज्यवादी धोरणाला अनुसरून परदेशनिर्यातीसाठी विविध वस्तूंचे उत्पादन करण्यास उत्तेजन देण्यास सुरवात केली. चहाच्या बाबतीत चीनचे वर्चस्व कमी करण्यासाठी १८३४ ते १८५४ च्या दरम्यान चहाचे मळे तयार करण्यास ब्रिटिश व्यापाऱ्यांना अनेक सवलती दिल्या. १९०१ मध्ये रेल्वे आणली. चहाबरोबरच ज्यूट, निळीचे मळे व तेलाच्या खाणी यांमुळे या प्रदेशाचे महत्त्व वाढत गेले. परंतु या सर्वांमध्ये एक मुख्य अडचण निर्माण झाली होती. अगोदरच्या काळातील मुघलांच्या स्वाऱ्या, तसेच अहोमांच्या नंतरच्या काळातील अंतर्गत यादवीयुद्धांमुळे फार मोठी प्राणहानी झाली, अनेक लोकांनी स्थलांतर केले व यामुळे लोकसंख्या कमी होऊन बराच भाग ओसाड झाला. ही मुबलक प्रमाणामध्ये मोकळी राहिलेली जमीन कसणुकीखाली आणणे, तसेच चहाच्या मळ्यांमध्ये व अन्य ठिकाणी कष्टाची कामे करण्यासाठी मोठ्या प्रमाणावर मजूर उपलब्ध करून देणे, असा हा प्रश्न होता. ब्रिटिश सत्तेच्या व्यापारी धोरणामुळे हळूहळू बाहेरच्या प्रांतांतून आसाममध्ये लोकांचा भरणा होऊ लागला. बिहारातील छोटा नागपूर, ओरिसा, उत्तर प्रदेश इ. ठिकाणांहून चहाच्या मळ्यांवर काम करण्यासाठी हजारो मजूर येऊ लागले व ते आसाममध्ये स्थायिक झाले. व्यापाराची वाढ करण्यासाठी ब्रिटिशांनी राजस्थानातील मारवाड्यांना आसामात येण्यास उत्तेजन दिले. सैन्याच्या पलटणीत भरती करण्यासाठी नेपाळी गुरखा आणले आणि सर्वांत मुख्य म्हणजे ब्रिटिशांच्या कचेऱ्यातून सर्वत्र बंगाली बाबू दिसून येऊ लागले. ब्रिटिशांनी आपल्या कचेऱ्यांतून स्थानिक आसामी लोकांऐवजी बंगाली लोकांना का प्राधान्य दिले, ही गोष्ट जाणून घेण्यासारखी आहे. सुरवातीला स्थानिक अहोमांचा वापर कारकुनी कामासाठी करण्याचा ब्रिटिशांनी प्रयत्न केला; परंतु तो पूर्णतया अयशस्वी ठरला. एक तर इंग्रजी भाषा व ब्रिटिश आचारविचारांचा बंगाली लोकांमध्ये सर्वांत अगोदर प्रसार झाल्याने ब्रिटिशांना ते जवळचे वाटल्यास नवल नव्हते. परंतु त्यापेक्षाही महत्त्वाची वस्तुस्थिती अशी होती, की अहोमांची सारावसुलीची पद्धती व ब्रिटिशांची सारावसुलीची पद्धती यांत जमीनअस्मानाचा फरक होता. हा नवीन बदल जाणून घेण्यास स्थानिक आसामी असमर्थ ठरले. याचा अपरिहार्य परिणाम म्हणून आसाममधील सरकारी कचेऱ्यांत सर्वत्र बंगाली कारकून व कनिष्ठ अधिकारी यांचा सुळसुळाट झाला. आणखी काही वर्षांनंतर म्हणजे साधारणतः १९१० पासून आसाममध्ये पूर्व बंगालमधून व विशेषतः तेथील मेमेनसिंग जिल्ह्यातून बंगाली मुसलमानांचा ओघ सुरू झाला व ते आसामातील ब्रह्मपुत्रेच्या सखल प्रदेशातील 'चार' जमिनींची कसणूक करून स्थायिक होऊ लागले. या जमिनींवर कष्ट करणे त्रासदायक होते. पूर्वी या जमिनींचा वापर फक्त गुरे चारण्यासाठी व आलटूनपालटून तांदळाचे पीक घेण्यासाठी होत असे. ज्यूटची आसाममधील लागवड ही या नवागत मेमेनसिंगीय मुसलमानांची आसामला देणगी आहे. परंतु हळूहळू या मुसलमानांची संख्या एवढ्या मोठ्या प्रमाणावर वाढत चालली की, सी. एस्. मुल्लन या १९३१ मधील जनगणनेच्या अधीक्षकांनी आपल्या अहवालामध्ये त्याची खास नोंद केलेली आहे. मुल्लन यांच्या मते १८२० च्या ब्रह्मी आक्रमणापेक्षा आसामच्या भवितव्यावर प्रहार करणारी अत्यंत महत्त्वाची घटना म्हणजे गेल्या वीस वर्षांतील पूर्व बंगालातील व विशेषतः मेमेनसिंग जिल्ह्यातील मुसलमानांचे आसामातील आगमन ही होय. मुल्लन यांनी पुढे असेही नमूद केलेले आहे, की मुसलमानांचे हे आगमन असेच चालू राहिले, तर आसाममध्ये केवळ शिवसागर या जिल्ह्यापुरतेच स्थानिक आसामी लोक बहुसंख्येने राहतील व

इतर सर्व जिल्ह्यांतून ते अल्पसंख्य बनण्याचा संभव आहे.

आसाममध्ये बाहेरून येणाऱ्यांच्या वाढत्या संख्येमुळे आसामी लोकांचे जीवन व संस्कृती यांना धोका निर्माण होणार आहे याची जाणीव ब्रिटिश अधिकाऱ्यांना अजिबात नव्हती, असे नाही. बंगालच्या गव्हर्नरने जेव्हा आसाममधील जमीन कसणुकीखाली आणण्यासाठी उदार सवलती देऊ केल्या तेव्हा, त्याला १८३६ मध्येच मेजर जेन्किन्स या आयुक्ताने विरोध दर्शविला व या सवलतींचा बंगालमधील जमीनदार गैरफायदा घेतील, अशी भीती व्यक्त केली. तथापि काही किरकोळ सुरक्षा-उपाय योजण्याचे ठरवून गव्हर्नरने १८३८ पासून त्या सवलती अमलात आणल्या. परंतु आसाममध्ये टेकड्यांवर राहणारे आदिवासी लोक या बाहेरून येणाऱ्या लोकांना घाबरून जेव्हा जंगलातील अंतर्गत भागात आश्रय घेऊ लागले, तेव्हा मात्र १८७३ मध्ये हॅमिल्टनने एक 'अंतर्गत रेषा' आखून दिली व तिच्या पलीकडे बाहेरचे लोक जाणार नाहीत, अशी व्यवस्था केली. आदिवासींना हॅमिल्टनने हे जे संरक्षण दिले, ते हिंदूंपासून होते– युरोपियनांपासून नव्हे, ही गोष्ट येथे लक्षात ठेवली पाहिजे. ख्रिश्चन धर्मप्रसारकांना आदिवासींमध्ये धर्मप्रसार करण्याची मुभा होती. खरे म्हणजे हॅमिल्टनला भारतीय समाजरचनेची यथार्थ जाणीव झालेलीच नव्हती. आदिवासींची स्वायत्तता राखण्यामागे स्थानिक आसामी लोक व आदिवासी यांच्या पूर्वापार संबंधांचा त्याने नीटसा विचार केलेला नव्हता. परिणामी या 'अंतर्गत रेषे'च्या नियमामुळे आदिवासी लोक व स्थानिक आसामी यांच्यातील दुरावा वाढत गेला. आजचे आसामचे विघटन हा हॅमिल्टनच्या धोरणाचा अपरिहार्य परिणाम आहे, असे म्हणता येईल.

पूर्व बंगालमधील आवागतांची संख्या जशी वाढू लागली, त्याबरोबर त्यांची वसती सुनियोजित करण्याच्या हेतूने ब्रिटिशांनी १९२० मध्ये आणखी एक 'बाह्य रेषा' आखून दिली. नवीन आलेल्यांनी या रेषेच्या पलीकडे जायचे नव्हते. परंतु तरीदेखील अनेक आसामी लोक आपली जमीन बंगाली मुसलमानांना भाडेपट्टीने देत असत व त्यामुळे या रेषेचे पूर्णपणे पालन होत नव्हते. उलट, त्यामधून अनेक गुंतागुंतीचे कायदेशीर प्रश्नही निर्माण होऊ लागले.

मध्यंतरीच्या काळात १९०५ मध्ये बंगालची फाळणी झाली आणि आसाम फाळणी झालेल्या व मुस्लिम बहुसंख्य असलेल्या पूर्व भागाला जोडला गेला. आसामच्या देखरेखीसाठी एक नायब राज्यपाल नेमण्यात आला. पुढे १९११ मध्ये बंगालमधील प्रचंड आंदोलनानंतर ही फाळणी रद्द करण्यात आली व आसाम पूर्ववत मुख्य आयुक्ताचा प्रदेश बनला. त्यानंतर १९१९ च्या कायद्यानुसार आसामला राज्यपालाचा प्रांत असा दर्जा प्राप्त झाला. याच काळात म्हणजे १९१८ मध्ये आसाम ॲसोसिएशन ही संस्था राष्ट्रीय काँग्रेसमध्ये विलीन झाली व आसाम राष्ट्रीय प्रवाहात सामील झाला. राष्ट्रीय चळवळीने आसाममधील सामाजिक व राजकीय जीवनामध्ये दूरगामी स्वरूपाचे बदल होऊन चैतन्य निर्माण झाले. विशेष म्हणजे शिक्षणाचा प्रसार जोमाने सुरू झाला. ब्रिटिशांनी १९०१ मध्येच इंग्रजी माध्यमाचे महाविद्यालय सुरू केले असले, तरी इंग्रजी शाळांची संख्या फक्त २८ एवढीच होती. याउलट, राष्ट्रवाद्यांनी २२० शाळा सुरू केल्या.

१९३५ मध्ये भारत शासन कायदा अस्तित्वात आल्यानंतर उत्तर आसाममध्ये आदिवासी प्रांत स्थापन करून दक्षिण आसाम हा मुस्लिम बहुसंख्याकांचा प्रांत निर्माण करण्याचा कुटिल डाव ब्रिटिश मुत्सद्यांनी टाकला होता. महात्मा गांधींना या डावपेचांची पूर्ण कल्पना होती. त्यामुळेच १९३९ मध्ये सर्व लोकनियुक्त काँग्रेस मंत्रिमंडळांनी राजीनामा देण्याचा आदेश काँग्रेस कार्यकारिणीने दिला असला, तरी लोकप्रिय गोपीनाथ बोर्डोलोई यांच्या नेतृत्वाखालील आसामातील काँग्रेस मंत्रिमंडळाने राजीनामा देऊ नये, अशी महात्मा गांधींची इच्छा होती. परंतु शेवटी तत्कालीन काँग्रेसाध्यक्ष मौलाना अबुलकलम आझाद यांच्या दडपणामुळे बोर्डोलोई मंत्रिमंडळाला आपला राजीनामा द्यावा लागला. या बाबतीत आपण दाखविलेल्या दुर्बलतेची कबुली स्वतः महात्मा गांधींनी १९४६ मध्ये देऊन त्याबाबत खेद व्यक्त केलेला आहे. १९४६ मध्ये कॅबिनेट मिशन योजना मांडण्यात आली व तीनुसार राज्यांचे तीन गट करावयाचे होते. त्यामध्ये 'क'



अनुक्रमणिका

गटात बंगालबरोबर आसामचा समावेश करण्यात आला होता. गोपीनाथ बोर्डोलोईंनी 'क' गटामध्ये आसामचा समावेश करण्यास कॉंग्रेस कार्यकारिणीत प्रखर विरोध केला व अखेर कॅबिनेट मिशन योजना बारगळली. बोर्डोलोई यांच्या खंबीर नेतृत्वामुळेच आसाम भारतामध्ये राहू शकला. नाहीतर कॉंग्रेस-नेत्यांनी आसामवर जवळजवळ तिलांजली सोडलीच होती.

स्वातंत्र्यानंतरच्या दोन वर्षांमध्ये पूर्व पाकिस्तानातून तेथील धार्मिक छळणुकीमुळे हजारो हिंदू बंगाली निर्वासित आसाममध्ये आले. १९४७ ते १९४९ या काळात आसामच्या लोकसंख्येत एकदम १५% वाढ झाली. हिंदू निर्वासितांबरोबर या काळात मुस्लिम अतिक्रामकांची आवक चालूच होती. त्याला तोंड देण्यासाठी म्हणून १९५० मध्ये आसामातील अतिक्रामकांना हुसकावून लावण्याबाबतचा कायदा करण्यात आला. परंतु त्याची प्रत्यक्ष अमलबजावणी कधीच होऊ शकली नाही. कारण या कायद्याची अमलबजावणी करण्याचे अधिकार व जबाबदारी केंद्रसरकारची होती. १९७१ च्या बांगला देश स्वातंत्र्यसंग्रामामध्ये तर लक्षावधी मुसलमान आसामात आले. त्यानंतर इंदिरा गांधी व मूजीबर रहमान यांच्यामध्ये झालेल्या समझोत्याप्रमाणे १९७१ मध्ये आलेल्या या सर्व निर्वासितांची पुनः बांगला देशमध्ये पाठवणी करावयाची होती.

आसामच्या वाढत्या लोकसंख्येबाबत काही आकडेवारी उद्‌बोधक ठरेल. आसामची लोकसंख्या (सध्याचा विस्तार लक्षात घेऊन) १९०१ मध्ये ३·२९ दशलक्ष इतकी होती ती १९७१ मध्ये चौपट म्हणजे १४·६३ दशलक्ष झाली याच काळात भारतीय लोकसंख्येची वाढ १३०% झाली हे लक्षात घेता आसामातील लोकसंख्येच्या वाढीचा वेग किती असाधारण व प्रचंड आहे, ते लक्षात येते. नागालॅंड, मेघालय ही स्वतंत्र राज्ये व अरुणाचलप्रदेश व मिझोराम हे केंद्रशासित प्रदेश यांच्या निर्मितीमुळे आसामचे क्षेत्रफळ २,२३,५९० किलोमीटरहून ७८,५२३ किलोमीटर एवढे कमी झाले. परंतु लोकसंख्या मात्र १९६१ तील जनगणनेपेक्षा १९७१ मधील जनगणनेमध्ये ३४·९५% इतकी वाढली. याच दशकात एकूण भारतातील लोकसंख्येची वाढ २४·८०% एवढी आहे. याचाच अर्थ असा, की सामान्य वाढीपेक्षा आसामची लोकसंख्या या काळात दहा टक्क्यांनी अधिक वाढली.

१९११ ते १९५१ या काळात आसामच्या लोकसंख्येचा दशवार्षिक वाढीचा वेग सरासरी १९·४% होता. तो पुढील दशकांमध्ये ३५% इतका वाढला. म्हणजेच साधारण सरासरीपेक्षा १५% इतकी अधिक वाढ झाली. आसामची लोकसंख्या ७१ च्या जनगणनेप्रमाणे १४·६३ दशलक्ष होती, ती भारतातील लोकसंख्येच्या सामान्य वाढीच्या वेगाने वाढली असती तर फक्त ७·६ दशलक्ष एवढीच झाली असती याचाच अर्थ असा की, सुमारे ७ दशलक्ष इतकी लोकसंख्या आसामात बाहेरून आलेली आहे. प्रत्यक्षात बाहेरून आसामात आलेल्या लोकांची संख्या याहूनही अधिक असणार; कारण बाहेरून येणाऱ्यांची संख्या एकोणिसाव्या शतकाच्या मध्यापासूनच वाढू लागली होती.

आसामातील जिल्ह्यांपैकी फक्त एका शिवसागर जिल्ह्यात तेवढी समतोल वाढ झालेली दिसते. १९११ ते ७१ या काळात या जिल्ह्यात १७·४% या वेगाने लोकसंख्या वाढली. बाकीच्या जिल्ह्यांत मात्र असाधारण वेगाने लोकसंख्या वाढलेली दिसते.

आसामच्या या असाधारण लोकसंख्यावाढीचे आणखी एक महत्त्वाचे वैशिष्टय म्हणजे मुस्लिम लोकसंख्येची झालेली वाढ. १८७१ मध्ये एकूण २,१२१,०२५ लोकसंख्येपैकी मुस्लिमांची संख्या २५०,४७० इतकी म्हणजे ११·७% होती. १९७१ मध्ये एकूण लोकसंख्या १४,६२५,१५२ झाली व त्यामध्ये मुस्लिमांची संख्या ३,५९४,००६ इतकी म्हणजे २४·०३% झालेली आहे. आज आसामच्या कित्येक जिल्ह्यांत तर अशी स्थिती निर्माण झालेली आहे, की तेथे कालांतराने मुस्लिमांची संख्या हिंदूपेक्षा अधिक होण्याचा संभव आहे. उदाहरणार्थ, १८७१ मध्ये गोलपारा जिल्ह्यात मुस्लिमांची संख्या फक्त २१·१% होती ती १९७१ मध्ये ४२·२५% झाली. इतर जिल्ह्यांची उदाहरणे द्यायची झाली, तर दारंगमध्ये ५·९ हून १६·९, कामरूपमध्ये ३·२ हून २८·९३ व नौगांगमध्ये ३·९ हून ३९·३९ टक्के अशी मुस्लिम लोकसंख्येची वाढ झाली आहे.







अनुक्रमणिका

अधिकृत सरकारी आकडेवारीनुसार १९५१–६१ या दशकामध्ये आसामात २२०,६९० पाकिस्तानी अतिक्रामकांना शोधून काढण्यात आले. १९६१ ते १९७१ या दशकामध्ये आणखी १९२,३३९ अतिक्रामक हुडकून काढण्यात आले. १९७१ च्या बांगला देश मुक्तिसंग्रामामध्ये १,१००,००० निर्वासितांनी आसाममध्ये आश्रय घेतला. त्यांपैकी बहुसंख्य निर्वासित परत गेले असले तरी साधारण १००,००० निर्वासित आसाममध्येच राहिले असावेत असा अंदाज आहे. १९७२ ते १९७८ या काळात ९९,५८३ बांगलादेशी अतिक्रामक आसामी पोलिसांनी शोधून काढले. शोधून न काढलेल्या अतिक्रामकांची गेल्या तीस–पस्तीस वर्षांतील संख्या याहून अर्थातच फार मोठी असणार; कारण अनेक अतिक्रामक आपले नातेवाईक, मित्र व राजकारणी यांच्या साहाय्याने भारतीय नागरिक म्हणूनच वावरत असून त्यांनी आपली नावे मतदारांच्या याद्यांत समाविष्ट करून घेतलेली आहेत. ही सर्व आकडेवारी अर्थातच मती गुंग करणारी आहे, यात काही शंका नाही.

स्वातंत्र्यपूर्व कालामध्ये बाहेरील प्रांतांतून येणाऱ्या लोकांमुळे व त्यामुळे निर्माण झालेल्या लोकसंख्यावाढीच्या असाधारण वेगामुळे आसाममध्ये फारसे तणाव निर्माण झाले नाहीत. लोकसंख्येच्या प्रमाणात अद्यापि जमीन विपुल होती. चहाच्या मळ्यामध्ये व अन्यत्र कष्टाची कामे करणाऱ्या मजुरांबाबत आसामी लोकांत केव्हाच विरोधाची भावना निर्माण झाली नाही; कारण ते आसामी संस्कृतीशी एकरूप झाले व आसामी भाषेचाही त्यांनी सहजपणे स्वीकार केला. बंगाली मुसलमानांनीदेखील प्रारंभी आसामी लोकांशी सामोपचाराचेच धोरण स्वीकारले. लक्षणीय गोष्ट अशी, की अगदी अलीकडील काळापर्यंत आसाममध्ये हिंदु–मुसलमान दंगे कधीही झाले नव्हते. मुसलमानांची आसाममधील मोठी संख्या लक्षात घेता व भारतातील इतर काही ठिकाणी वारंवार उद्भवणाऱ्या हिंदु–मुसलमान दंग्यांच्या संदर्भात ही एक वैशिष्ट्यपूर्ण गोष्ट मानावी लागेल. स्वातंत्र्यपूर्वकालापासून बंगाली हिंदूंबाबत मात्र आसाममध्ये असूया, तिरस्कार व चीड अशा संमिश्र भावना होत्या. बंगाली भाषा व संस्कृती यांचे आसामी भाषेवर व संस्कृतीवर आक्रमण होत असल्याची आसामी लोकांची तक्रार होती. तथापि राष्ट्रीय चळवळीच्या प्रभावामुळे या भावनांचा स्फोट मोठ्या प्रमाणावर झाला नाही. स्वातंत्र्योत्तर कालामध्ये मात्र ही परिस्थिती पालटली; कारण सामाजिक व सांस्कृतिक प्रश्नांना नवे राजकीय परिमाण प्राप्त झाले. प्रौढमतदानपद्धतीमुळे प्रत्येक व्यक्तीचे राजकारणातील मूल्य वाढले. राजकीय सत्ता आसामी लोकांकडे आली, तरी इतर सर्वत्र बंगाली माणसे वरिष्ठ पदांवर व आसामी कनिष्ठ पदांवर अशीच स्थिती होती. मायनर वीनर यांनी म्हटल्याप्रमाणे शिक्षक बंगाली तर विद्यार्थी आसामी, डॉक्टर बंगाली तर रुग्ण आसामी, वकील बंगाली तर अशील आसामी, दुकानदार बंगाली तर तर ग्राहक आसामी, सरकारी नोकर बंगाली तर अर्जदार आसामी अशी ही स्थिती होती. ही स्थिती बदलण्याची जबरदस्त आकांक्षा आसामी लोकांत निर्माण होणे अगदी स्वाभाविक होते. स्वातंत्र्योत्तर कालात आसामी लोकांत शिक्षणाचा प्रसार जसा अधिकाधिक झाला, त्या प्रमाणात आसामी मध्यमवर्गाची वाढ झाली व या मध्यमवर्गाला बंगाल्यांचे वर्चस्व सहन होईना. विशेष म्हणजे बंगाली मध्यमवर्गाची बहुतेक वस्ती ब्रह्मपुत्रेच्या खोऱ्यातील नागरी भागात आहे. आसामातील एकूण ९१३,००० नागरी रहिवाशांपैकी ३५०,००० बंगाली तर ३०४,००० आसामी आहेत. नागरी लोकसंख्येपैकी फक्त ३२·४ टक्के आसामी असून बंगाल्यांचे प्रमाण ३७·९ टक्के एवढे आहे आणि १३ टक्के हिंदीभाषिक आहेत. गोलपारा, दारंग आणि नौगाँग जिल्ह्यांतील बंगाल्यांचे प्रमाण तर ४० टक्के आहे. निराळ्या तऱ्हेने सांगायचे तर ब्रह्मपुत्रेच्या खोऱ्यातील फक्त ५ टक्के आसामी शहरांत राहतात, तर नागरी भागातील बंगाली माणसांचे प्रमाण ४० टक्के आहे.

बदलत्या परिस्थितीच्या संदर्भात आसामी मध्यमवर्ग व बंगाली मध्यमवर्ग यांच्यात संघर्ष होणे अटळ होते. विशेषतः नवसुशिक्षित आसामी बेकारांमुळे या संघर्षाचे स्वरूप अधिक तीव्र झाले. यातूनच आसाममधील भाषिक संघर्षाला तोंड फुटले व १९५१, १९६१ आणि १९७२ मध्ये दंगली झाल्या. त्याचा सविस्तर उल्लेख मागाहून येईलच.

अनुक्रमणिका







स्वातंत्र्योत्तर कालात पूर्व पाकिस्तानातून येणाऱ्या मुसलमानांनी जे एकप्रकारचे निःशस्त्र आक्रमण केले, त्यामुळे आता मात्र हिंदु-मुसलमानांमधील पूर्वीचे सौहार्दाचे वातावरण राहिलेले नाही. आणि आसामी लोकांना बंगाली संस्कृती व बंगाली भाषा यांच्या आक्रमणाची जी धास्ती पूर्वी वाटत होती, तिच्यापेक्षाही अधिक धास्ती मुसलमानांच्या वाढत्या संख्येची वाटू लागलो आहे, यातूनच सध्याची परकीय अतिक्रामकांविरुद्धची मोहीम सुरू झाली. या मोहिमेची सुरवात कशी झाली, ते पाहण्यासारखे आहे.

## आंदोलन-पर्व

२४ ऑक्टोबर १९७८ रोजी तत्कालीन निर्वाचन आयुक्त एस्. एल्. शकधर यांनी उटकमंड येथे भाषण करताना ईशान्येकडील राज्यांमध्ये परकीय नागरिकांचा मतदारयाद्यांमध्ये मोठ्या प्रमाणात समावेश झाला असून त्यामुळे निवडणुकांबाबत चिंताजनक व गंभीर स्वरूपाची परिस्थिती निर्माण झाल्याचे उद्गार काढले. १९७९ मध्ये जनता खासदार हिरालाल पटवारी यांच्या निधनाने मंगलदाई मतदारसंघामध्ये पोटनिवडणूक जाहीर झाली. या मतदारसंघामध्ये ७०,००० परकीय नागरिकांची नावे मतदार यादीत समाविष्ट केल्याच्या तक्रारी नोंदविण्यात आल्या होत्या व त्यांपैकी ४०,००० नावांच्या समावेशाबाबतच्या तक्रारी निर्वाचन आयोगाने ग्राह्य मानल्या. केवळ एकाच मतदारसंघात इतक्या मोठ्या प्रमाणावर परकीय मतदारांची नावे समाविष्ट झाली असतील, तर संपूर्ण आसाममध्ये एकूण परकीय नागरिक किती मोठ्या संख्येने राहत असतील, याची कल्पना येऊन सर्वत्र संतापाची लाट उसळली आणि जनआंदोलनाची सुरवात झाली.

आसामच्या या जनआंदोलनाचे नेतृत्व प्रामुख्याने दोन संघटनांकडे आहे. एक म्हणजे 'आसू' (All Assam Students' Union) व दुसरी अनेक घटकांनी बनलेली 'आगसप' (ऑल आसाम गण-संग्राम परिषद) ही सर्वसमावेशक संघटना होय. 'आगसप'ची स्थापना २७ ऑगस्ट १९७९ रोजी झाली व तिच्यामध्ये 'आसू' शिवाय पूर्वांचलीय लोकपरिषद (PLP), आसाम जातीयवादी दल, आसाम साहित्यसभा (A.S.S.) इत्यादी घटक-संस्था अंतर्भूत आहेत. आसूचे विद्यार्थी-नेते प्रफुल्ल-कुमार महंत, भृगुकुमार फुकन, भारत नोर, नूरूल हुसैन आणि पूर्वांचलीय लोकपरिषदेचे निवारण बोरा, आसाम जातीयवादी दलाचे नगेन हजारिका, गिरीन बोरा, आसाम साहित्यसभेचे जतीन गोस्वामी व यांखेरीज एल्. राजखोवा, के. एन्. शर्मा यांसारख्या अन्य व्यक्ती या आंदोलनाच्या अग्रभागी आहेत.

मध्यंतरीच्या काळात चरणसिंग मंत्रिमंडळाने राजीनामा देऊन लोकसभेच्या निवडणुका पुनः घेण्याची घोषणा केल्यामुळे मंगलदाई मतदारसंघातील निवडणूक झालीच नाही. डिसेंबर १९७९ मध्ये नवीन लोकसभेच्या निवडणुकांची तयारी देशभर चालू झाली. 'आसू' व 'आगसप'ने या निवडणुकांवर बहिष्कार घालण्याच्या निर्णयाची घोषणा केली. परकीय अतिक्रामकांच्या प्रश्नाची तड आताच लावता येणे शक्य आहे; लोकसभेच्या मतदारयाद्यांवर निवडणुकांनी एकदा शिकामोर्तब झाले, की परकियांना आसामातून कधीच बाहेर घालविता येणार नाही, याची खूणगाठ मनाशी बांधून आसामी जनतेने प्रचंड परंतु शांततामय आंदोलन सुरू केले. ९ डिसेंबर १९७९ रोजी दिवंगत राष्ट्रपती फक्रुद्दिन अली अहमद यांच्या पत्नी श्रीमती अबिदा बेगम यांनी बारपेटा मतदारसंघातून आपण आवेदनपत्र भरणार असल्याचे घोषित केले. १० डिसेंबर १९७९ रोजी बारपेटा मतदारसंघात त्या आवेदनपत्र भरण्यासाठी येत असताना जनतेने त्यांना त्यापासून परावृत्त करण्यासाठी प्रचंड निदर्शने केली व त्यावेळी पोलिसांनी केलेल्या लाठीमारात खरगेश्वर तालुकदार याचा बळी गेला. आसाममध्ये याची सर्वत्र तीव्र प्रतिक्रिया उमटली आणि १४ पैकी १२ लोकसभा मतदारसंघात कोणत्याही उमेदवाराला आवेदनपत्र भरण्याचे धाष्टर्य झाले नाही. श्रीमती अबिदा बेगम यांनी आपण आजारी असल्याचे निमित्त करून घरीच अधिकाऱ्यांसमोर पोलिससंरक्षणात आवेदनपत्र भरले; परंतु तेदेखील तेथील निर्वाचन अधिकाऱ्यांनी तांत्रिक कारणांमुळे अवैध ठरविले. निवडणुकांवरील शांततामय बहिष्काराचा हा प्रयोग लोकशाहीच्या इतिहासात अभूतपूर्व आहे.










आसामी जनतेच्या या निवडणुकांवरील बहिष्कारानंतर आंदोलनाचे दुसरे पर्व सुरू झाले. या आंदोलनातून आसामी जनतेचा अभंग निर्धार आणि विराट जनशक्ती यांचा प्रत्यय येतो. हे आंदोलन म्हणजे दीडशे वर्षांहून अधिक काळ दडपल्या गेलेल्या भाषिक आणि सांस्कृतिक अस्मितेचा शोध घेण्याचा एक प्रचंड प्रयत्न आहे. या आंदोलनामध्ये म. गांधीप्रणीत सत्याग्रहाची सर्व तंत्रे वापरण्यात आली. एवढेच नव्हे, तर आधुनिक काळाला अनुसरून या तंत्रामध्ये आसामी जनतेने स्वतःची भरही टाकली. गेल्या चार वर्षांमध्ये वारंवार आसाम बंद, स्थानिक बंद, शासकीय कचेऱ्यांपुढे निदर्शने, मेळावे, मिरवणुका, असहकार, न्यायालयांवर वकिलांचा बहिष्कार,आमदारांवरील सामाजिक बहिष्कार, रेल्वे बंद, वाहतूक बंद, काळा दिन, हुतात्मा स्मृतिदिन, शांतता व ऐक्यदर्शक मिरवणुका, ताम्रपत्रांचा त्याग, घेराव, धरणे, स्वातंत्र्यदिन व प्रजासत्ताकदिन यांवरील बहिष्कार, शासकीय कर्मचाऱ्यांचा असहकार, उपोषण, प्रार्थना, विनातिकीट यात्रा, भित्तिपत्रक मोहीम, प्रकाशबंदी, जनता कर्फ्यू, शासकीय समारंभांवर बहिष्कार, सायकल मिरवणुका, दडपशाही निषेध दिन इत्यादी मार्गांचा अवलंब करून जनतेने आपले आंदोलन चालू ठेवले आहे. या आंदोलनाचा एक विशेष असा, की चळवळीचे नेतृत्व तरुण विद्यार्थ्यांकडे असून सर्वच राजकीय पक्षांचे नेतृत्व जनतेने झिडकारून दिलेले आहे. गेल्या पस्तीस वर्षांच्या अनुभवाने आसामी जनतेचा राजकारण्यांबद्दलचा विश्वास पार उडालेला आहे आणि यापुढे त्यांच्यावर विसंबून राहिल्याने कार्यहानीच होईल, हे तिच्या लक्षात आले आहे.

या महान चळवळीतील एकदोन महत्त्वाच्या घटनांचा उल्लेख करणे आवश्यक आहे. लोकसभेच्या निवडणुकांवरील बहिष्काराचा कार्यक्रम ऐन भरात असताना २७ डिसेंबर १९७९ रोजी आसू व आगसपने तीन दिवसांची असहकार चळवळ चालू केली. सर्व केंद्रीय व राज्य शासकीय कचेऱ्यांतील कार्य थंडावले. शैक्षणिक संस्था बंद राहिल्या आणि याचबरोबर उत्तर आसामातील खाणींतून गौहत्ती आणि बिहारमधील बरौनीच्या तेलशुद्धीकरण केंद्रात होणाऱ्या कच्च्या तेलाचा पुरवठाही थांबला. पुढे हा कच्च्या तेलाचा पुरवठा तीन दिवसांनंतर असाच दीर्घकाळ बंद राहिला. बरौनीला जाणारी पाईपलाईन सहाशे किलोमीटरहून अधिक लांबीची आहे. गौहत्तीच्या पूर्वेला ६ किलोमीटर अंतरावर असलेल्या नारिंगी पंपिंग स्टेशनातच आसूच्या कार्यकर्त्यांनी कित्येक महिने तळ ठोकला व जिवाच्या कराराने कच्चे तेल बाहेर नेऊ दिले नाही. ऑईल इंडियाच्या कर्मचाऱ्यांची त्यांना मदत होतीच. दिग्बोई, गौहत्ती, बोंगाईगांव आणि बरौनी येथील तेलशुद्धीकरण केंद्रे दीर्घकाळ बंद पडून करोडो रुपयांचे नुकसान झाले. यावर कारवाई म्हणून ४ एप्रिल १९८० रोजी आसाम सरकारने राज्यातील ६०० किलोमीटर लांबीच्या तेल वाहून नेणाऱ्या पाईप लाईनच्या दोन्ही बाजूचा अर्धा किलोमीटर रुंदीचा भाग संरक्षित क्षेत्र म्हणून जाहीर केला. ५ एप्रिलला आग्नेयेकडील भाग वगळून बाकी सर्व आसाम अशांत क्षेत्र म्हणून दोन महिन्यांसाठी घोषित करण्यात आला. शासन दहशतवादाचा अवलंब करीत आहे याचा निषेध म्हणून आसूने १८ एप्रिल रोजी सर्व शासकीय कचेऱ्यांसमोर पाच दिवसांच्या निदर्शनांचा कार्यक्रम आखला. त्याला प्रत्युत्तर म्हणून त्याच दिवशीच्या मध्यरात्रीपासून प्रतिबंधक स्थानबद्धता वटहुकूम काढण्यात आला आणि १९ तारखेला सकाळपासून गौहत्तीमध्ये संचारबंदीचा आदेश जारी करण्यात आला. सैन्याला बोलावण्यात येऊन नारिंगी तेलकेंद्रावरील पाचशे निदर्शकांची धरपकड करण्यात आली. भृगुकुमार फुकन, नगेन हजारिका, निवारण बोरा आणि अतुल बोरा इत्यादींसह १४ प्रमुख नेत्यांची धरपकड करण्यात आली. सुमारे ८० अधिकारी निलंबित करण्यात आले. पोलिसांना प्रफुल्लकुमार महंत मात्र मिळू शकले नाहीत.

जमावबंदीचा आदेश धुडकावून १९ तारखेच्या प्रातःकाळापासूनच लोक स्वयंस्फूर्तीने नारंगीकडे कूच करू लागले. लाठीमार करूनही पोलिसांना जमाव पांगवता येईना. नारंगीच्या मार्गावर जिकडे तिकडे हजारो माणसांचा सागर उचंबळून आला. पोलिसअधीक्षक व पोलिस-उपायुक्तांनी दुपारी एक वाजता जमावबंदीचा आदेश मागे घेतला. त्यानंतर हजारो विद्यार्थी कामाख्य-मंदिराकडे गेले आणि तेथे त्यांनी ईश्वराची प्रार्थना केली.








एकंदर आंदोलनाचे प्रचंड स्वरूप पाहता हे आंदोलन बहुतांशी शांततामय रीतीनेच चालले, असे म्हणता येईल. आसामी हिंदू व बंगाली हिंदू, आसामी हिंदू व बंगाली मुसलमान, बंगाली हिंदू आणि बंगाली मुसलमान, आसामी हिंदू आणि बिगर आसामी यांच्यामध्ये मधूनमधून हिंसक चकमको होऊन तणावाचे वातावरण निर्माण झाले. ऑगस्ट १९७९ ते जानेवारी १९८० च्या दरम्यान हिंसक चकमकी व पोलिसांचा गोळीबार यांमध्ये ७८ व्यक्ती प्राणांस मुकल्या. १२० जाळपोळीचे प्रकार व ३२७ प्राणघातक हल्ल्यांचे प्रकार घडले. ४० खेड्यांतील ३२०० हून अधिक घरे जाळण्यात आली आणि जवळ जवळ पंधरा हजार माणसे बेघर झाली. अशा प्रकारची माहिती केंद्रीय गृह–राज्यमंत्री पी. वेंकटसुबय्या यांनी दिली. विशेषतः १९ जाने. १९८० रोजी दुलियाजान या ठिकाणी संतप्त जमावाने ऑईल इंडिया लि. चे तांत्रिक व्यवस्थापक डॉ. रोबिन मित्रा यांना दगडांनी ठेचून मारले या घटनेने सत्याग्रहाच्या चळवळीला मोठेच गालबोट लागले आणि देशभर वृत्तपत्रांतून त्यासंबंधीची तीव्र प्रतिक्रिया उमटली. आसू व आगसपच्या नेत्यांनी आपले आंदोलन कोणत्याही भाषिक किंवा धार्मिक समूहाविरुद्ध नसल्याचे वारंवार प्रतिपादन केले. परंतु तरीही एकंदर देशभर आसामातील आंदोलनाबाबत अनेक गैरसमज प्रसृत झाले. या ठिकाणी असेही लक्षात ठेवले पाहिजे, की बहुतेक प्रसंगी आगळीक उभय पक्षांकडून झालेली होती आणि केवळ आसामी लोकांना झालेल्या हिंसाचाराबाबत जबाबदार धरता येणार नाही. प्राणहानी दोन्ही बाजूंनी झाली. ब्रह्मपुत्रेच्या खोऱ्यातील बंगाली लोकांनी हिंसक चकमकीनंतर जसा पळ काढला, त्याप्रमाणे लुमडिंग सारख्या बंगाली भाषिकांची बहुसंख्या असलेल्या भागातून पुष्कळ आसामी कुटुंबांना हिंसाचारानंतर भीतीमुळे घरेदारे सोडून अन्यत्र जावे लागले. लक्षात ठेवण्यासारखी आणखी एक महत्त्वाची गोष्ट अशी, की लुमडिंग, नहारकातिया, डूमडुमा इत्यादी ठिकाणी मार्क्सवादी कम्युनिस्टांचा प्रभाव आहे आणि तेथे घडलेल्या हिंसाचारांमागे त्यांची प्रेरणा असण्याचा दाट संभव आहे. पोलिसांनी व सैन्यानेदेखील अनेक ठिकाणी अवाजवी प्रमाणात बलप्रदर्शन केले. उत्तर कामरूप जिल्ह्यात तर सैनिकांकडून स्त्रियांवरही अत्याचार झाले. पोलिस व सैन्याच्या या बेजबाबदार वर्तनाने आसामी जनतेच्या हृदयावर खोल जखम झालेली आहे.

आंदोलक व केंद्रसरकार यांना एकत्र आणून वाटाघाटींच्या मार्गाने आंदोलनाने उपस्थित केलेल्या प्रश्नांवर मार्ग काढण्याचे प्रयत्न सर्व बाजूंनी सुरू होते; परंतु आसामच्या राजकारणाचे एकंदर चित्रच झपाट्याने बदलत चालल्याने सुरवातीला अनेक अडचणी निर्माण झाल्या. फेब्रुवारी ७८ मधील आसाम विधानसभेच्या निवडणुकांनंतर १२ मार्च १९७८ रोजी श्री. गोलप बोर्बोरा मुख्यमंत्रीपदी असलेले जनतामंत्रिमंडळ अधिकारावर आले. परंतु जनतापक्षातील फुटीनंतर मोरारजी देसाई यांनी १५ जुलै १९७९ रोजी राजीनामा दिला. या घटनेचे आसाम जनतापक्षावर परिणाम होणे अटळ होते. शेवटी बोर्बोरा मंत्रिमंडळानेदेखील ४ सप्टेंबर १९७९ रोजो राजीनामा दिला. ९ सप्टेंबर रोजी आसाम जनता दलाचे मंत्रिमंडळ इतर पक्षांच्या पाठिंब्याने अधिकारावर येऊन श्री. जोगेंद्र हजारिका मुख्यमंत्री बनले. परंतु या मंत्रिमंडळाला पूर्वी दिलेला पाठिंबा अनेक पक्षांनी मागे घेतल्याने अखेर आसाममध्ये १२ डिसेंबर रोजी राष्ट्रपतींची राजवट जाहीर करण्यात आली आणि विधानसभाही स्थगित करण्यात आली.

## वाटाघाटींचे पर्व

२७ जानेवारी १९८० रोजी 'आसू'ला पंतप्रधान इंदिरा गांधींनी चर्चेला येण्यासंबंधीचे निमंत्रण दिले. २ फेब्रुवारी रोजी पंतप्रधान व प्रफुल्लकुमार महंत यांच्या नेतृत्वाखालील विद्यार्थी यांची बोलणी झाली. ४ व ५ फेब्रुवारीला गृहमंत्र्यांनी विद्यार्थिनेत्यांशी चर्चा चालू ठेवली. या चर्चेमध्ये 'आसू'ने सरकारसमोर आठ मागण्या ठेवल्या–

(१) परकीय नागरिकांचा शोध घेऊन त्यांची परत रवानगी करणे.

(२) मतदारयाद्यांतून परकीय नागरिकांची नावे काढून टाकणे.

(३) यानंतरच्या काळात परकीय नागरिकांची नावे मतदारयाद्यांत समाविष्ट होणार नाहीत, याची खबरदारी घेणे.








(४) परकीय नागरिकांचा चंचुप्रवेश रोखण्यासाठी सीमांचे रक्षण करणे.

(५) छायाचित्रे असलेली ओळखपत्रे मतदारांना देणे.

(६) आवश्यक त्या प्रकारचे घटनात्मक सुरक्षिततेचे मार्ग योजणे.

(७) पश्चिम बंगाल व त्रिपुरा या राज्यसरकारांनी दिलेली नागरिकत्वाची प्रमाणपत्रे नाकारण्याचा आसामसरकारला अधिकार देणे.

(८) नागरिकत्वाची प्रमाणपत्रे देण्याचा अधिकार राज्यसरकारांकडून काढून घेणे.

चर्चेमध्ये पंतप्रधानांनी व गृहमंत्र्यांनी परकीय कोण ते ठरविण्यासाठी २५ मार्च १९७१ ही आधारभूत तारीख म्हणून सुचविली; तर विद्यार्थ्यांनी आधारभूत वर्ष ठरविताना नागरिकांसंबंधीचे १९५१ मधील राष्ट्रीय दफ्तर व १९५२ मधील आसाममधील जनगणना यांचाच आधार घेतला पाहिजे, असा आग्रह धरला. याउलट, सरकारचे म्हणणे असे, की नेहरू–लियाकतअली करार (१९५१), तसेच शेख मुजीबूर रहमान–इंदिरा गांधी करार (१९७२) यांमुळे निर्माण झालेली आंतरराष्ट्रीय बंधने पाळूनच विभाजनवर्ष ठरविता येईल. ही चर्चा अर्थातच प्राथमिक स्वरूपाची असून ती अपूर्ण राहिली. १ मार्च रोजी पंतप्रधानांनी सर्व पक्षांच्या नेत्यांशी विचारविनिमय केला.

यानंतर जुलै ते सप्टेंबर या दरम्यान मणिपूरचे मुख्यमंत्री राजकुमार दोरेंद्रसिग यांनी आसूच्या नेत्यांशी वारंवार संवाद साधून पुनः केंद्रसरकार व विद्यार्थिनेते यांची बोलणी व्हावीत यासाठी अनुकूल वातावरण निर्माण केले. परिणामी १७ ते २५ सप्टेंबर व ११ ते १६ ऑक्टोबर अशा दोन फेऱ्यांमध्ये आसू व आगसपच्या नेत्यांशी केंद्रीय गृहमंत्र्यांनी प्रथमच तपशीलवार बोलणी केली.

संविधानाच्या ३६५ (५) कलमाप्रमाणे राष्ट्रपतींची राजवट घटकराज्यांमध्ये जास्तीत जास्त एक वर्षासाठी लादता येते. त्यानुसार डिसेंबर १९८० पर्यंत आसाममध्ये लोकनियुक्त मंत्रिमंडळ अधिकारावर येणे आवश्यक होते. १९८० च्या प्रारंभीच केंद्रस्थानी इंदिरा काँग्रेस अधिकारावर आल्यामुळे आसाम विधानसभेतील इंदिरा काँग्रेस संसदीय पक्षात अनेक आमदारांनी प्रवेश केला. त्यामुळे ६ डिसेंबर रोजी आसाममधील राष्ट्रपतींची राजवट मागे घेण्यात आली व त्या जागी श्रीमती अन्वरा तैमूर मुख्यमंत्रीपदी असलेले इंदिरा काँग्रेसचे मंत्रिमंडळ अधिकारावर आले. परंतु अंतर्गत कलहामुळे या मंत्रिमंडळालादेखील २८ जून १९८१ रोजी राजीनामा द्यावा लागला. ३० जूनला पुनः राष्ट्रपतींची राजवट जाहीर करण्यात आली व विधानसभा स्थगित करण्यात आली. ही राष्ट्रपतींची राजवट ११ जानेवारी १९८२ पर्यंत टिकली. १३ जानेवारीला पुनः इंदिरा काँग्रेसचे मंत्रिमंडळ अधिकारावर आले. यावेळी मुख्यमंत्रिपदाची माळ श्री. केशवचंद्र गोगोई यांच्या गळचात पडली. परंतु हे मंत्रिमंडळही अल्पजीवी ठरले आणि अखेर १९ मार्चला आसाम विधानसभा विसर्जित करून राष्ट्रपतींची राजवट घोषित करण्यात आली.

आसाममधील राजकीय सत्तास्पर्धेचे हे चित्र अशा रीतीने सतत बदलत असताना एका बाजूला आंदोलन सुरूच होते व दुसऱ्या बाजूला मधूनमधून आंदोलक व सरकार यांच्यांतील बोलणीही होत होती. १० डिसेंबर १९८१ रोजी पंतप्रधान व विरोधीपक्षनेते यांची दोन तास बैठक झाली. या बैठकीमध्ये सरकार, विरोधीपक्षनेते व आसू आणि आगसपचे प्रतिनिधी यांची एक त्रिदलीय परिषद बोलावून तीमध्ये आसामप्रश्नाचा सर्वांगीण विचार करून पुढील मार्ग निश्चित करण्याचे ठरविण्यात आले. ही त्रिदलीय बोलणी १८ ते २० जानेवारी ८२, ८ ते ११ फेब्रुवारी, ७, ८ एप्रिल, २५ ते २७ ऑगस्ट, १ ते ८ सप्टेंबर, २७ सप्टेंबर ते १ ऑक्टोबर, ६ ते ८ नोव्हेंबर ८२ इतक्या प्रदीर्घ काळपर्यंत चालली. या बोलण्यांमध्ये सरकारतर्फे केंद्रीय गृहमंत्री झैलसिंग (नंतर वेंकटरामन व पी. सी. सेठी), कायदामंत्री शिवशंकर (नंतर जगन्नाथ कौशल), संसदीय कामकाजमंत्री भीष्मनारायणसिंग व गृहराज्यमंत्री पी. वेंकटसुब्बय्या आणि एन. आर. लासकर इत्यादींनी भाग घेतला. विरोधी पक्षांतर्फे रवींद्र वर्मा (जनता), भोला पासवान शास्त्री व उन्नीकृष्णन (अरसकाँग्रेस), अटलबिहारी वाजपेयी व लालकृष्ण अडवाणी (भाजप), एच. के. सुरजितसिंग (मार्क्सवादी कम्युनिस्ट) आणि इंदरजित गुप्ता व योगेंद्र शर्मा

अनुक्रमणिका

(कम्युनिस्ट पक्ष) इत्यादींनी भाग घेतला. विरोधी पक्षांपैकी लोकदलाने मात्र या बोलण्यांवर बहिष्कार टाकला. आसामप्रश्नातील गुंतागुंत इंदिरा काँग्रेसने निर्माण केलेली असून आपण या बोलण्यांमध्ये भाग घेऊ शकत नसल्याचे चरणसिंग यांनी पत्र लिहून सरकारला कळविले. आसू व आगसपतर्फे प्रफुल्लकुमार महंत, भृगुकुमार फुकन, नरूल हुसेन, एल. राजखोवा, नगीन शर्मा, निवारण बोरा, अतुल बोरा, बिराज शर्मा इत्यादींनी भाग घेतला. सर्व राष्ट्रीय मतप्रवाहांचा सहभाग व दीर्घकाल चाललेली तपशीलवार चर्चा या दृष्टीने हे चर्चासत्र अभूतपूर्व मानावयास हवे.

या चर्चेमध्ये अर्थातच सर्व लक्ष प्रामुख्याने बेकायदेशीर रीतीने आसाममध्ये राहत असलेल्या अतिक्रामकांना परत पाठविण्याच्या प्रश्नावर केंद्रित झाले. ह्या सर्व चर्चेमध्ये परकीय कोण ? ते ठरविण्यासंबंधीची प्रश्नावली कशी तयार करावयाची ? परकीय निश्चित करण्याची पद्धती कोणती ? परकीय ठरविलेल्यांना परत मायदेशी कसे पाठवायचे ? पूर्वी परत पाठवूनही जे परकीय आसामात पुन: आले आहेत त्यांच्यासंबंधी कोणती उपाययोजना करावयाची ? या परकीयांपैकी ज्यांना भारतामध्ये राहू देण्याची परवानगी द्यावयाची त्यांपैकी आसाममध्ये कितीजणांना सामावून घ्यावयाचे ? अशा तऱ्हेचे अनेक आनुषंगिक प्रश्न निर्माण होऊन त्यांची तपशीलवार चर्चा झाली. या सर्व गुंतागुंतीच्या व तांत्रिक तपशीलामध्ये न शिरता परकीय अतिक्रामकांबाबत जे अनेक तोडगे सुचविण्यात आले, त्यांपैकी काही महत्त्वाच्या तोडग्यांचा या ठिकाणी निर्देश करणे उचित ठरेल.

गांधी पीस फौंडेशन, अटलबिहारी बाजपेयी, डॉ. सुब्रह्मण्यम् स्वामी, रवींद्र वर्मा यांनी या प्रश्नाची तड लावण्याच्या दिशेने अनेक उपयुक्त सूचना केल्या. या सर्व सूचना तसेच त्रिदलीय परिषदेत झालेली चर्चा यांमधून खालील मुद्द्यांच्या बाबतीत एकमत झाल्याचे २५ ऑगस्ट १९८२ रोजी केंद्रीय गृहमंत्री वेंकटरामन यांनी त्रिदलीय परिषदेत निवेदन केले.

१) १९५१ ते १९६१ या काळात आलेल्या अतिक्रामकांना देशात राहू द्यावे.

२) मार्च १९७१ नंतर जे अतिक्रामक आले असतील, त्यांना शोधून परत पाठविणे.

३) ज्या अतिक्रामकांची अगोदर हकालपट्टी केली आहे परंतु जे बेकायदेशीर रीतीने पुन: परत आले आहेत, त्यांना परत पाठविणे.

४) १९६१ नंतर जे अतिक्रामक आले आहेत व ज्यांना शोधून परत जाण्यासंबंधीचे आदेश देण्यात आले आहेत, त्यांना पुन: परत पाठवावे किंवा आसामबाहेर त्यांना वसती करावयास लावावे.

वरील बाबतीमध्ये सर्वसाधारण एकवाक्यता झाली होती. याचाच अर्थ असा की, आसाम आंदोलकांनी १९५१ हे विभाजनवर्ष धरण्याबाबतचा आपला आग्रह सोडून ते १९६१ हे विभाजन वर्ष मानण्यास तयार होते. परंतु अद्यापि १९६१ ते १९७१ या काळातील अतिक्रामकांचा शोध घेणे, त्यांचा मतदानाचा हक्क काढून घेणे आणि त्यांची परत पाठवणी करणे किंवा आसामबाहेर त्यांना वसती करावयास लावणे या व अन्य आनुषंगिक गोष्टींबाबत त्यांच्यामध्ये व सरकारमध्ये एकमत होत नव्हते.

या संदर्भात जनता खासदार श्री. रवींद्र वर्मा यांनी केलेले प्रयत्न व त्यांनी सुचविलेले तोडगे विशेष उल्लेखनीय आहेत. प्रथमत: त्यांनी २६ ऑगस्ट रोजी परकीय कोणते ते निश्चित करण्याचे कार्य शासकीय यंत्रणेकडून काढून घेऊन न्यायाधिकरणांकडे सोपवावे व अशी त्रिसदस्य न्यायाधिकरणे मतदारसंघाच्या पातळीवर नेमावीत आणि त्यांच्यावर अपील करण्यासाठी राज्यपातळीवर फक्त एकच अधिकारकेंद्र असावे, असे सुचविले. पुढे २ सप्टेंबरला त्यांनी आसामप्रश्नासंबंधीची सर्व चर्चा लक्षात घेऊन एक २४ कलमी व्यापक तोडगा मांडला. या तोडग्याप्रमाणे १९६१ ते १९७१ च्या दरम्यान आसाममध्ये बेकायदेशीर रीतीने प्रवेश केलेल्या सर्वांना हुडकून त्यांची नावे मतदारसंघांतून प्रथम काढून टाकायची व नंतर प्रशासकीय सोयीप्रमाणे त्यांची परतपाठवणी किंवा अन्यत्र रवानगी करावयाची होती. १९६५ मध्ये दिलेल्या धोरणविषयक सूचना व अन्य कायदे यांप्रमाणे ज्यांना अगोदरच नागरिकत्व देण्यात आले होते, त्यांचा याबाबत अपवाद करावयाचा; परंतु यानंतर मात्र नागरिकत्व देताना १९६५ च्या धोरण-

विषयक सूचनांबाबत आग्रह धरायचा नाही, अशा प्रकारचा हा तोडगा होता आणि आसू व आगसपच्या नेत्यांची त्याला सर्वसाधारण मान्यता होती. परंतु १९६१ ते १९७१ मधील नागरिकत्व मिळवलेल्या लोकांचा निवडणुका होईपर्यंत आसामातील मतदार-याद्यांमध्ये समावेश करावयाचा नाही, ही वर्मा यांच्या तोडग्यातील तरतूद सरकारला योग्य वाटत नव्हती. याबाबत झालेली चर्चा लक्षात घेऊन श्री. वर्मा यांनी आपला तोडगा पुन्हा सुधारून मांडावा, अशी सरकारने त्यांना विनंती केली. त्यानुसार श्री. वर्मांनी ८ नोव्हेंबरला त्रिदलीय परिषदेपुढे आपला ७ कलमी सुधारित तोडगा मांडला. त्यातील प्रमुख तरतुदी पुढीलप्रमाणे होत्या.

१) आसामध्ये १९६१ ते १९७१ दरम्यान ज्यांनी प्रवेश केला आहे, त्यांची चार विभागांत वर्गवारी करावयाची—

अ) ज्यांनी योग्य अधिकाऱ्यांकडून व अर्ज करून नागरिकत्वाबाबत प्रमाणपत्रे मिळविली आहेत.

ब) ज्यांचे आसाम सरकारने योग्य रीतीने पुनर्वसन करून आसाममध्ये ज्यांना स्थायिक केलेले आहे; परंतु ज्यांनी नागरिकत्वाबाबतची प्रमाणपत्रे मिळविलेली नाहीत.

क) ज्यांनी नागरिकत्वासाठी अर्ज केलेले नाहीत किंवा ज्यांचे आसाम सरकारने पुनर्वसन केलेले नाही आणि तरीही ज्यांची नावे मतदारयाद्यांमध्ये समाविष्ट झालेली आहेत.

ड) ज्यांनी नागरिकत्वाबाबतची प्रमाणपत्रे मिळविलेली नाहीत वा ज्यांची नावे मतदारयाद्यांमध्ये समाविष्ट झालेली नाहीत.

२) वरीलपैकी 'अ' विभागातील नावे मतदारयाद्यांमध्ये राहतील.

३) नागरिकत्व मिळविताना गैरमार्गाचा अवलंब केला आहे किंवा अवाजवी रीतीने नागरिकत्वाची प्रमाणपत्रे दिली गेली आहेत याबद्दलची तक्रार असेल, तर त्याबद्दलचा निर्णय नागरिकत्वासंबंधीच्या कायद्यातील दहाव्या कायद्याप्रमाणे योग्य अधिकाऱ्याने द्यावा.

४) 'ब' विभागातील नावे मतदारयाद्यांमध्ये राहतील.

५) न्यायाधिकरणामार्फत चौकशी वा निवाडा होईपर्यंत नागरिकत्वासंबंधी नवीन प्रमाणपत्रे देऊ नयेत.

६) 'क' विभागातील नावांविरुद्ध जर काही तक्रारी असतील, तर त्या घटना व प्रचलित कायदे यांनुसार योग्य कारणे देऊन नोंदविता येतील.

७) योग्य कारणांशिवाय मतदारयाद्यांत समाविष्ट झालेली सर्व नावे काढून टाकण्यात येतील. निवडणुकांनंतर १९६१ ते १९७१ च्या दरम्यान आलेल्या अतिक्रामकांची परतपाठवणी करण्याबाबतचा प्रश्न हाती घेतला जाईल.

८) 'ड' विभागातील नावांबद्दलची चर्चादेखील मागाहून हाती घेण्यात येईल.

खासदार रवींद्र वर्मा यांच्या या तोडग्याशी सरकारचे प्रतिनिधी बऱ्याच अंशी सहमत झाले. परंतु हा तोडगा आसू व आगसपच्या नेत्यांनी डावलला. त्यांच्या मताप्रमाणे हा तोडगा मान्य केला तर १९६१ ते ७१ च्या दरम्यानचे फारच थोडे अतिक्रामक आसामबाहेर पाठविता येतील व त्याला आसामच्या जनतेने कदापि मान्यता दिली नसती. अगोदरच ५१ ते ६१ च्या दरम्यानचे परकीय अतिक्रामक आसाममध्ये ठेवून घेण्यास त्यांनी संमती दिली होती व ती देताना ६१ ते ७१ च्या दरम्यानचे सर्व परकीय आसामबाहेर पाठविण्यात येतील, असे गृहीत धरण्यात आले होते. शिवाय या तोडग्याप्रमाणे अतिक्रामकांना शोधून काढण्याची जबाबदारी शासनावर न पडता प्रामुख्याने जनतेवरच पडणार होती. आसू व आगसपच्या विरोधामुळे श्री. रवींद्र वर्मा यांचा हा दुसरा तोडगादेखील मागे पडला.

डिसेंबर १९८२ च्या शेवटच्या आठवड्यात पुन: समझौत्याचे प्रयत्न झाले आणि ४ व ५ जानेवारी ८३ ला त्रिदलीय परिषदेमध्ये चर्चा झाली. श्री. रवींद्र वर्मा यांनी आणखी काही नवीन कल्पना मांडल्या. पण ही बोलणीदेखील फसली. परंतु भृगुकुमार फुकन यांनी दिलेल्या एका मुलाखतीवरून सप्टेंबर १९६५ हे विभाजनवर्ष मानण्याचा सरकारने गंभीर रीतीने विचार करावा अशी सूचना त्यांनी चर्चेनंतर संरक्षणमंत्री, कॅबिनेट

सचिव यांना केल्याचे दिसते. त्याच दिवशी त्रिदलीय परिषदेत भाग घेतलेल्या सर्व विरोधी नेत्यांची व पंतप्रधानांची भेट झाली. या चर्चेच्या वेळी परिषदेत भाग घेतलेले मंत्रीदेखील उपस्थित होते.

परंतु या वेळेपर्यंत त्रिदलीय परिषदेतील निर्णयावर अवलंबून न राहता आसाममध्ये कोणत्याही परिस्थितीमध्ये निवडणुका घ्यायच्या असा निर्णय इंदिरा काँग्रेसने घेतलेला असावा व त्या दृष्टीने निवडणुकांची पक्षांतर्गत तयारी चालूही झाली होती. आसाममधील राष्ट्रपती-राजवटीची एक वर्षाची मुदत मार्च महिन्यात संपणार होती. आसाम विधानसभा पूर्वीच विसर्जित झालेली होती. १९७८ मध्ये जनता राजवटीमध्ये करण्यात आलेल्या ४४ व्या घटनादुरुस्तीनुसार घटकराज्यामध्ये जास्तीत जास्त एक वर्षापर्यंत राष्ट्रपतींची राजवट ठेवता येते. फक्त आणीबाणीची परिस्थिती असेल आणि निर्वाचन आयुक्तांनी निवडणुका घेता येणे शक्य नाही असा निर्वाळा दिला असेल, तरच निवडणुका न घेणे शक्य होते. अशा परिस्थितीत एक तर आसाममध्ये तातडीने निवडणुका घेणे आवश्यक होते किंवा घटनादुरुस्ती करून राष्ट्रपतींच्या राजवटीची मुदत वाढवून घ्यावयास हवी होती. २ व ३ नोव्हेंबर रोजी प्रमुखमंत्री व विरोधीपक्षनेते यांच्या बैठकी झाल्या व त्यांमध्ये या प्रश्नाची चर्चा करण्यात आली. दोन्ही कम्युनिस्ट पक्षांनी अशा तऱ्हेची दुरुस्ती करण्यास प्रखर विरोध केला व आसाममध्ये ताबडतोब निवडणुका घेण्याचा आग्रह धरला. याउलट जनता, भाजप व काँग्रेस (स) या पक्षांनी घटनादुरुस्तीला मर्यादित पाठिंबा देऊन राष्ट्रपतींची राजवट फक्त आसामपुरती एक वर्षाने वाढविण्यास संमती दिली. आसामी जनतेची तीव्र अनिच्छा असताना तिच्यावर निवडणुका लादू नयेत, असे मत त्यांनी व्यक्त केले. ६ नोव्हेंबर रोजी होणाऱ्या त्रिदलीय परिषदेतील चर्चेनंतरच यासंबंधीचा निर्णय घ्यावा, असा त्यांचा आग्रह होता. परंतु साधारणतः ४ नोव्हेंबरच्या दरम्यान सरकारने घटनादुरुस्तीचा विचार सोडून आसाममध्ये निवडणुका घेण्याचा ठाम निर्णय घेतला असावा.

## निवडणूकपर्व

६ जानेवारीला भारतीय निर्वाचन आयोगाने आसाममध्ये विधानसभेच्या सार्वत्रिक निवडणुका व लोकसभेच्या १२ जागांसाठी पोटनिवडणुका घेण्याचे जाहीर केले. या निवडणुका १९७९ च्या मतदार-याद्यांप्रमाणे घेण्यात येतील, असेही निर्वाचन आयोगाचे एक सचिव के. गणेशन यांनी वृत्तपत्रवार्ताहरांना सांगितले.

निवडणुकांच्या वेळापत्रकाप्रमाणे १४, १७ व २० फेब्रुवारी रोजी आसामातील निवडणुका पार पडल्या. परंतु या निवडणुकांमध्ये निर्माण झालेले भयग्रस्त वातावरण आणि हिंसाचार यांनी सर्व देश शहारून गेला. जनता, भाजप आणि लोकदल या तिन्ही राष्ट्रीय पक्षांनी या लादलेल्या निवडणुकांवर बहिष्कार टाकला. जनतेने या निवडणुकांवर बहिष्कार टाकावा असे आवाहन आसू व आगसपने केले आणि ५ फेब्रुवारीपासून अठरा दिवसांची राज्यव्यापी असहकारचळवळ घोषित केली. या असहकारामुळे सर्व सार्वजनिक सेवा, बँका व कचेऱ्या यांचे कार्य जवळजवळ थंडावले. राष्ट्रीय सुरक्षाकायदा व अन्य कायद्यांखाली शेंकडोजणांना अटक करण्यात आली. आसामी सरकारी कर्मचाऱ्यांनी असहकार केल्याने बाहेरच्या राज्यांतील कर्मचाऱ्यांची मोठ्या प्रमाणावर मदत घेण्यात आली. सुमारे दोन लाख शस्त्रधारी निमलष्करी सैनिक निवडणुका पार पाडण्यासाठी आसामभर पसरण्यात आले. निवडणुकांच्या कार्यात भाग घेण्यास नकार दिल्यामुळे ४२५ सरकारी कर्मचाऱ्यांना कामावरून काढून टाकण्यात आले किंवा निलंबित करण्यात आले.

दोन फेब्रुवारीपासूनच हत्याकांडामध्ये आहुती पडण्यास सुरवात झाली व पुढील तीन आठवड्यांमध्ये त्यांची संख्या प्रतिदिन वाढूच लागली. या हत्याकांडामध्ये सर्वभाषिक व सर्वधार्मिक बळी पडले आणि त्यांची संख्या पंधराशे ते सतराशेपर्यंत असावी, असा अंदाज आहे. (ही संख्या पुढे जुलैपर्यंत वाढत गेली व सुमारे तीन हजार व्यक्ती बळी पडल्या असाव्यात, असे आसामचे नवे मुख्यमंत्री हितेश्वर सायकिया यांनी एका मुलाखतीत सांगितले आहे.) हत्याकांडापैकी गोहपूर येथे १४ एप्रिल रोजी व









अनुक्रमणिका

नेल्ली येथे १८ एप्रिल रोजी झालेली हत्या अत्यंत भीषण स्वरूपाची होती. गोहपूरमध्ये कमीकतमी शंभर व नेल्लीत कमीतकमी एक हजार माणसे मारण्यात आली असावीत. यातील सर्वांत करुण व हृदयद्रावक गोष्ट म्हणजे बहुतांश बळी कोवळी मुले व स्त्रिया यांचे होते. देशाच्या फाळणीनंतर घडलेली ही सर्वांत दुर्दैवी घटना व सर्वांत भीषण हत्याकांड असावे. सरकारी आकड्यांप्रमाणे एकावेळी तर २५० साहाय्यशिबिरांमध्ये ३,१०,००० स्त्रिया, पुरुष व मुले राहत होती. यावरून किती कुटुंबे निराधार झाली असतील, याची कल्पना येते.

गोहपूरमध्ये राहणारे बोरो आदिवासी प्लेन्स ट्रायबल्स कौन्सिल ऑफ आसाम (PTCA) या पक्षाला पाठिंबा देणारे होते व त्यांची स्वतंत्र आदिवासी राज्याची मागणी आहे. या पक्षाने निवडणुकीत भाग घेण्याचे ठरविलेले होते. बोरो आदिवासींनी जवळच्या आसामी खेड्यांवर हल्ला केला व त्यात आसामी व बोरो लोकांचे बळी गेले. याउलट, नेल्लीमध्ये लालुंग आदिवासींनी निवडणुकांवर बहिष्कार टाकला होता. ब्रह्मपुत्रेच्या दक्षिण काठावरील आदिवासी भागात सातत्याने होणाऱ्या बंगाली मुस्लिम आवागतांच्या आक्रमणाचा सूड त्यांनी या वेळी उगवला. नेल्ली येथील हत्याकांडामध्ये प्रामुख्याने स्त्रिया व मुले यांचेच बळी जाण्याचे एक कारण असे दिले जाते, की तेथील बहुतेक सर्व पुरुष मंगलदोई येथे आसामी वस्त्यांवर हल्ला करण्यासाठी गेले होते. सैनिकांनी या मुस्लिमांना अडवले; परंतु ते परत नेल्लीला परतण्यापूर्वीच तेथील भीषण घटना घडून गेली होती.

अशा तऱ्हेच्या या रक्तरंजित निवडणुकांमध्ये इंदिरा काँग्रेसला १०८ पैकी ८८ जागा मिळाल्या. परंतु हा विजय म्हणजे फार मोठा नैतिक पराभव होता. कायदेशीर दृष्टीनेसुद्धा या निवडणुका वैध मानता येतील किंवा नाही, याची दाट शंकाच आहे. निवडणुका १९७९ च्या मतदारयाद्यांप्रमाणे घेतल्यामुळे हजारो मतदारांची नावे याद्यांमध्ये समाविष्ट झालेली नव्हती, तर याउलट लक्षावधी परकीय नागरिकांची नावे मात्र मतदारयाद्यांमध्ये अंतर्भूत झाली होती. राज्यामध्ये एकूण मतदान सुमारे २० % झाले. परंतु यातील बहुतेक मतदान बंगाली हिंदू व आवागत मुस्लिम मतदार ज्या ठिकाणी मोठ्या संख्येने होते त्या ठिकाणीच झाले आहे, हे लक्षात ठेवले पाहिजे. १८ विधानसभा मतदारसंघांतील मतदान अनिश्चित कालापर्यंत पुढे ढकलावे लागले. बारांपैकी सात लोकसभा मतदारसंघांत, तसेच अकरा विधानसभा मतदारसंघ व ३५१ मतदानकेंद्रे या ठिकाणी फेरमतदान घ्यावे लागले. बारा मतदारसंघांत ५ % हून कमी मतदान झाले, तर उत्तर आसामातील दहा मतदारसंघांत केवळ ३% च मतदान झाले. एकच प्रातिनिधिक उदाहरण द्यावयाचे झाले, तर कामरूप जिल्ह्यातील धरमपूर मतदारसंघात ६७,३४१ मतदारांपैकी केवळ २६७ मतदारांनी आपला मतदानाचा हक्क बजाविला. एक मत अपात्र ठरले आणि उरलेली सर्व मते डॉ. भूमिधर बर्मन यांना मिळून ते निवडून आले. दारंग जिल्ह्यातील सिपाजहरसारख्या काही मतदारसंघांत तर फिरती मतदानकेंद्रे ठेवून अधिकाऱ्यांवर मतदान करावे यासाठी याचना करण्याची पाळी आली.

केंद्रीय रेल्वेमंत्री घनीखान चौधुरी यांनी निवडणुकांमध्ये प्रचार करताना आवागत मुस्लिम मतदारांना जातीयवादी आवाहन करून हिंसाचाराला अप्रत्यक्षरीत्या प्रोत्साहनच दिले. अशा प्रकारच्या वातावरणातील निवडणुकांना एकप्रकारे लोकशाहीच्या क्रूर चेष्टेचे स्वरूप प्राप्त झाले.

या निवडणुकांमध्ये डाव्या लोकशाही आघाडीची दिवाळखोरी मात्र उघड झाली. या डाव्या लोकशाही आघाडीमध्ये मार्क्सवादी कम्युनिस्ट पक्ष, भारतीय कम्युनिस्ट पक्ष, भारतीय क्रांतिकारक कम्युनिस्ट पक्ष व सोशालिस्ट युनिटी सेंटर ऑफ इंडिया हे घटकपक्ष आहेत. निवडणुकांमध्ये बंगाली मतदारांचा भरघोस पाठिंबा आपणाला मिळेल, असे गणित मांडून डाव्या लोकशाही आघाडीने निवडणुका लढविल्या होत्या. परंतु प्रत्यक्षात या आघाडीला फक्त पाच जागा मिळाल्या. पूर्वीच्या विधानसभेत मार्क्सवादी कम्युनिस्ट पक्षाला अकरा जागा मिळाल्या होत्या, तर या निवडणुकांत त्यांना एकच जागा मिळू शकली. विशेष म्हणजे बंगाली बहुसंख्याक काचर जिल्ह्यात या पक्षाला आपल्या पूर्वीच्या चारही जागा गमवाव्या लागल्या. याचा अर्थ एकच, की सुरक्षिततेच्या हेतूने बंगाली हिंदू

अनुक्रमणिका

मतदारदेखील आता मार्क्सवादी कम्युनिस्ट पक्षाकडून इंदिरा काँग्रेस पक्षाकडे वळलेले आहेत. अतिक्रामक मुस्लिम मतदारांचा पूर्वीपासूनच इंदिरा काँग्रेसला पाठिंबा आहे.

डाव्या लोकशाही आघाडीत नव्याने सामील झालेला घटकपक्ष म्हणजे काँग्रेस (स). काँग्रेस(स) चे नेते व डाव्या लोकशाही आघाडीचे नेते, भूतपूर्व मुख्यमंत्री शरत्चंद्र सिन्हादेखील बिलासीपारा पूर्व मतदारसंघातून पराभूत झाले.

रक्ताने डागळलेल्या या निवडणुकांनंतर आसाम इंदिरा काँग्रेस पक्षात पूर्ववत सत्तास्पर्धा सुरू झाली. शेवटी अन्वरा तैमूर व केशवचंद्र गोगोई या आपल्या दोन प्रतिस्पर्ध्यांवर मात करून श्री. हितेश्वर सायकिया हे आसामचे नवीन मुख्यमंत्री बनले.

## भाषिक व वांशिक राष्ट्रवाद

आतापर्यंत १९७९ पासून आसाममध्ये घडलेल्या महत्त्वाच्या घटनांचा मागोवा घेतला. आसामी जनतेने परकीय अतिक्रामकांविरुद्ध चालविलेले आंदोलन, आंदोलक व सरकार यांच्यांत झालेल्या वाटाघाटी व शेवटी वाटाघाटी फसल्यानंतर झालेल्या निवडणुका यांचा परामर्ष घेतला. या सर्व घटनांचा आढावा घेत असताना साहजिकच परकीय अतिक्रामकांचा प्रश्न हा केंद्रस्थानी मानून आसामसमस्येचा विचार केला. परंतु लेखाच्या प्रारंभीच नमूद केल्याप्रमाणे आसामची समस्या ही अतिशय गुंतागुंतीची समस्या असून तिला अनेक पदर आहेत. वरपांगी पाहताना परकीय अतिक्रामकांचा प्रश्न हा जरी अतिशय महत्त्वाचा वाटला, तरी त्याबरोबरच आसामी लोकांमध्ये भाषिक, वांशिक व सांस्कृतिक अस्मिता जागृत झालेली असून या अस्मितेचे संरक्षण करण्याचा प्रश्न हा त्यांच्या दृष्टीने खरा महत्त्वाचा प्रश्न आहे, असे दिसून येईल. त्यासाठी आसामी भाषेच्या आसामातील स्थानासंबंधीच्या कांही ऐतिहासिक व वर्तमानकालीन घटना जाणून घ्याव्या लागतील.

आसामी भाषेची परंपरा फार जुनी आहे. भारतीय घटनेने मान्य केलेल्या प्रमुख पंधरा राज्यभाषांपैकी आसामी ही एक आहे. जतींद्रनाथ

दुआरा, वीरेंद्रकुमार भट्टाचार्य, वेणुधर शर्मा, डॉ. बिरिंचीकुमार बरुआ, अंबिकागिरी रामचौधरी, त्रैलोक्यनाथ गोसावी प्रभृती लेखक साहित्य अकादमीचे पारितोषिकविजेते आहेत. आसामी गद्याची परंपरा तर बंगाली गद्याहूनही जुनी आहे. परंतु बंगालीप्रमाणेच तिच्या आधुनिक विकासात ख्रिश्चन मिशनऱ्यांचा मोठा हातभार आहे. १८३६ मध्ये अमेरिकन बॅप्टिस्ट मिशनने आसामी भाषेतील पहिला छापखाना चालू केला. हे मिशन सादियाहून पुढे शिवसागरला गेले व तेथून त्यांनी आसामी भाषेच्या प्रसारासाठी मोठे प्रयत्न केले. फ्रॅन्सिस हॅमिल्टनच्या आसामसंबंधीच्या अधिकृत अहवालाचा उल्लेख वर आलाच आहे. या अहवालामध्ये हॅमिल्टनने असे मत नमूद करून ठेवले होते, की " आसामी औरंगजेबाच्या काळात प्रचलित होती. आता ती मृतप्राय असून तिचा वापर फक्त जुन्या धार्मिक विधींचे पालन करण्यापुरताच होतो. आसामी लवकरच नष्ट होण्याच्या मार्गावर असून आता आसाममध्ये सर्वत्र बंगालीचा वापर होत आहे." बंगाली व आसामीची लिपी एकच असल्याने हॅमिल्टनने हा निष्कर्ष काढला की बंगाली बाबूंच्या सहवासाने, ते सांगता येणे कठीण आहे. एवढे मात्र खरे, की हॅमिल्टनच्या अहवालाचा बायबलप्रमाणे वापर करणाऱ्या नंतरच्या ब्रिटिश अधिकाऱ्यांनी १८३६ मध्ये आसामीचा वापर न्यायालयांतून व शाळांतून करण्यास बंदी घातली. परंतु याला प्रखर विरोध झाल्याने आसामी बंगालीचीच एक बोली असल्याचे घोषित करण्यात आले. नंतर तर या दोन्ही भाषा एकच असल्याची भूमिका घेण्यात आली. १८५५ मध्ये आनंदराम देखियाल फुकन या आसामी पंडिताने आसामी भाषेचे स्वतंत्र अस्तित्व पुराव्यानुसार सिद्ध केले. अखेरीस अमेरिकन मिशनऱ्यांनी बंगालचे लेफ्टनंट गव्हर्नर सर जॉर्ज कॅंपबेल यांचे मतपरिवर्तन घडवून आणण्यात यश मिळविले आणि १८७२ मध्ये आसामीचा न्यायालयांत वापर करण्यास परवानगी देण्यात आली. १९ एप्रिल १८७३ पासून आसामीचा वापर प्राथमिक व पूर्व माध्यमिक शाळांत करण्याची सूचना देण्यात आली. माध्यमिक शाळांमध्ये मात्र बंगालीचा वापर चालूच राहिला. बंगालीच्या या प्रभुत्वामुळे साहजिकच बंगाली तरुणांचा शैक्षणिक व प्रशासकीय व्यवस्थेमध्ये प्रवेश सुलभ झाला व त्यांना त्या काळी जेवढ्या शक्य होत्या तितक्या अधिकारपदांपर्यंत सहज पोहोचता आले. बंगाली माणसे आपणाला सांस्कृतिक दर्जाच्या बाबतीत तुच्छ लेखतात, अशी भावना सर्वसामान्य सुशिक्षित आसामी माणसाच्या मनामध्ये घर करून राहिली. ब्रिटिश व बंगाली अशा दोन परकीयांच्या वर्चस्वाखाली आपण राहत आहोत, अशा तऱ्हेचे विचार आसामी मनात दृढमूल झाले. आसामी भाषिक राष्ट्रवादाची ही सुरुवात होती.

न. भा. ५

१९७१ च्या जनगणनेप्रमाणे आसामातील आसामी भाषिकांची संख्या ६०.८९% एवढी आहे. याचाच अर्थ असा, की भारतातील इतर भाषिक राज्यांतील भाषिक समूहांच्या तुलनेने आसाममधील आसामी भाषिकांचे प्रमाण फार मोठे नाही. असे वाटण्याचा संभव आहे, की बंगाली लोकांच्या आगमनाने आसामी भाषिकांची टक्केवारी कमी झाली असावी; परंतु गमतीची गोष्ट म्हणजे परिस्थिती नेमकी उलट आहे. आसामी भाषिकांची संख्या व टक्केवारी या शतकामध्ये सातत्याने वाढत राहिली आहे हे एक गूढ आहे. १९७१ च्या जनगणनेप्रमाणे फक्त २२% लोकांनी आसामी ही आपली मातृभाषा म्हणून नोंदविली होती, तर ४८% लोकांनी बंगाली ही आपली मातृभाषा असल्याचे जाहीर केले होते. १९३१ मध्ये ३, ९६०, ७१२ लोकांनी बंगाली, १,९९२,८४६ लोकांनी आसामी व १, २५३, ५१५ लोकांनी विविध आदिवासी भाषा या आपल्या मातृभाषा असल्याची नोंद केली. अशा रीतीने १९३१ पर्यंत तरी आसामी भाषा राज्यातील बहुसंख्य लोकांची मातृभाषा नव्हती. राज्यपुनर्रचना आयोगानेदेखील १९५५ मध्ये आसामला भेट देऊन या गोष्टीची नोंद आपल्या अहवालामध्ये केलेली आहे.

१९४१ च्या जनगणनेमध्ये युद्धकालीन आर्थिक स्थितीमुळे भाषाविषयक आकडेवारीचे वर्गीकरण केलेले नाही. परंतु १९५१ मध्ये आसामी भाषिकांचे प्रमाण एकदम ५६.७% पर्यंत गेले. १९३१ मध्ये ते फक्त ३१.४% एवढेच होते. तसेच बंगाली भाषिकांची संख्या मात्र १९५१ मध्ये १६.५% इतकी खाली आली. एवढेच नव्हे, तर आसामीखेरीज इतर सर्व

भाषिकांची टक्केवारीही खाली आली- आसामातील १९५१ च्या जनगणनेचे अधीक्षक आर. बी. वाघाईवाला हे या बदलाने स्तिमित झाले व त्याची नोंद त्यांनी जनगणना अहवालामध्ये केलेली आहे. १९६१च्या जनगणनेप्रमाणे आसामी भाषिकांची संख्या ५७·१४% तर १९७१ च्या जनगणनेप्रमाणे ती ६०·८०% एवढी होती.

१९४७ मध्ये करिमजंग वगळून बाकीचा सिल्हेट जिल्हा आसामातून पूर्व पाकिस्तानात गेला हे लक्षात घेतले, तरी आसामी लोकांची टक्केवारी इतक्या मोठ्या प्रमाणामध्ये वाढण्याचे कारण एकच असावे आणि ते म्हणजे आसामातील आसामी लोकांची भाषिक राष्ट्रवादाची भावना जशी वाढली, त्या प्रमाणात इतर भाषिकांनी आसामी ही आपली मातृभाषा असल्याचे व्यावहारिक कारणांसाठी नमूद केलेले असावे. चहाच्या मळयांत काम करणाऱ्या मजुरांनी तर आसामी भाषेचा स्वीकार केलेलाच होता व आपल्या मुलांनाही ते आसामी शाळांतून पाठवीत असत. परंतु त्याचबरोबर बहुसंख्य बंगाली अतिक्रामक मुसलमानांनीदेखील आसाममधील आपली वसती सुरक्षित व्हावी यासाठी आसामी भाषेची नोंद आपली मातृभाषा म्हणून केली असावी, असे दिसते. बंगाली हिंदूंनी मात्र नेहमीच आपली मातृभाषा बंगाली असल्याची नोंद केलेली आहे. ब्रह्मपुत्रेच्या खोऱ्यातील मुसलमान बंगाली लोकांच्या बाबतीत मात्र स्वातंत्र्यपूर्व कालातही त्यांनी आसाममध्ये जमिनी कसण्यास किंवा विकत घेण्यास सुरवात केल्यापासूनच आसामी ही स्वतःची मातृभाषा म्हणून नोंदविण्याची प्रवृत्ती दिसते. याउलट, काचर जिल्ह्यात मात्र आसामी लोकांकडे जमिनीची मालकी नसल्याने तेथील बंगाली मुसलमानांनी मात्र स्वतःची मातृभाषा बंगाली असल्याचीच नोंद केलेली आहे. १९६१च्या जनगणनाअहवालात आसामच्या जमगणना अधीक्षकांनी बंगाली मुसलमानांमधील या प्रवृत्तीचा खास उल्लेख केलेला आहे.

आसाममध्ये मुळात असलेल्या आदिवासी लोकांमुळे व परराज्यांतून सातत्याने येऊन स्थायिक झालेल्या लोकांमुळे आसामचे आजचे स्वरूप बहुभाषिक व बहुवांशिक झालेले आहे. सध्या राज्यातील आसामी भाषिकांची संख्या फक्त ६०·८९% एवढीच असून १०·९८% लोक विविध प्रकारच्या स्थानिक आदिवासीभाषा बोलतात. १९·७१% लोकांची मातृभाषा बंगाली आहे. बिहार, उत्तरप्रदेश व राजस्तानमधून येऊन स्थायिक झालेल्या हिंदी भाषिकांची संख्या ४·३% आहे. बंगाली व हिंदीखेरीज नेपाळी व संथाळी, ओरेऑं, मुंडा (बिहार व ओरिसातील आदिवासी लोकांच्या भाषा) या भाषाही बोलणारे लोक आहेत. १९७१ च्या जनगणनेप्रमाणे २९ लाख लोक म्हणजे राज्याच्या लोकसंख्येच्या २७% लोक दुसऱ्या घटकराज्यांतील किंवा नेपाळसारख्या परकीय देशाची भाषा बोलतात. प्रत्यक्षात हे प्रमाण अर्थातच २७% हून अधिक असणार; कारण बंगाली मुसलमानांनी मोठ्या प्रमाणावर आपली मातृभाषा म्हणून आसामीची नोंद केलेली आहे.

साधारणतः स्वातंत्र्योत्तर काळातील प्रत्येक जनगणनेच्या आसपास आसाममध्ये भाषिक प्रश्नावरून दंगली झालेल्या आहेत. हा निव्वळ योगायोग आहे किंवा कसे याबद्दलचे निश्चित अनुमान काढता येणार नाही.

भाषेच्या प्रश्नावरून पहिली दंगल १९५१ मध्ये झाली. आसामभाषाकायदा मंजूर झाल्यानंतर दुसरी दंगल १९६१ मध्ये झाली आणि तिसरी दंगल १९७२ मध्ये गोहत्ती व दिब्रुगढ विद्यापीठांमध्ये आसामी भाषा माध्यम म्हणून स्वीकारण्याच्या प्रश्नावरून झाली. सध्या आसाममध्ये चाललेल्या आंदोलनामध्ये परकीय अतिक्रामकांच्या प्रश्नाबरोबरच भाषेचा प्रश्नही गुंतलेला आहे, हे लक्षात घेतले पाहिजे. आसामी भाषिकांना असे वाटते, की आसामी भाषेला आसाममध्ये तिची न्याय्य जागा मिळण्यामध्ये बंगाली भाषिकांनी अनेक अडथळे निर्माण केलेले आहेत आणि प्रत्येक वेळेला आसामी भाषिकांना झगडूनच आपल्या भाषेचे अस्तित्व व स्थान टिकवता आले आहे.

आसामी भाषिकांच्या तक्रारीमध्ये काही अंशी तथ्य असले, तरी या प्रश्नाची दुसरी बाजूही आहे हे विचारात घेणे आवश्यक आहे. एक तर आसाममध्ये आसामी भाषिकांची संख्या १९५१ नंतरच वाढलेली दिसते व तीही सुमारे ६०.८९% एवढीच आहे, हे आपण वर पाहिलेलेच आहे. ही टक्केवारीही

अनुक्रमणिका

कितपत विश्वासार्ह आहे, हा प्रश्न आहेच; कारण बंगाली मुसलमानांनी मोठ्या प्रमाणावर आपली भाषा बंगालीऐवजी आसामी दाखविलेली आहे. त्यामुळे आसाम हे एक बहुभाषिक राज्य आहे ही वस्तुस्थिती आसामी भाषिकांनी मान्य करावी, असा बंगाली भाषिकांचा आग्रह आहे. परंतु ही वस्तुस्थिती मान्य करणे म्हणजे आसामी भाषेवर व पर्यायाने आसामी संस्कृतीवर बंगाली भाषेचे व संस्कृतीचे आक्रमण करण्यास संमती देणे होय, असे आसामी लोकांना वाटते.

बंगाली कर्मचारी ब्रिटिश अधिकाऱ्यांच्या सतत जवळ असल्याने त्यांनी या अधिकाऱ्यांचा आसामी भाषेविषयी प्रतिकूल ग्रह करून दिला व बंगाली आसामवर लादली, असे आसामी भाषिकांचे मत आहे. या संदर्भात एकदोन मुद्दे विचारात घेतले पाहिजेत. एक म्हणजे अनेक बंगाली विचारवंतांनी आसामी भाषेचे सखोल अध्ययन करून आसामीतील प्राचीन वाङ्मयाचा शोध घेण्याचे महत्त्वपूर्ण कार्य केलेले आहे. दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे बंगाली इतिहासकारांच्या मते बंगाली कनिष्ठ कर्मचारी म्हणजे 'बाबू' ब्रिटिश वरिष्ठ अधिकाऱ्यांपर्यंत पोहोचून त्यांचा आसामीविषयी प्रतिकूल ग्रह करून देतील असे मानणे हे असंभवनीय व हास्यास्पद आहे. तिसरी महत्त्वाची गोष्ट अशी, की बंगाली भाषेचा वापर महसूल व न्यायखात्यामध्ये अशा वेळेला सुरू झाला, की जेव्हा म्हणजे मार्च १८३५ मध्ये ब्रिटिशशासनाने मेकॉलेची शिक्षणविषयक मते मान्य करून भारतीयांना इंग्रजी भाषा व विद्या यांचे ज्ञान देण्याचे धोरण निश्चित केले होते. त्यामुळे ब्रिटिश सरकारचे धोरण पाश्चात्य शिक्षणप्रसारावर अधिक खर्च करण्याचे होते व एतद्देशीय भाषांना आपल्या शिक्षणसंस्था चालविताना खाजगी लोकाश्रयावरच अवलंबून राहावे लागत असे. तेव्हा बंगालीचा प्रसार अधिक झाला याचा दोष बंगाली भाषिकांकडे जात नाही. आसामी भाषिकांचे खाजगी प्रयत्न कमी पडले, हेच त्याचे मुख्य कारण आहे.

वस्तुस्थिती अशी होती, की या काळपर्यंत बंगालमध्ये व बंगालचाच एक प्रशासकीय भाग असलेल्या आसाममध्ये पर्शियन भाषा ही राजव्यवहाराची भाषा होती. बंगालवरील मुघलसत्तेचा हा वारसा होता. १८३७ मध्ये कायद्यानुसार पर्शियनची जागा बंगालीने घेतली. यातही गमतीची गोष्ट अशी, की या बदलामुळे पर्शियन भाषेचे शिक्षण घेतलेल्या बंगाली पंडितांचा वृत्तिच्छेद झाल्याने त्यांनी याविरुद्ध तीव्र प्रतिक्रिया व्यक्त केली. तसे पाहिले तर बंगाली भाषेला सध्याचे आधुनिक रूप बंगालमधील प्रबोधनानंतर म्हणजे एकोणिसाव्या शतकाच्या शेवटच्या काही दशकांमध्ये प्राप्त झाले. त्याअगोदरच्या प्राचीन बंगाली गद्याचे ज्ञान राजव्यवहाराला उपयुक्त नव्हते व सर्वसामान्य बंगाली माणूस अशा तऱ्हेच्या बंगालीशी फारसा परिचित नव्हता. बंगाली इतिहासकारांचे मत असे आहे, की ज्या बंगालीचा वापर राजव्यवहारासाठी होत होता ती बंगाली म्हणजे बंगाली, आसामी व उर्दू यांची बनलेली एक संकरित भाषा होती, आणि तिचे शिक्षण शाळांमधून देण्याचे एकमेव कारण म्हणजे राजदरबारी नोकरी मिळविण्यासाठी तिचा उपयोग व्हायचा एवढेच. दुसरा एक महत्त्वाचा मुद्दा असा, की पर्शियन भाषेचा जरी ब्रिटिश प्रशासनाने त्याग केला, तरी बराच काळपर्यंत महसूल व न्यायखात्यांमध्ये मुघलांची प्रशासनव्यवस्था चालू राहिली. अहोम वरिष्ठवर्णीय किंवा अहोम कायदे या मुघल प्रशासनव्यवस्थेपासून सर्वस्वी अलग राहिल्याने बंगालीऐवजी आसामीचा वापर प्रशासनात होणेही कठीण होते. अहोम वरिष्ठवर्णीयांना सरकारी नोकऱ्यांची जशी वाढती गरज वाटू लागली, त्याबरोबर आसामी मध्यमवर्गाचा उदय झाला आणि अखेरीस या मध्यमवर्गाच्या प्रयत्नामुळे १८७३ मध्ये आसामी भाषेला न्यायदरबारी तसेच शिक्षणव्यवस्थेमध्ये तिचे योग्य स्थान मिळाले. आणि याबाबतीतही रमेशचंद्र दत्त या तरुण बंगाली आय. सी. एस. अधिकाऱ्याने आसामीच्या बाजूने मत दिल्यानेच हा निर्णय झाला, हेदेखील लक्षात ठेवले पाहिजे. अशा रीतीने खरे म्हणजे जो काही संघर्ष होता, तो बंगाली व आसामी या भाषांमधला नव्हता; तर बंगाली मध्यमवर्गामध्ये इंग्रजी भाषेचे शिक्षण घेऊन सरकारी नोकऱ्या पटकावण्याबाबतचा होता.

बंगाली व आसामी भाषिकांमध्ये तेढ का व कशी निर्माण झाली ते व त्याबद्दलचे उभयतांचे

अनुक्रमणिका

दृष्टिकोन आतापर्यंत पाहिले. या दोन्ही बाजू आपापल्या परीने योग्य आहेत, असे म्हणता येईल. पश्चिम बंगाल व बांगलादेश मिळून एकूण बंगाली भाषिकांची हिंदी उपखंडामध्ये बारा कोटींहून अधिक लोकसंख्या असून तो दक्षिण आशियातील हिंदीखालोखाल सर्वांत मोठा भाषिक समूह आहे. बंगाली भाषिकांची खुद्द आसाममधील मोठी संख्या, बंगाली भाषेचे प्रगत स्थान व प्रशासकीय क्षेत्र, उद्योगधंदे इत्यादी ठिकाणी बंगाली भाषिकांचे असलेले प्रभुत्व यांचा विचार करताना आसामी भाषिकांच्या मनामध्ये बंगाली भाषिकांच्या सांस्कृतिक वर्चस्वाबद्दल भीती असणे मानसशास्त्रीय दृष्टिकोनातून स्वाभाविकच मानावे लागेल. परंतु त्याबरोबरच बंगाली व आसामी भाषिकांतील आजचा दुरावा हा ब्रिटिश राजवट व तिचे साम्राज्यवादी धोरण व एकंदर आधुनिकीकरणाची प्रक्रिया याचा अपरिहार्य परिणाम होता, हेही मान्य करावे लागेल.

ऐतिहासिक कारणे काहीही असोत; आसामी भाषिक राष्ट्रवादाच्या जागृतीनंतर स्वातंत्र्योत्तर काळात वर नमूद केल्याप्रमाणे भाषिक संघर्षांना सुरवात झाली, ही गोष्ट मात्र खरी. त्याचाच एक अटळ परिणाम म्हणजे आसामच्या विघटनाची प्रक्रिया होय. १९६१ च्या भाषिक संघर्षानंतर आदिवासी लोकांनी आसामी भाषिकांच्या वर्चस्वाला घाबरून आसामपासून स्वतंत्र होण्याची मागणी सुरू केली व त्यामुळे मेघालयचे स्वतंत्र राज्य निर्माण झाले. १९७२ च्या भाषिक दंगलीनंतर बहुसंख्य बंगाली भाषिक असलेल्या काचर जिल्ह्यामध्ये आसामपासून स्वतंत्र होण्याची मागणी होऊ लागली व नजीकच्या काळात ही मागणी अधिक निकराने पुढे रेटली जाण्याचा संभव आहे. आतापर्यंत बंगाली मुसलमानांनी जनगणनेमध्ये आसामी ही आपली मातृभाषा असल्याची नोंद केलेली असली, तरी परकीय अतिक्रामकांविरुद्धच्या मोहिमेनंतर कदाचित पुढील काळात ते आसामी भाषेकडे पाठ फिरवतील अशी शक्यता आहे. तसे झाले, तर आसामी भाषिकांची बहुसंख्या फक्त काही जिल्ह्यांपुरतीच मर्यादित राहील. भाषिक संघर्षाला अशा रीतीने जातीयतावादी स्वरूप येणे संभवनीय आहे.

## आसामप्रश्नाची आर्थिक बाजू

आसामसमस्येचा विचार करताना परकीय अतिक्रामकांच्या प्रश्नाबरोबरच भाषिक अस्मितेचा प्रश्न कसा गुंतलेला आहे, ते आतापर्यंत पाहिले. याबरोबरच आसामचे आर्थिक प्रश्नही विचारात घ्यावयास हवेत. स्वातंत्र्योत्तर काळात आसामच्या आर्थिक विकासासाठी सरकारने प्रयत्न केलेले असले, तरी ते अपुरे आहेत. एकंदर औद्योगीकरणाचा वेग मंद आहे. आसामचा खरा प्रश्न आर्थिक आहे असे पंतप्रधान जेव्हा म्हणतात, तेव्हा ती एकप्रकारे या बाबतीतील अपयशाची अप्रत्यक्ष कबुलीच होय. आसामातील मुख्य उद्योगधंदे जे ब्रिटिशांनी सुरू केले, तेच म्हणजे तेल, चहा, कोळसा, प्लायवूड हे होत व त्यांचीही वाढ नंतरच्या काळात समाधानकारक रीतीने झालेली नाही.

आसाममध्ये अजूनही सर्वत्र ब्रॉडगेज रेल्वेमार्ग आलेला नाही. बहुतांश ठिकाणी मीटरगेज मार्ग आहेत. दिसपूर ( गोहत्ती ) हे भारतातील घटकराज्यांच्या राजधान्यांपैकी एकमेव राजधानीचे ठिकाण असे आहे, की जे दिल्लीला अद्यापि ब्रॉडगेज मार्गाने जोडलेले नाही. गोहत्तीहून दिल्लीला जाण्यासाठी दोनदा गाडी बदलून कित्येकदा तीन दिवसही लागतात. भारतात सरासरीने एकहजार किलोमीटरमागे १८ किलोमीटर रेल्वेमार्ग आहेत, तर आसामात हेच प्रमाण ११ किलोमीटर इतकेच आहे. भारतातील प्रत्येक १०० चौरस किलोमीटर जमिनीमागे सरासरीने ९ किलोमीटर रस्ते आहेत, तर आसामात फक्त ४ किलोमीटर्स; वीजेचा वापर आसामात दरडोई फक्त १० किलोवॅट्स एवढाच होतो, तर पश्चिम बंगालमध्ये तो ११३ किलोवॅट्स एवढा आहे. आसामातील लोकसंख्या गेल्या दोन दशकात ३५% नी वाढली, तर धान्योत्पादन फक्त १४% नी वाढले. नियोजनाच्या प्रारंभी आसामची सार्वजनिक कर्जे ३·६९ कोटी होती, ती आता १९७९ मध्ये ७०४ कोटींच्या घरात गेली आहेत. त्यामुळे आसामला मोठ्या प्रमाणावर केंद्रीय मदतीवर अवलंबून राहणे भाग आहे.

वरील आकडेवारीवरून आसामचे आर्थिक मागासलेपण लक्षात येते. आसामातील फक्त ८.९% लोकसंख्या नागरी भागात राहते. आज भारतातील



अनुक्रमणिका

नागरी भागातील साक्षरतेच्या प्रमाणापेक्षा (६०%) आसामातील नागरी भागातील साक्षरतेचे प्रमाण अधिक चांगले आहे (६७%). ग्रामीण भागातही आसामातील साक्षरता ३१ % आहे, तर भारतातील ग्रामीण भागातील साक्षरतेचे प्रमाण २८% टक्के आहे. भारतातील अनेक प्रगत राज्यांपेक्षा आसामातील साक्षरतेचे प्रमाण चांगले असूनही तेथील सुशिक्षितांतील बेकारीचे प्रमाण प्रचंड आहे. एका अंदाजानुसार आसामातील बेकारांची संख्या दोन दशलक्षांपर्यंत गेली आहे. यांतील बहुसंख्य आसामी आहेत, हे सांगावयास नकोच. जनगणना अहवालाप्रमाणे १९६१ मध्ये आसामातील काम करणाऱ्या लोकसंख्येचे प्रमाण ४३% होते ते १९७१ साली २९% इतकोणे खाली आले आहे. याचाच अर्थ असा, की काम करणाऱ्या लोकांचे प्रमाण वाढण्याच्या ऐवजी दरवर्षी १.४% इतके कमी होत आहे. आसामच्या एकंदर आधुनिक अर्थव्यवस्थेवरच राज्याबाहेरून आलेल्या लोकांचे वर्चस्व आहे. राजस्थानातून आलेल्या मारवाड्यांची व्यापार, चहा, ज्यूट व प्लायवूड हे उद्योगधंदे यांच्यावर पकड आहे. शासकीय कॉंट्रॅक्ट्स, पुरवठा, वाहतूक, फर्निचर्स आणि क्रीडाविषयक सामग्री हे उद्योग पंजाबी माणसांच्या हाती आहेत. कारकुनापासून अधिकाऱ्यापर्यंतच्या सर्व पांढरपेशा नोकऱ्यांमध्ये बंगाली माणसांचे वर्चस्व आहे. पारंपरिक अर्थव्यवस्थेचा विचार केला तरीसुद्धा असे दिसते, की बहुतेक सर्व श्रमिकवर्गापैकी रिक्षावाले आणि गाडीवान बिहार, ओरिसा व उत्तर प्रदेश या राज्यांतून आलेले आहेत. बहुतेक झाडूवाले पंजाबातून आलेले नामधारी शीख आहेत. बहुतेक टूकड्रायव्हर्स पंजाबी, नेपाळी, बंगाली किंवा बिहारी आहेत. बहुतेक नाभिकवर्ग बंगाली व बिहारी आहे. सुतार, गवंडी आणि अन्य कुशल किंवा निमकुशल कामगारसुद्धा पंजाबी, बिहारी किंवा बंगाली आहेत. शेतीव्यवसायाच्या कामामध्येदेखील आता ब्रह्मपुत्रेच्या खोऱ्यातील बहुतेक सर्व जिल्ह्यांमधून पूर्व पाकिस्तानातून आलेल्या बंगाली मुस्लिमांनी आपले वर्चस्व प्रस्थापित केले आहे. अशा रीतीने आसामच्या एकंदर अर्थव्यवस्थेमध्ये आसामी लोकांना फारसे स्थान नसल्याचे दिसून येते. चहा, तेल, कोळसा, प्लायवूड यांचे उत्पादन आसाममध्ये होत असले, तरी ब्रिटिशकाळापासून तत्संबंधीच्या साठा, वितरण, विक्री, बाजारव्यवस्था, बँकिंग इत्यादी सर्व आर्थिक क्रियांची सूत्रे कलकत्ता येथील कचेऱ्यांतून हलविली जातात व त्यामध्ये आसामी माणसांना कोणत्याही प्रकारचे स्थान नाही. जीवनाच्या बहुतेक सर्व क्षेत्रांमध्ये बिगरआसामी माणसांचे यश डोळ्यांत अधिक भरते. स्वातंत्र्योत्तर काळात व्यापार व उद्योगधंदे यांच्या वाढीबरोबर ज्या नवीन नोकऱ्या उपलब्ध झाल्या, त्याही बिगरआसामी लोकांच्या कार्यकौशल्यामुळे आसामी लोकांना मोठ्या प्रमाणावर मिळू शकल्या नाही. शिवाय अशा तऱ्हेच्या नवीन नोकऱ्या सुरुवातीला किफायतशीर नसतात, हा सार्वत्रिक अनुभव आहे. त्यामुळे आसामी माणसांनी त्यांच्याकडे पाठ फिरवली. परिणामतः बाहेरून आलेल्या बिगरआसामी वांशिक समूहांचे माणशी उत्पन्न सर्वसामान्य आसामी माणसापेक्षा अधिक आहे आणि त्यांच्या हातांमध्ये आकर्षक नोकऱ्याही आहेत. या सर्व आर्थिक परिस्थितीमुळे आसामी माणसांमध्ये एकप्रकारची कटुता निर्माण झालेली असून त्यांच्यामध्ये भाषिक राष्ट्रवादाच्या जोडीला वांशिक राष्ट्रवादाची भावना उदयाला आली आहे.

## आसामचा प्रश्न आणि भारतीय संघराज्यपद्धती

वरील सर्व विवेचनावरून आसामचा प्रश्न कसा गुंतागुंतीचा झालेला आहे, ते दिसून येईल. परकीय अतिक्रामकांच्या प्रश्नाबरोबरच त्यामध्ये अनेक प्रकारचे भाषिक, वांशिक, राजकीय, आर्थिक, सामाजिक प्रश्न गुंतलेले आहेत. परकीय अतिक्रामकांचा प्रश्न हा केवळ हिमनगाचा दिसणारा वरचा भाग आहे. परकीय अतिक्रामकांच्या प्रश्नावर एखादा तोडगा नजीकच्या काळात काढावाच लागेल. परंतु आसामची समस्या तेवढ्याने संपणारी नाही. तिच्यासाठी दीर्घकालीन उपाययोजना आखावी लागेल. किंबहुना आसामच्या प्रश्नाने भारतीय संघराज्यपद्धती, भारताने स्वीकारलेली इहवादी राज्याची कल्पना, भारतीय नागरिकत्वासंबंधीच्या तरतुदी यांसंबंधीचेच मूलभूत महत्त्वाचे प्रश्न उपस्थित होतात. आणि म्हणूनच आसामची समस्या

केवळ आसामपुरती मर्यादित नसून ती अखिल भारताचीच समस्या आहे. एवढेच नव्हे, तर आसाम व ईशान्य भारताच्या सुरक्षिततेवर संपूर्ण भारताची सुरक्षितता अवलंबून आहे. याबाबतीत आंतरराष्ट्रीय राजकारणाच्या संदर्भातही आसाम-समस्येला महत्त्व प्राप्त झाले आहे, हे विसरून चालणार नाही.

भारताच्या राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या चळवळीतून भारतीय राष्ट्रवादाने आकार घेतला. ब्रिटिश सत्ते-विरुद्ध लढताना साहजिकच भारतातील विविध भाषिक व वांशिक समूहांमध्ये स्वाभाविक असणारे तणाव एका विशिष्ट मर्यादेपलीकडे कधी ताणले गेले नाहीत. विविधतेतून एकता हा मूलमंत्र मानून आपल्या राष्ट्रीय नेत्यांनी भारत हे एक राष्ट्र आहे याची भावना जनतेमध्ये जोपासण्याचा प्रयत्न केला. सर्वांना समान असणारा शत्रू दृष्टिआड झाल्यानंतर मात्र स्वातंत्र्योत्तर कालात आर्थिक व सामाजिक विकास साधण्याच्या प्रयत्नामध्ये भारतातील विविध भाषिक व वांशिक समूहांमध्ये असणारे तणाव उसळून वर आले आहेत. घटनाकारांनी घटनेमध्ये भाषिक व धार्मिक अल्पसंख्य गटांच्या स्वातंत्र्याचा विचार करून त्यांच्या सुरक्षिततेच्या तरतुदी जरूर केल्या; परंतु त्याबरोबर बहुसंख्य भाषिक व वांशिक समूहगटांना स्वतःची अस्मिता कायम राखण्याच्या दृष्टीनेदेखील स्वायत्ततेची गरज असते, याचा विचार करून तत्संबंधीच्या तरतुदी केलेल्या नाहीत. किंबहुना, असा विचार केल्याने भारताची एकात्मताच धोक्यात येईल व भारत हे एक राष्ट्र राहणार नाही अशी भीती घटनाकारांच्या मनामध्ये असावी, असे दिसते. घटनाकारांची भीती अगदीच निराधार होती असे नाही. याचा परिणाम असा झाला, की आपण जी संघराज्यपद्धती स्वीकारली, तिचा आत्मा एकात्मतेचाच आहे. आपण एकेरी नागरिकत्वाची पद्धती स्वीकारली, त्यामुळ कोणत्याही भाषिक व वांशिक समूहगटाला दुसऱ्या भाषिक व वांशिक समूहगटाकडून होणारे अतिक्रमण वा वर्चस्व रोखणे कठीण झाले आहे. यामधूनच आसामआंदोलन











पंजाबचा प्रश्न, शिवसेनेची चळवळ, द्रविडस्तानची मागणी अशांसारख्या समस्या उभ्या राहिल्या आहेत. गल्या पस्तीस वर्षांमध्ये जनता राजवटीचा अपवाद वगळल्यास एकच पक्ष केंद्रस्थानी राहिला. बऱ्याच घटकराज्यांत काँग्रेसचीच सत्ता राहिली. जवाहरलाल नेहरू, इंदिरा इंदिरा गांधी यांसारखे पंतप्रधान लाभले. यामुळे या विविध भाषिक व वांशिक समूहगटांनी आपली स्वायत्ततेची मागणी पुढे रेटली नाही. परंतु केंद्रामधील काँग्रेससत्ता दुर्बल होणार याची चिन्हे दिसू लागताच आणि अनेक घटकराज्यांत काँग्रेसेतर मंत्रिमंडळे अधिकारावर येताच, स्वायत्ततेच्या मागणीने जोर धरला आहे. घटकराज्यांची आर्थिक उत्पन्नाची साधने कमी असल्याने आपल्या विकासयोजना राबविताना घटकराज्यांना बहुतांशी केंद्रीय अनुदाने व मदत यांवर अवलंबून राहावे लागते. याबरोबरच आर्थिक नियोजनाचा स्वीकार केल्याने आर्थिक सत्तेबरोबरच धोरण ठरविण्याची सत्तादेखील केंद्राकडे एकवटली आहे. परिणामी राष्ट्रीय विकास मंडळासारख्या निर्णयप्रक्रियेमध्ये घटकराज्यांना समाविष्ट करून घेण्याबाबत ज्या काही थोड्याफार उपाययोजना नंतर केल्या, त्यांचे महत्त्वही कमी झाले आहे. तामीळनाडू सरकारने १९७० मध्ये केंद्र-घटकराज्यसंबंधाचा विचार करून सूचना करण्यासाठी पी. व्ही. राजमनार समिती नेमली. यानंतर तामिळनाडूखेरीज पश्चिम बंगाल, जम्मू आणि काश्मीर, आंध्रप्रदेश, कर्नाटक येथील काँग्रेसेतर सरकारांनी, एवढेच नव्हे तर अनेक घटकराज्यांतील काँग्रेस सरकारांनीसुद्धा केंद्र-घटकराज्यसंबंधांचा फेरविचार करून आर्थिक बाबतीत घटकराज्यांना अधिक स्वायत्तता द्यावी, असे सुचविले आहे. याबाबत दक्षिणेकडील राज्यांनी अलीकडेच एक संयुक्त निवेदन प्रसृत केल्यानंतर केंद्रसरकारने या प्रश्नाचा संपूर्ण फेरविचार करण्यासाठी सरकारीया आयोगाची नियुक्ती केली आहे. ऑक्टोबर ८३ मध्ये श्रीनगरला भरलेल्या विरोधी पक्षांच्या बैठकीमध्येही याविषयी एकतीसकलमी शिफारसी करण्यात आल्या आहेत.

आसाम प्रश्नाच्या संदर्भातही केंद्र-राज्यसंबंधांचा फेरविचार आवश्यक ठरतो. एकदा नागरिकत्वासंबंधीचे अधिकार घटनेने केंद्राकडे सोपविल्यानंतर कोणत्याही घटकराज्यामध्ये परकीय नागरिक मोठ्या प्रमाणावर अतिक्रमण करून वास्तव्य करू लागले, तर त्यांना प्रतिबंध करण्याची तसेच आपल्या सीमा सुरक्षित राखण्याची घटनात्मक व नैतिक जबाबदारी केंद्रसरकारची आहे. आसामबाबत व एकंदर ईशान्येकडील राज्यांबाबत ही जबाबदारी केंद्रसरकारने पार पाडलेली नाही, हे उघड आहे. त्यातही आणखी गुंतागुंतीची गोष्ट झाली ती अशी, की नागरिकत्वाची प्रमाणपत्रे देण्याचे अधिकार केंद्राने पश्चिम बंगाल सरकारला दिल्यानंतर पश्चिम बंगाल सरकारने अविवेकाने व मुक्तहस्ताने अशी प्रमाणपत्रे पूर्व पाकिस्तानातून येणाऱ्या बंगाली भाषिकांना दिली व ही प्रमाणपत्रे घेऊन हे लोक आसाममध्ये शिरून स्थायिक झाले. त्यामुळे परकीय अतिक्रामकांबाबत आसाम सरकारचे कोणतेही नियंत्रण राहिले नाही. आसामचे भूतपूर्व मुख्यमंत्री कै. गोपीनाथ बोर्डोलोई यांनी यासाठी आसाम सरकारला 'परमिट' पद्धतीचा वापर करण्याची परवानगी मागितली होती; परंतु केंद्रसरकारने ती नाकारली. याचा मूक निषेध म्हणून गोपीनाथ बोर्डोलोई यांनी १९४९ मध्ये पं. जवाहरलाल नेहरूंनी आसामला पंतप्रधान म्हणून जेव्हा प्रथम भेट दिली, तेव्हा त्यांच्यासाठी आयोजित केलेल्या सत्कारसमारंभांना अनुपस्थित राहणे पसंत केले.

आसामपुढील पेच तर दुहेरी आहे. एका बाजूला परकीय अतिक्रामकांचे अतिक्रमण व दुसऱ्या बाजूला परराज्यांतील व विशेषतः पश्चिम बंगालमधील भारतीय नागरिकांची होणारी आवक अशा कात्रीमध्ये आसामची स्थानिक जनता सापडली आहे. आधीच आसामी भाषिकांचे राज्यातील प्रमाण फारसे मोठे नाही. त्यामुळे आसामी जनतेला आपल्या भाषिक व वांशिक अस्मितेचे रक्षण करावेसे वाटणे स्वाभाविक असून त्याचा सहानुभूतीने विचार केला पाहिजे. सुदैवाने इतक्या संकटांतून वाटचाल करीत असतानाही आसाममधील आंदोलनाचे नेते व जनता पंजाबातील शिखांच्या आंदोलनाप्रमाणे फुटीरतेची मागणी करीत नाही, याबद्दल भारतीय जनतेने आसामशी कृतज्ञ राहिले पाहिजे. आज मुंबईसारख्या शहरामध्ये परराज्यांतून

येणाऱ्या लोकांचा लोंढा व त्यामुळे सर्वसामान्य मराठी माणसाला या शहरामध्ये वाटणारी आर्थिक व सांस्कृतिक असुरक्षितता यांचा विचार केला, तर तुलनेने आसामी लोकांपुढील प्रश्न हा खरोखरच जीवनमरणाचा प्रश्न आहे यात काहीच शंका राहत नाही. भारतीय घटनेनुसार आपण भारतीय नागरिकांना मुक्तसंचारस्वातंत्र्य व भारताच्या कोणत्याही भागात वास्तव्य करण्याचे व स्थायिक होण्याचे स्वातंत्र्य दिले आहे. भारतीय संघराज्यात राहून संरक्षण व आर्थिक विकासाचे फायदे मिळवायचे असतील, तर भारतीय घटनेने नागरिकांना दिलेला हा अधिकार विनातक्रार मान्य करावयास हवाच. परंतु त्याबरोबरच एखाद्या राज्यामध्ये असलेल्या बहुसंख्य भाषिक व वांशिक समूहगटाला स्वतःची स्वायत्तता व अस्मिता टिकविण्याच्या दृष्टीने काही खास सवलतीही द्याव्या लागतील. भारतातील आर्थिक विकासाची व आधुनिकीकरणाची प्रक्रिया व त्यातून उद्भवणारी लोकांची चलनशीलता याबरोबर विविध भाषिक व वांशिक समूहांतील अशा प्रकारचे तणाव निदान संक्रमणावस्थेमध्ये तरी अधिकाधिक वाढतच जाणार. या दृष्टीने विचार करता स्थानिक माणसांना नोकऱ्यांमध्ये प्राधान्य देण्यासारखी मागणी संकुचित मानता येणार नाही व याची जाणीव सुदैवाने आता सर्वांनाच झालेली आहे. परंतु याबरोबरच यापेक्षाही दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे केंद्राने घटकराज्यांना आपल्या खात्यांप्रमाणे न लेखता त्यांना समान दर्जाने वागविण्यास शिकले पाहिजे आणि याची जाणीव केवळ शासकीय पातळीवरच आहे असे नव्हे, तर पक्षीय पातळीवरदेखील आवश्यक आहे, हे विसरून चालणार नाही.

वास्तविक चहा व तेल यांपासून आसामात केंद्रीय सरकारला कॉर्पोरेशन टॅक्समुळे फार मोठे उत्पन्न मिळते. परंतु त्याचा रास्त वाटा आसामला मिळत नाही, अशी तेथील लोकांची तक्रार आहे. आतापर्यंतच्या वित्तआयोगांनीदेखील याबाबतीत आसामला योग्य न्याय दिलेला नाही. सातव्या वित्त आयोगाने घटक राज्यांना द्यावयाच्या उत्पन्नाची रक्कम दुपटीने वाढविली; परंतु आसामच्या पदरात मात्र यातून काही पडले नाही. उलट, सहाव्या वित्त आयोगाने आसामला ४.५७ % उत्पन्नाचा वाटा दिला होता, तर सातव्या वित्तआयोगाने तो २.४९ % इतका कमी केला आहे. एका बाजूला परकीय अतिक्रामकांमुळे आसामच्या अर्थव्यवस्थेवर कमालीचा ताण पडत आहे. विकासकार्यावर खर्च होणाऱ्या रकमेपेक्षा निर्वासितांवर होणाऱ्या खर्चाचे प्रमाण अधिक आहे, तर दुसऱ्या बाजूला केंद्रसरकार आसामला आर्थिक मदतीच्या बाबतीमध्ये दुजाभावाने वागवीत आहे, असे दिसते. यामुळे जनतेतील असंतोषात अधिकच भर पडली आहे.

लोकप्रिय गोपीनाथ बोर्डोलोईनंतर आसामला केंद्रीय नेत्यांशी सडेतोडपणे वागणारा दुसरा झुंझार नेता लाभला नाही. आसामच्या विघटनानंतर तर आसामच्या मुख्यमंत्रिपदाची केंद्रठिकाणी असलेली प्रतिष्ठा अधिकच घसरली व नोकरशाहीचे वर्चस्व वाढले. त्यामुळे नंतरचे मुख्यमंत्री म्हणजे केंद्रीय काँग्रेसनेते आणि मध्यवर्ती सरकार यांच्या हातांतील बाहुली बनले. परकीय अतिक्रामकांच्या प्रश्नाबाबत केंद्रसरकारवर दडपण आणणारा व ठाम निर्णय घ्यावयास भाग पाडणारा दुसरा मुख्यमंत्री नंतर झालाच नाही. त्यामुळे आसामचा प्रश्न चिघळण्यास आणखी मदत झाली. अशा परिस्थितीत आसामी जनतेने सर्व राजकीय पक्षांच्या नेत्यांना दूर राखून तरुण युवाशक्तीच्या हातामध्ये आंदोलनाची सूत्रे सोपविली, यात नवल ते कोणते?

कोणतेही संघराज्य मजबूत बनवायचे असेल, तर तेथील घटकराज्यांना आर्थिक व प्रशासकीय क्षेत्रांत शक्य तेवढी स्वायत्तता देणे अटळ आहे. त्याशिवाय केंद्राबद्दलची विश्वासाची भावना घटकराज्यांमध्ये निर्माण होणार नाही. विश्वास निर्माण करण्याचा हा प्रश्न केवळ घटनात्मक व कायदेशीर तरतुदींपुरताच मर्यादित नसून त्यामध्ये राष्ट्रीय नेत्यांचे नेतृत्व, चातुर्य यांचीही कसोटी लागते, हेही विचारात घेतले पाहिजे. दुर्दैवाने आसामी जनतेच्या मनामध्ये राष्ट्रीय नेत्यांनी असा विश्वास निर्माण करण्यामध्ये अजाणतेपणी कुचराईच केली आहे, असे दिसून येते. कॅबिनेट मिशन योजनेप्रमाणे आसामला 'क'वर्गीय राज्यांत ढकलण्यास काँग्रेसनेते तयार झाले, येथेच आसामी जनतेच्या विश्वासाला पहिला तडा गेला. दुसरी



अनुक्रमणिका

चूक निर्वासित व अतिक्रामकांच्या आसाममधील वाढत्या संख्येची गंभीर दखल न घेण्याची होती. परंतु याहीपेक्षा आसामी जनतेला जो तीव्र मानसिक धक्का बसला तो चिनी आक्रमणाच्या वेळी ! आसामच्या सरहद्दीपर्यंत चिनी सैनिक आल्यानंतर केंद्रीय मंत्रिमंडळाने घेतलेल्या निर्णयाप्रमाणे आपल्या सैन्याने माघार घेतली. काही तासांतच नागरी अधिकारीदेखील आसाममध्ये राहिले नाहीत. त्या रात्री नभोवाणीवरून पं. नेहरूंनी भाषण करून आसामी जनतेला जवळजवळ निरोप देणारे भाषण केले. यानंतर चिनी सैन्याने एकतर्फी माघार घेतली नसती, तर संपूर्ण आसाम चीनच्या भक्ष्यस्थानी पडणार होता. पं. नेहरूंच्या नभोवाणीवरच्या भाषणाने आसामी जनतेच्या हृदयावर खोलवर जखम झालेली आहे. कर्मधर्मसंयोगाने त्या दिवशी आसामचे मुख्यमंत्री चालिहा दिल्लीमध्येच होते. पं. नेहरूंचे भाषण ऐकताच ते लालबहादूर शास्त्रींकडे गेले आणि त्यांनी त्यांच्याकडे नेहरूंच्या भाषणाविषयीची आपली व्यथा व्यक्त केली. लालबहादूर शास्त्रींनी चालिहांना आश्वासन देण्याच्या सुरात समजावण्याचा प्रयत्न केला. "काही काळजी करू नका चालिहा, पाच वर्षांच्या आत आम्ही फिरून तुम्हाला परत घेतोच !" लालबहादूर शास्त्रींच्या या उद्‌गारांनी स्तंभित झालेले एरव्हीचे मृदुभाषी चालिहा चटकन उत्तरले, "तर मग अशा परिस्थितीत मी आताच चीनशी बोलणी करण्याचे पसंत करीन ! "

वरील उदाहरणे केवळ वानगीदाखल दिली आहेत. परंतु त्यांवरून भारताच्या मुख्य राष्ट्रीय प्रवाहात आपणाला काही स्थान नाही, आसामला केवळ केराची टोपली एवढेच महत्त्व आहे, अशा प्रकारची भावना आसामी जनतेमध्ये का दृढमूल व्हावी, ते दिसून येईल. आसामसारख्या समस्या मुत्सद्देगिरीने हाताळण्यात आपल्या नेत्यांना यश आले तरच भारतीय संघराज्य अभंग राहील.

## भारताचे इहवादी धोरण आणि आसामचा प्रश्न

आसामसमस्येत भारताने स्वीकारलेल्या इहवादी पद्धतीचे भवितव्यही अवलंबून आहे असे वर म्हटले, त्याविषयी थोडेसे लिहिणे आवश्यक आहे. आसाममध्ये मुसलमानांची लोकसंख्या सुमारे २३·३ % इतकी आहे. जम्मू आणि काश्मीरचा अपवाद वगळता इतक्या मोठ्या संख्येने मुसलमानांची वसती दुसऱ्या कोणत्याही घटकराज्यात नाही. आतापर्यंत या राज्यात हिंदू व मुसलमान यांमध्ये सलोखा होता. हा सलोखा भावी कालात टिकेलच याची खात्री देता येत नाही. परकीय अतिक्रामकांच्या प्रश्नावरून उभय धार्मिकांच्या भावना शिगेला पोहोचलेल्या आहेत. नेल्लीसारख्या घटना वारंवार पुन्हा घडल्या, तर आपल्या इहवादी पद्धतीलाच सुरुंग लागल्यावाचून राहणार नाही. मुस्लिम मतदारांवर अवलंबून राहिल्यामुळे इंदिरा कॉंग्रेस परकीय अतिक्रामकांबाबत कठोर धोरण अमलात आणत नाही, असा एक आरोप नेहमी केला जातो. या आरोपात बऱ्याच अंशी सत्यही आहे. परंतु तसे पाहिले, तर अल्पसंख्याकांचा अनुनय करण्याबाबत भारतातील कोणताही राजकीय पक्ष संपूर्ण दोषमुक्त आहे, असे म्हणता येणार नाही. त्यापेक्षाही महत्त्वाची गोष्ट म्हणजे एकदा इहवादी पद्धतीचा स्वीकार केला, की सर्वधर्मियांचा विश्वास संपादन करावा लागणार आणि तो करत असताना कोणतीही उपाययोजना सावधगिरीनेच करावी लागणार. या बाबतीत सरकारपुढे असलेला पेच सहज समजण्यासारखा आहे. आसामचा प्रश्न हा बऱ्याच अंशी कृत्रिम रीतीने केलेल्या हिंदुस्थानच्या फाळणीचा एक अटळ परिणाम आहे, हेही लक्षात ठेवले पाहिजे. आपण इहवादी तत्त्वाचा स्वीकार पूर्ण विचारांती केलेला आहे. व्यक्तिजीवनात किंवा समूहजीवनात काही नैतिक मूल्यांचा स्वीकार एकदा केला, की त्यांचे जतन करण्यासाठी योग्य ते मोल द्यावे लागतेच. तत्त्वशून्य व्यक्ती वा धर्मांध राष्ट्रे यांच्यापुढे असे नैतिक प्रश्न केव्हाच निर्माण होत नाहीत.

तेव्हा जाणीवपूर्वक स्वीकारलेल्या इहवादी धोरणासाठी भारतीय नागरिकांना काही त्याग करावा लागणारच व फाळणीनंतर तो त्याग भारतीय जनतेने केलेलाही आहे. परंतु याबरोबर हेही लक्षात ठेवले पाहिजे, की इहवादी धोरण याचा अर्थ अल्पसंख्याकांचा सदोदित अनुनय करणे व त्यासाठी राष्ट्रीय हितसंबंधांचा त्याग करणे असा

अनुक्रमणिका

होत नाही. आसामच्या बाबतीत तर दुर्दैवाने आपण आपल्या इहवादी धोरणाचा खरा आशय लक्षात न घेता राष्ट्रीय हितसंबंधांना बाधक असे धोरण स्वीकारलेले दिसून येते. इहवादी राज्यामध्ये बहुसंख्याक धर्मीयांनी ज्याप्रमाणे अल्पसंख्याक धर्मियांचे हितसंबंध विचारात घेतले पाहिजेत, त्याप्रमाणे अल्पसंख्याकांनी राष्ट्रीय हितसंबंधांना प्राधान्य देऊन मुख्य राष्ट्रीय प्रवाहाशी एकरूप झाले पाहिजे. याबाबतीत गेल्या पस्तीस वर्षांचा आपला अनुभव फारसा उत्साहवर्धक नाही व याची मुख्य जबाबदारी सर्वच राजकीय पक्षांकडे व त्यांमधील मुस्लिम नेत्यांकडे जाते. आसाम प्रश्नाच्या बाबतीत असे दिसून येते, की केंद्रीय मंत्रिमंडळातील तसेच आसाम मंत्रिमंडळातील मुस्लिम मंत्र्यांनी या प्रश्नाच्या बाबतीत स्वीकारलेले धोरण राष्ट्रीय नव्हे, तर जातीय हितसंबंधांनाच पोषक होते. १९६५ मध्ये सरकारच्या सांगण्यावरून श्री. बी. एन. मुलीक या इंटेलिजन्स ब्यूरोच्या संचालकांनी अतिक्रामकांना प्रतिबंध करण्याची एक योजना तयार केली ( P. I. P. Scheme ). या योजनेप्रमाणे घटक-राज्यांतील पोलिसांची खास पथके उभारून अतिक्रामकांना प्रतिबंध करायचा होता. तसेच बेकायदेशीर अतिक्रामकांबाबतचे प्रश्न तातडीने सोडविण्यासाठी खास न्यायाधिकरणे नेमायची होती. या योजनेवर झालेला सर्व खर्च केंद्रसरकार सोसणार होते. १९६५ ते ६७ या काळात या योजनेची चांगली अमलबजावणी झाली व सुमारे दोन लाख अतिक्रामकांना परत पूर्व पाकिस्तानमध्ये पाठविण्यात आले. परंतु या योजनेमुळे मुस्लिमांवर अन्याय होत असल्याची जोरदार तक्रार त्यावेळचे मंत्री फक्रुद्दिन अली अहमद व त्यांचे एक सहकारी, काचर जिल्ह्याचे नेते व पूर्वीचे केंद्रीय मंत्री मोईनुल हक चौधरी यांनी केली. या दोन्ही मुस्लिम नेत्यांनी आणलेल्या दडपणामुळे अखेर ही योजना कायमची बारगळली व अतिक्रामकांची संख्या वाढू लागली. याचाच अर्थ असा, की पक्षीय हितसंबंध आणि आपण स्वीकारलेल्या इहवादी धोरणाबाबतच्या भोळसट कल्पना यांमुळे राष्ट्रीय हितसंबंधांना गौण स्थान देण्यात आले.

आजही जम्मू आणि काश्मीरमध्ये भारतीय नागरिकांना स्थायिक होण्यास व मालमत्ता संपादन करण्यास बंधने आहेत व दुसऱ्या बाजूस आसाममध्ये परकीय अतिक्रामकांना मुक्तद्वार आहे, हे लक्षात घेता आपल्या इहवादी धोरणाचे बेगडी स्वरूप लक्षात येते. आसाममधील व एकंदर भारतातील मुस्लिम, देशाच्या मुख्य राष्ट्रीय प्रवाहाशी किती प्रमाणात एकरूप होतात, सर्व पक्षांचे व विशेषतः सत्तारूढ पक्षाचे नेते त्याबाबतीत किती कणखर भूमिका स्वीकारतात व मुस्लिम नेतृत्व व्यापक राष्ट्रीय हितसंबंधाचा किती प्रमाणात विचार करते यावरच आपल्या इहवादी धोरणाचे खरे यश अवलंबून आहे. आसाममधील आंदोलनाने भारताच्या इहवादी धोरणाबाबत हा मूलभूत प्रश्न उपस्थित केला आहे.

## आसामचा प्रश्न आणि आंतरराष्ट्रीय राजकारण

आंतरराष्ट्रीय राजकारणाच्या संदर्भातही आसाम-प्रश्नाला महत्त्व प्राप्त झालेले आहे. त्याविषयी थोडा विचार करणे आवश्यक आहे. १९४४ मध्ये जपानच्या फौजा इंफाळपर्यंत आल्या व ईशान्य भारताला धोका निर्माण झाला. १९६२ मध्ये चीनने भारतावर आक्रमण केले व चीनच्या फौजा आसामच्या सरहद्दीपर्यंत आल्या. यापूर्वी भारताच्या इतिहासामध्ये पूर्वेकडून किंवा उत्तरेकडून आक्रमणाचे इतके मोठे संकट कधीही निर्माण झालेले नव्हते. भारताला मुख्यत्वेकरून तोंड द्यावे लागले ते पश्चिमेकडून सागरी मार्गाने झालेल्या किंवा भू-मार्गाने वायव्येकडून झालेल्या आक्रमणाला. या शतकामध्ये मात्र ही परिस्थिती बदललेली आहे. हजारो वर्षे ज्या हिमालयाने भारताचे संरक्षण केले, त्या हिमालयाचे संरक्षण आज भारतीय सैनिकांना करावे लागत आहे. ही बदललेली स्थिती ब्रिटिश काळातदेखील लॉर्ड कर्झन व लॉर्ड मिंटो यांच्या लक्षात आलेली होती आणि त्यांनी यापुढील काळात भारताला वायव्य सीमारेषेपेक्षा ईशान्य सीमारेषेचे रक्षण अधिक महत्त्वाचे मानावे लागेल, असा विचार व्यक्त केला होता.

आज दक्षिण आशियामध्ये चीन आपले वर्चस्व प्रस्थापित करू पाहत आहे. आपली वाढती लोक-

अनुक्रमणिका

संख्या सामावून घेणारा भूप्रदेश दक्षिण आशिया-मध्ये चीनला हवा आहे. त्याबरोबरच व्यापारी हितसंबंधांसाठीसुद्धा दक्षिण आशियामध्ये चीन आपले हातपाय पसरू पाहत आहे. व्यापाराच्या सोयीसाठी बंगालच्या उपसागरावर चीनचे लक्ष आहे. बांगलादेशशी संबंध जोडून आसामची उत्तर आसाम व दक्षिण आसाम अशी विभागणी करावयाची, उत्तर आसामवर चीनचे व दक्षिण आसामवर बांगलादेशचे प्रभुत्व ठेवायचे, अशी एक योजना चीनच्या दप्तरी आहे, असे म्हणतात. स्वातंत्र्यपूर्व काळात देशाची फाळणी होताना मुस्लिम लीगने आसामचा प्रदेश पाकिस्तानमध्ये आणण्याचे आटोकाट प्रयत्न केले. त्याअगोदरच्या काळापासून आसामचा काही भाग पद्धतशीरपणे मुस्लिम बहुसंख्येचा करण्याचा लीगचा प्रयत्न होता. आज ज्या शेख मुजीबूर रहमान यांना भारताचे मित्र म्हणून आपण आदराने ओळखतो, त्यांनी आपल्या 'पूर्व पाकिस्तान : लोकसंख्या व अर्थशास्त्र' या ग्रंथामध्ये पूर्व पाकिस्तानच्या प्रचंड लोकसंख्येला विस्तारासाठी आसामचा भूप्रदेश काबीज करावयास हवा, अशा अर्थाचे मत व्यक्त केले आहे. आसामातील तेल, खनिज-संपत्ती, कोळसा, जंगले यांनीच पूर्व पाकिस्तानचे आर्थिक प्रश्न सुटू शकतील, असा त्यांचा दृष्टिकोन होता. पाकिस्तानचे माजी पंतप्रधान झुल्फिकार भुत्तो यांनीदेखील 'द मिथ ऑफ इंडिपेन्डन्स' या ग्रंथात काश्मीरएवढाच आसामचा प्रश्न महत्त्वाचा असून आसामवर पाकिस्तानचाच हक्क आहे, असे मत व्यक्त केलेले आहे.

आजच्या बांगलादेशच्या नेत्यांचा आसामविषयीचा दृष्टिकोन याहून भिन्न असेल, असे मानण्याचे कारण नाही. बांगलादेशच्या निर्मितीनंतर भारत व बांगलादेश यांचे संबंध काही काळ चांगले होते. परंतु शेख मुजीबूर रहमान यांच्या हत्येनंतर आता ते फारसे चांगले राहिलेले नाहीत. बांगलादेशमध्ये चितगाँग टेकड्यांच्या प्रदेशात मिझो बंडखोरांनी आपले तळ पुनश्च ठोकले असून त्यांना चीनकडून प्रशिक्षण दिले जाते. त्रिपुराच्या बेलोनिआ भागात बांगलादेशने भारताशी सरहद्दीचे भांडण उकरून काढले असून तेथील शेतकऱ्यांवर वारंवार गोळीबार केला आहे. अशा परिस्थितीत बांगलादेश व चीन यांनी संगनमत करून आसाम गिळंकृत करण्याचा प्रयत्न केला, तर आश्चर्य वाटावयास नको.

ईशान्य भारतात सुमारे दोन कोटी तीस लाख लोक राहत असून ते भिन्नवंशीय आहेत. त्यांच्या बोलीभाषा अनेक असून तेथील आदिवासींचे जवळपास १३० प्रमुख समूह आहेत. यांपैकी प्रत्येक समूहाची परंपरा वेगळी असून ते प्रगतीच्या भिन्न उंबरठ्यांवर आहेत. यांतील बहुतेक आदिवासी मंगोल वंशाचे असल्याने त्यांना भाषिक-वांशिक दृष्ट्या चीन, तिबेट व ब्रह्मदेश हे जवळचे देश आहेत व त्यामुळे या प्रदेशांतील आदिवासींचे भारताशी भावनात्मक बंध कच्चे आहेत. हा सर्व प्रदेश भारताला चिंचोळ्या पट्टीने जोडलेला आहे. ब्रह्मपुत्रेवर फक्त एकच पूल असून त्यावरून सर्व वाहतूक चालते. सतत येणारे पूर व मुसळधार पाऊस यांमुळे वाहतुकीची अनेक वेळा कोंडी होते. चिनी आक्रमणापर्यंत ह्या प्रदेशाकडे तसे फारच दुर्लक्ष झाले आणि त्यामुळे तेथील लोक कित्येकदा चिनी आक्रमणाला एक इष्टापत्तीच मानतात. कारण चिनी आक्रमण झाले नसते, तर या प्रदेशाच्या विकासाकडे भारतसरकारचे लक्ष कदाचित अद्यापि गेले नसते.

चीनने यापूर्वी नागा, मिझो व मणीपुरी बंडखोरांना गनिमी युद्धाचे तिबेटमध्ये व चीनमध्ये प्रशिक्षण दिलेले आहे. अलीकडे चीन व भारताचे संबंध काहीसे सुधारल्याने हे प्रशिक्षण आता जरी तिबेट व चीनमध्ये दिले जात नसले, तरी ब्रह्मदेशात व बांगलादेशमधील चितगाँग विभागात अद्यापि चिनी सैनिक अशा तऱ्हेचे प्रशिक्षण बंडखोरांना देतच आहेत. ईशान्य भारतातील या सर्व नाजूक परिस्थितीचा गैरफायदा चीन केव्हाही घेऊ शकेल. एका बाजूला ईशान्येकडील लोकांना वांशिक आवाहन करून व बंडखोरांना शस्त्रे पुरवून तसेच दुसऱ्या बाजूला बांगला देशाला भारताविरुद्ध चिथावणी देऊन ईशान्येकडचा प्रदेश भारताच्या मुख्य भूमीपासून अलग पाडणे चीनला केव्हाही शक्य आहे. हे असे घडेलच असे निश्चितपणे म्हणता येत नसले, तरी १९६२ च्या चिनी आक्रमणापासून बोध घेऊन भारताने या भागातील युद्धाचा संभाव्य धोका लक्षात घेऊन सदैव तयार राहिले पाहिजे. सुदैवाने

१९६२ पेक्षा आज या भागात आपले सैनिक उत्तम दर्जाचे व योग्य शस्त्रास्त्रांनी सुसज्ज आहेत. परंतु आसाममध्ये दीर्घकाल आंदोलन चालू राहिले आणि कोणत्याही प्रकारची तडजोड होऊ शकली नाही, तर या अस्थिर परिस्थितीमुळे फार मोठे संकट निर्माण होण्याची शक्यता नाकारता येणार नाही.

चीन व बांगलादेशप्रमाणे आज सर्व ईशान्य भारतामध्ये अमेरिकेच्या सी. आय. ए. च्या व रशियाच्या के. जी. बी. च्या गूढ हालचालीदेखील चालू आहेत. भारताचे विघटन घडवून आणण्याचा सी. आय. ए. चा डाव असल्याचे आरोप यापूर्वी करण्यात आलेले आहेत. भारतातील अमेरिकेचे माजी राजदूत डॅनिएल पॅट्रिक मोयनिहान यांनी-देखील 'धोकादायक जागा' या आपल्या पुस्तकात भारतात सी. आय. ए. ने पैसा पेरल्याचे म्हटले आहे.

ईशान्य भारतातील अनेक राजकीय नेते, वृत्त-पत्रकार व सरकारी नोकर यांच्यामार्फत सी.आय.ए च्या हालचाली चालू आहेत. अशा हालचालींच्या बाबतीत रशियातील के. जी. बी. देखील मागे नाही. कलकत्त्याहून के. जी. बी.च्या भारतातील हाल-चाली चालतात व एकूण १७५ के. जी. बी. हेर भारतात पसरलेले आहेत. मार्च १९७९ मध्ये यासाठी कलकत्त्याहून दोन सोव्हिएत राजनैतिक अधि-काऱ्यांना कलकत्ता सोडण्यास सांगण्यात आले व त्यांच्याशी संबंधित असलेल्या दोन भारतीय व्यक्तींना अटक करण्यात आली. सी. आय. ए. व के. जी. बी. खेरीज या भागात पानइस्लामिक चळवळीचेदेखील अरबी राष्ट्रांच्या पैशाने गुप्तकार्य सुरू असल्याचे म्हटले जाते. ईशान्य भारतातील आदिवासींमध्ये ख्रिश्चन मिशनरीदेखील या फुटीर प्रवृत्तींना खत-पाणी घालीत आहेत. सर्व ईशान्य भारत आंतर-राष्ट्रीय राजकारणातील सत्तास्पर्धेमध्ये कोणत्या रीतीने युद्धक्षेत्र बनण्याचा संभव आहे, याचे विवे-चन आतापर्यंत केले. आसाम तर ईशान्य भारताच्या हृदयस्थानी आहे आणि म्हणूनच या परिस्थितीचे गंभीर स्वरूप लक्षात घेता आसामच्या प्रश्नाची तड लवकरात लवकर लावण्याची गरज स्पष्ट होते.

## समारोप

आसामच्या समस्येचा गुंता कसा व कधी सुटणार, हा एक यक्षप्रश्न असून त्याचे निश्चित उत्तर देता येणार नाही. परंतु या चळवळीच्या तरुण नेत्यांचा पिंड राष्ट्रवादी असून भारतीय संघराज्याचे ऐक्य टिकावे, अशी त्यांची मनोमन इच्छा आहे ही या संदर्भातील सर्वांत महत्त्वाची व जमेची बाजू आहे. यामुळेच नजीकच्या काळात या प्रश्नाच्या तात्कालिक बाजूंसंबंधी सर्वमान्य तोडगा निघेल, अशी आशा बाळगण्यास हरकत नाही.

त्रिदलीय चर्चेमध्ये एक वेळ अशी आली होती, की परकीय अतिक्रामकांच्या बाबतीत आता निश्चितपणे तडजोड होणार, असे वाटत होते; परंतु दुर्दैवाने तसे झाले नाही. १९८० ते ८२ या काळात आसाम २६ महिनेपर्यंत राष्ट्रपतींच्या राज-वटीखाली राहिला. कोणत्या ना कोणत्या प्रका-रची चळवळ २९३ दिवस चालली. सरकार व आंदोलक यांची बोलणी ११४ दिवस चालली. या सर्वांवरून ही चळवळ भारताच्या इतिहासातील एक अभूतपूर्व जनआंदोलन आहे, हे मान्य करावेच लागेल. सरकार व आंदोलक या दोहोंच्या बाजू वस्तुनिष्ठ रीतीने मांडण्याचा प्रस्तुत लेखामध्ये प्रयत्न केलेला आहे. दोन्ही बाजूंमध्ये बऱ्याच अंशी सत्य आहे. आंदोलकांची बाजू जितकी न्याय्य, तेवढ्याच प्रमाणावर सरकारची जबाबदारीही मोठी व प्रश्नही गुंतागुंतीचा.

आसामी जनतेची कुचंबणा सहज समजू शकते. आपली भाषा व संस्कृती यांचे अस्तित्व टिकव-ण्याचा त्यांचा प्रयत्न योग्यच आहे. तसे पाहिले, तर आजचे आसामचे आंदोलन संयुक्त महाराष्ट्राच्या आंदोलनासारखेच आहे. परंतु देशाची फाळणी, परकीय अतिक्रामकांची मोठी संख्या व आसाम-मधील आसामी भाषिकांचे फार मोठे नसलेले प्रमाण यांमुळे या प्रश्नाचे एकंदर स्वरूप अधिक गुंतागुंतीचे झालेले आहे. परकीय अतिक्रामकांची हकालपट्टी करण्याची त्यांची मागणी राष्ट्रवादी स्वरूपाचीच आहे. कोणत्याही राष्ट्राने दुसऱ्या राष्ट्रातील लोकांचा एवढा मोठा बोजा व त्यामुळे अर्थव्यवस्थेवर पडणारा ताण का व कशासाठी सहन करायचा ? आणि जर त्यामुळे आपल्याच

देशातील एखाद्या समूहाचे सांस्कृतिक अस्तित्वच धोक्यात येणार असेल तर परकीय अतिक्रामकांचा सहानुभूतीने विचार का करावा ? परंतु यापेक्षाही महत्त्वाची गोष्ट म्हणजे हे परकीय अतिक्रामक भारताच्या मुख्य राष्ट्रीय प्रवाहाशी एकरूप न होता फुटीर प्रवृत्तीची जोपासना करणार नाहीत, याची हमी कोणी घ्यावी ? शेकडो वर्षांपासून स्थायिक झालेल्या श्रीलंकेतील भारतीयांचा प्रश्न जर उकरून काढण्यात येतो, तर फाळणीनंतर भारतात आलेल्या अतिक्रामकांचा प्रश्न आता उपस्थित केला म्हणून बिघडले कोठे ? हे व अशा स्वरूपाचे प्रश्न महत्त्वाचे असून त्यांमुळे आसाममधील आंदोलनाला नैतिक अधिष्ठान प्राप्त झाले आहे.

दुसऱ्या बाजूने सरकारतर्फे याबाबत काही महत्त्वाचे प्रश्न उपस्थित करण्यात आले आहेत. नेहरू–लियाकत अली कराराने व इंदिरा–मुजीब कराराने भारतावर पडणारी सर्व जबाबदारी पाळणे हे भारताचे नैतिक कर्तव्य आहेच. परंतु व्यावहारिक दृष्ट्या जरी विचार केला, तरी इतक्या लक्षावधी व्यक्तींच्या नागरिकत्वाची तपासणी व छाननी करण्याचे काम गुंतागुंतीचे असून त्यामुळे जे खरोखरीच भारतीय नागरिक आहेत त्यांनाच त्याचा उपद्रव होण्याची शक्यता आहे. कारण अशिक्षित भारतीयांनादेखील योग्य पुराव्याअभावी आपले नागरिकत्व सिद्ध करणे कठीण जाईल. दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे ज्यांना परकीय अतिक्रामक म्हणून आपण म्हणतो, त्यांपैकी पूर्व पाकिस्तानातून आलेल्या बंगाली हिंदूंचीही फार मोठी संख्या आहे. हिंदूंना भारताखेरीज दुसरी भूमी नसल्याने त्यांचा स्वीकार करण्याची नैतिक जबाबदारी भारतावर आहे. हा दुसरा मुद्दा सरकारतर्फे उघडपणे मांडण्यात आलेला नसला, तरी त्याबाबतीत सरकारला वाटणारी काळजी अप्रत्यक्ष रीतीने व्यक्त करण्यात आलेली आहे. १९७१ ही विभाजनरेषा मानण्याचा सरकारचा आग्रह मुख्यत्वेकरून या कारणासाठीच आहे.

आंदोलनास विरोध करणाऱ्या अन्य टीकाकारांनी या संदर्भात आणखी काही विचार मांडले आहेत. त्यांच्या मते हिंदुस्थानची फाळणी मुस्लिम लीगच्या आग्रहाने व जिनांच्या हटवादीपणामुळे झाली ही वस्तुस्थिती असली, तरी काँग्रेसने व भारतीय नेत्यांनी फाळणीला व फाळणीच्या मुळाशी असलेल्या द्विराष्ट्रवादाच्या सिद्धान्ताला नेहमीच विरोध केलेला आहे. म्हणूनच फाळणी झाली नसती तर जे लोक भारतातच राहिले असते, त्या सर्वांना जबरदस्तीने बाहेर काढणे म्हणजे भारताच्या इतिहासाकडे व राष्ट्रीय चळवळीच्या तत्त्वाकडे पाठ फिरविण्यासारखे आहे. १९५१ नंतर आलेल्या परकीय नागरिकांची आता दुसरी पिढी भारतामध्ये राहत आहे. या सर्वांची परत पाठवणी करणे मानवतावादी व नैतिकदृष्ट्या अयोग्य असून त्याची व्यावहारिक दृष्टीने अमलबजावणी करणेही कठीण जाईल. याशिवाय सर्वांत महत्त्वाची गोष्ट अशी, की भारतामध्ये आता बांगला देशातील निर्वासित राहिलेले नाहीत, अशी भूमिका बांगलादेशाने घेतलेली असून त्यामुळे या सर्व परकीयांना बांगलादेशामध्ये पाठविणे कठीण आहे. सर्व परकीयांना आसामखेरीज इतर राज्यांमध्ये पाठवायचे ठरविले, तर इतर राज्ये त्याला विरोध केल्याखेरीज राहणार नाहीत. फाळणीनंतर अगोदरच इतर राज्यांनी मोठ्या प्रमाणावर निर्वासितांचा स्वीकार केलेला आहे.

वरील बाबतीत आणखी एक मुद्दासुद्धा विचारात घेण्याजोगा आहे. परकीय अतिक्रामकांमुळे आसामची लोकसंख्या बेसुमार वाढली ही गोष्ट जरी खरी असली, तरी अद्यापि आसाममधील लोकसंख्येची घनता दर चौरस किलोमीटर मागे २५४ इतकीच असून बिहार (४०२), हरयाना (२९१), केरळ (६५४), पंजाब (३३१) तामीळनाडू (३७१), उत्तर प्रदेश (३७७) व पश्चिम बंगाल (६१४) या घटकराज्यांच्या तुलनेने ती कमी आहे. पश्चिम बंगाल या नजीकच्या राज्यामध्ये आसामच्या जवळजवळ अडीचपट इतकी लोकसंख्येची घनता आहे हे लक्षात घेतले, की बंगाली भाषिकांची जीवनासाठीची धडपड किती तीव्र असावी, ते दिसून येते. हे लिहिण्यामध्ये अर्थातच आसामी भाषिकांच्या प्रश्नाचे महत्त्व कमी लेखण्याचा हेतू नाही. परंतु पुढील काळात आधुनिकीकरणाबरोबर जीवनविषयक संधी जितकी तीव्र होणार, तितक्या प्रमाणात विविध घटकराज्यांतील व्यक्तींची उदरनिर्वाहासाठी व नोकरीधंद्यासाठी संधी उपलब्ध असेल तेथे जाण्याची प्रवृत्ती

वाढणार. जो प्रश्न आसाममध्ये निर्माण झाला आहे, तो नजीकच्या काळात कमीअधिक प्रमाणावर इतरत्रही निर्माण होणारच. जोपर्यंत देशाचा आर्थिक विकास मोठ्या प्रमाणामध्ये व जलद वेगाने व प्रादेशिक समतोल राखून होत नाही तोपर्यंत आसामसारखे भाषिक व सांस्कृतिक तणाव कायम उपस्थित होणार, यात काही शंका नाही.

आसामप्रश्नावरील त्रिदलीय बोलणी का फसली? पूर्व पाकिस्तानातून आलेल्या बंगाली भाषिकांचे पुनर्वसन आसामबाहेर करण्याबाबत सरकार व आंदोलक यांमध्ये एकमत होत नव्हते. परंतु दीर्घकाळ चाललेल्या वाटाघाटी, सरकारी प्रतिनिधी व विद्यार्थिनेते यांतील पिढ्यांचे अंतर अशी इतरही कारणे सांगता येतील. वाटाघाटीमध्ये पुष्कळदा देवाणघेवाणीपेक्षा अगोदर तयार केलेल्या भाषणांची तबकडी वाजविण्यावरच भर दिला गेला. त्यातही सरकारी प्रतिनिधींपेक्षा विद्यार्थिनेत्यांनी आपला गृहपाठ अधिक चांगल्या रीतीने केलेला असायचा व त्यांना उत्तम कायदेपंडित, विद्वान, निवृत्त प्रशासकीय अधिकारी यांनी तयारी करण्यामध्ये मोलाची मदत केली. रवींद्र वर्मा यांचा पहिला तोडगा जेव्हा आंदोलनाच्या नेत्यांनी मान्य केला, तेव्हा हा प्रश्न सोडविण्याची उत्तम संधी सरकारला मिळाली होती. तसेच त्यानंतर १९६५ हे विभाजनवर्ष म्हणून मान्य करण्याची अनधिकृत सूचना पुढे आली, तेव्हा विद्यार्थिनेत्यांपुढेही उत्तम संधी होती. परंतु अशा संधीचा उपयोग उभय पक्षांनी करून घेतला नाही. त्यामुळे दोन्ही पक्षांची सहनशक्ती संपुष्टात आली व शेवटी सरकारकडून निवडणुकांची घोषणा झाली.

आसामी जनतेची इच्छा नसताना तिच्यावर निवडणुका लादण्याचा सरकारचा निर्णय अविवेकी होता, असेच म्हटले पाहिजे. निवडणुकांमध्ये झालेले भीषण हत्याकांड व उभय पक्षांमध्ये निर्माण झालेली कटुता या सहज टाळता येण्यासारख्या गोष्टी होत्या व त्याची सर्व नैतिक जबाबदारी निःसंशयपणे केंद्रसरकारवरच पडते. निवडणुका घोषित करून आंदोलन करणाऱ्या विविध घटकांमध्ये व नेत्यांमध्ये फूट पाडावी असा सरकारचा या बाबतीतील इरादा असावा. काही अंशी हा हेतू सफल झाला. इंदिरा काँग्रेस व मार्क्सवादी कम्युनिस्ट पक्ष यांबरोबर या निवडणुकांत काँग्रेस (स) ने व प्लेन्स ट्रायबन्स कौन्सिल ऑफ आसाम (PTCA) ने भाग घेतला. यांपैकी 'पीटीसीए'ने गोलपारा, कामरूप, दारंग, लखीमपूर, दिब्रुगड व शिवसागर या जिल्ह्यांच्या उत्तरेकडील आदिवासी भागाचा 'उदयाचल' हा केंद्रशासित प्रदेश निर्माण करावा अशी मागणी केलेली आहे. सुरवातीला 'पीटीसीए'चा प्रतिनिधी 'आगसप' मध्ये होता. परंतु कालांतराने 'पीटीसीए' ने आसाम आंदोलनातून आपले अंग काढून घेतलेले आहे. अर्थात आदिवासी भागातून परकीय अतिक्रामकांची तसेच आदिवासी लोकांखेरीज इतरांची हकालपट्टी करावी, अशी त्यांची मागणी आहेच. 'आगसप'चा एक घटक पूरवांचलीय लोक परिषद (PLP) यामध्ये निवडणुकांपूर्वीच फूट पडली होती व या पक्षाने आपले अध्यक्ष श्री. निवारण बोरा यांनाच पक्षातून पक्षविरोधी कारवायांसाठी काढून टाकले होते.

वरील सर्व घटनांच्या संदर्भात, तसेच निवडणुकांपूर्वी 'आसू' व 'आगसप' ने जाहीर केलेल्या बंदच्या कार्यक्रमांना आंदोलनाच्या सुरवातीप्रमाणे १०० टक्के प्रतिसाद न मिळालेला पाहून कोणत्याही परिस्थितीमध्ये निवडणुकांचा कार्यक्रम पार पाडण्याचा निर्धार इंदिरा काँग्रेस पक्षाने व सरकारने केलेला असावा. परंतु आंदोलनाची तीव्रता कमी झालेली नाही हे निवडणुकांवर जनतेने टाकलेल्या बहिष्काराने स्पष्ट होते. अशा परिस्थितीत केंद्रसरकार आता कोणता मार्ग स्वीकारणार, हे कळत नाही. परंतु आसामचे आणखी विघटन करण्याच्या विचारात केंद्रसरकार असल्याचे बोलले जात आहे. सर्व कार्बी अँगलाँग व दारंग, उत्तर लखीमपूर आणि काचर यांचा काही भाग मिळून एक आदिवासी केंद्रशासित प्रदेश; काचर, उत्तर काचरचा काही भाग मिळून बंगाली भाषिकांचा केंद्रशासित प्रदेश; गोलपारा जिल्ह्याचा पश्चिम भाग व पश्चिम बंगालमधील कूचबिहार जिल्ह्याचा काही भाग यांचे मिळून राजबंगशी लोकांचे 'कामता राज्य' असे तीन भाग आसामपासून विघटित करून 'आसाम राज्य' ब्रह्मपुत्रेच्या खोऱ्यापुरतेच मर्यादित करावयाचे अशी ही योजना आहे. तसे झाले तर आसामी भाषिकांची

बहुसंख्या असलेले आसाम हे सांस्कृतिक दृष्टीने अधिक एकजिनसी राज्य निर्माण होईल व सध्याची आसामी भाषिकांची बंगाली वर्चस्वाची भीती उरणार नाही, असे केंद्रीय नेत्यांना वाटत असावे.

परंतु अशा रीतीने आसामचे आणखी विघटन केले तरी परकीय अतिक्रामकांचा प्रश्न राहतोच. १९७१ नंतरचे परकीय नागरिक निश्चित करण्यासाठी तीन न्यायमूर्तींचे एक याप्रमाणे २० न्यायाधिकरणांची नियुक्ती केल्याची घोषणा सायकिया मंत्रिमंडळाने केली आहे. असेच १५ ऑक्टोबर ८३ रोजी एक वटहुकूम काढून राष्ट्रपतींनी २५ मार्च १९७१ या दिवशी किंवा त्यानंतर योग्य पासपोर्ट किंवा इतर प्रवासाचे दस्तऐवज किंवा कोणताही कायदेशीर परवाना यांच्याशिवाय भारतात प्रवेश केलेला इसम हा परदेशी नागरिक ठरतो, असे जाहीर केले आहे. हा वटहुकूम सर्व देशाला लागू असून आसामबाबत तो लगेच लागू झाला आहे. या वटहुकूमाचा अर्थ जवळजवळ असा दिसतो, की २५ मार्च १९७१ ही विभाजनरेषा मानून केंद्रसरकारने त्याची एकतर्फी अमलबजावणी करण्याचे ठरविलेले दिसते. हा निर्णय अर्थातच आसामी आंदोलकांना मान्य होणार नाही; परंतु शेवटी राजकारण ही एक कला आहे व तिच्यामध्ये जे व्यवहार्य असेल त्याचाच विचार करावा लागतो. राजकारणातील निर्णय फक्त अमूर्त तत्त्वांवर निश्चित करता येत नाहीत, असे सुप्रसिद्ध राजकारणपटू व राजकीय विचारवंत एडमंड बर्क म्हणतो. त्याचे प्रत्यंतर आसाम-प्रश्नाच्या बाबतीत येत आहे- सर्व परकीय नागरिकांची हकालपट्टी करावी हे तत्त्व म्हणून बरोबर; परंतु व्यवहार्य काय, याचा विचार करून ही विभाजनरेषा १९६५-६६ पर्यंत आणण्याचा आसामातील आंदोलकांनी वाटाघाटींमार्फत अद्यापि प्रयत्न करावा. किंबहुना राष्ट्रपतींनी नुकताच काढलेला वटहुकूम म्हणजे आंदोलकांवर या बाबतीत दडपण आणण्यासाठीचाच एक प्रयत्न आहे. परंतु जितक्या लवकर आसामच्या प्रश्नातील हा गुंता सुटेल, तितके ते आसामी जनतेच्या दृष्टीने व भारतीय जनतेच्या दृष्टीने श्रेयस्कर ठरेल. आंदोलकांनी या बाबतीत रवींद्र वर्मा यांच्यासारख्या एखाद्या जबाबदार खासदारामार्फत प्रयत्न केले तर सरकारनेही वाटाघाटींची द्वारे बंद न करणे केंद्र सरकारच्या दृष्टीनेही हितावह ठरेल व निवडणुकांनी निर्माण झालेली कटुता काही प्रमाणात तरी कमी होऊन आसाममध्ये विकासकार्यासाठी आवश्यक असलेली स्थिरता प्रस्थापित होईल, अशी आशा व्यक्त करावयास काहीच हरकत नाही.

**प्रमुख संदर्भग्रंथ व लेख:**

1. V. I. K. Sarin – India's North–East in flames, Vikas Publishing House Pvt. Ltd., New Delhi, 1980.

2. Mahesh Joshi – Assam : The Indian Conflict, Prachi Prakashan, New Delhi, 1981,

3. T. S. Murty – Assam : The difficult years, Himalayan Books, New Delhi, 1983.

4. S. K. Mazumdar – A 'Class 'war in Assam – Link, June 26, 1983.

5. India Today, Vol. VIII, Number 5, March 1–15, 1983.

6. Kamath M. V. : 'Land of Seven Sisters', Illustrated Weekly of India (June 1–7th, 1980), pp. 6–15.

7. Economic and Political Weekly : 'Assam : Varieties in alienation' (7th June 1980), pp 977–1002,











# मंडल आयोगाचा अहवाल

मे. पुं. रेगे

राज्यघटनेच्या कलम ३४० ला' अनुसरून राष्ट्रपतींनी १ जानेवारी १९७९ रोजी मागास वर्ग आयोगाची नेमणूक केली. श्री. बी. पी. मंडल, भूतपूर्व संसद-सदस्य ह्यांना आयोगाचे अध्यक्ष म्हणून नेमण्यात आले. आयोगाची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे निश्चित करण्यात आली होती.

१) सामाजिक आणि शैक्षणिक दृष्टघा कोणते वर्ग मागासलेले आहेत हे ठरविणारे निकष निश्चित करणे; २) अशा रीतीने सामाजिक व शैक्षणिक दृष्टघा मागास म्हणून ठरविण्यात आलेल्या नागरिकांच्या वर्गांच्या उन्नतीसाठी जे उपाय योजिले पाहिजेत, त्यांची शिफारस करणे; ३) संघराज्य किंवा कोणतेही राज्य यांच्या कारभाराच्या संबंधात ज्या सार्वजनिक सेवा किंवा पदे (पोस्ट्स) आहेत त्यांच्यांत ज्या मागासवर्गीय नागरिकांना पुरेसे प्रतिनिधित्व नसेल त्यांच्यासाठी नेमणुका किंवा पदे राखून ठेवण्याची तजवीज करणे कितपत इष्ट किंवा अनिष्ट ठरेल, हे तपासून पाहणे; आणि ४) आपल्याला आढळून आलेली वस्तुस्थिती मांडणारा आणि योग्य वाटतील त्या शिफारसी करणारा अहवाल राष्ट्राध्यक्षांना सादर करणे.

या संबंधात, पूर्वी नेमण्यात आलेल्या मागासवर्ग आयोगाच्या शिफारशींचे, तसेच त्या शिफारशींचा सरकारकडून अंगीकार होण्याच्या आड जे मुद्दे उभे राहिले त्यांचेही परीक्षण आयोगाने पाहिजे तर करावे.

मंडल आयोगाने आपला अहवाल डिसेंबर १९८० मध्ये राष्ट्रपतींना सादर केला. त्या वेळी राष्ट्रपतींना लिहिलेल्या पत्रात जनता सरकार सत्तेवर असताना पंतप्रधान श्री. मोरारजीभाई देसाई यांनी आयोगाची नेमणूक केली होती असा उल्लेख करून श्री. मंडल यांनी पुढे असे म्हटले आहे, की "येथे ही गोष्ट नमूद करण्यासारखी आहे, की जरी ह्या आयोगाची नेमणूक पूर्वीच्या जनता सरकारने केली होती तरी श्रीमती इंदिरा गांधी यांच्या सरकारने आयोगाला दोनदा मुदतवाढ करून दिली; एवढेच नव्हे, आयोगाच्या कामास सर्व प्रकारे पाठिंबा दिला व सहकार्य केले. यावरून जे दडपलेले, मागासलेले आणि गांजलेले ( सप्रेस्ड, डिप्रेस्ड, ऑप्रेस्ड ) आहेत, त्यांची उन्नती घडवून आणण्याच्या कार्यावरील त्यांची निष्ठा व त्यांच्याशी असलेली त्यांची बांधीलकी स्पष्टपणे व्यक्त होते." पण हा आयोग नेमण्यात श्री. मोरारजीभाई यांची अशीच निष्ठा व बांधीलकी व्यक्त होते असे श्री. मंडल यांनी कुठेच म्हटलेले नाही. मागास वर्गीयांसाठी आयोग नेमणे हा बांधीलकीचा पुरेसा पुरावा होऊ शकत नाही, तो बंद न पाडणे हा पुरेसा पुरावा असतो, असे कदाचित त्यांचे मत असावे.

मंडल आयोगाच्या शिफारशींचे तटस्थपणे परीक्षण होणे राष्ट्रीय एकात्मतेच्या आणि राष्ट्रीय जीवनातील सामंजस्याच्या दृष्टीने अत्यंत आवश्यक आहे. पण ही अशक्यप्राय गोष्ट आहे. न्यायाचे पालन झाल्याने केवळ भागत नाही; न्यायाचे पालन झाले आहे हे दिसलेही पाहिजे, असे एक वचन आहे. ह्याच न्यायाने आजच्या एकंदर सामाजिक परिस्थितीत मंडल आयोगाच्या शिफारशींचे तटस्थपणे परीक्षण होणे पुरेसे नाही; तटस्थपणे परीक्षण होऊन आवश्यक ती कार्यवाही होत असल्याचे दिसूनही आले पाहिजे. म्हणजे असे होत आहे हे सर्व संबंधितांना पटले पाहिजे, असे म्हणता येईल. आज हे पटणे अतिशय कठीण आहे. आयोगाच्या शिफारशींचे सार असे, की अनुसूचित जाती आणि जमाती यांच्यासाठी, त्यांच्या लोकसंख्येच्या टक्केवारीला अनुसरून, सरकारी नोकऱ्या आणि शिक्षणसंस्थांमधील जागा यांच्यामध्ये २२·५ टक्के आरक्षण ( रिझर्व्हेशन ) करण्यात आले आहे त्या व्यतिरिक्त इतर मागासवर्गीयांसाठी २७ टक्के आरक्षण करण्यात यावे. म्हणजे एकंदर ४९·५ टक्के

अनुक्रमणिका

जागा आरक्षित राहतील व ५०·५ टक्के जागा सर्वांसाठी खुल्या राहतील. भारतीय समाजाचे दूरगामी हित, सरकारी कारभाराची कार्यक्षमता यांना ह्या शिफारशींची अमलबजावणी बाधक ठरेल ह्या मुद्द्यांच्या आधारे ह्या शिफारशींना जे विरोध करतील, त्यांच्यावर व्यापक सामाजिक हिताची ढाल पुढे करून ते आपल्या जातीय किंवा वर्गीय हिताचे संरक्षण करू पाहत आहेत आणि प्रचलित अन्यायाचे समर्थन करीत आहेत असा आरोप करण्यात येईल. उलट, ह्या शिफारशींचे जे समर्थन करतील त्यांच्यावर त्यांना व्यापक राष्ट्रहिताची चाड नाही, ते उतावीळ, रागाने आंधळे झालेले आहेत, आपल्या बेजबाबदार आणि अव्यवहार्य शिफारशींनी सामाजिक तणाव वाढवून ते केवळ सवंग लोकप्रियता, पुढारीपण मिळवू पाहत आहेत अशा प्रकारचे आरोप करण्यात येतील. तेव्हा या शिफारशींच्या बाबतीत स्पष्टपणे आणि तपशीलवार बोलणे धोक्याचे आहे हे सर्व चाणाक्ष मंडळीला माहीत आहे. मागास वर्गीयांच्या कल्याणाविषयीच्या ज्यांच्या विशेष आस्थेचा निर्वाळा श्री. मंडल यांनी दिला आहे, त्या श्रीमती इंदिरा गांधी यांच्या सरकाराने अहवाल सादर झाल्यानंतर जवळजवळ तीन वर्षे होऊन गेली तरी त्याच्या संबंधात कोणतेही अधिकृत निवेदन केलेले नाही ह्याचे कारणही हेच असणार, असा तर्क करता येतो. हा धोका पत्करूनही अहवालाची शक्य तितक्या मोकळेपणे चर्चा होणे आवश्यक आहे.

पहिला मागास वर्ग आयोग कै. काकासाहेब कालेलकर यांच्या अध्यक्षतेखाली जानेवारी १९५३ मध्ये नेमण्यात आला होता आणि त्याने आपला अहवाल १९५५ मध्ये सादर केला होता. भारतीय जनतेचे कोणते विभाग सामाजिक आणि शैक्षणिक दृष्ट्या मागासलेले आहेत हे ठरविण्यासाठी ह्या अहवालात पुढील निकष मुक्रर करण्यात आले होते : १) पारंपरिक हिंदू जातिव्यवस्थेत खालचे स्थान; २) जातीच्या किंवा जमातीच्या मोठ्या भागात सर्वसामान्य शैक्षणिक प्रगतीचा अभाव; ३) सरकारी नोकऱ्यांमधील अपुरे किंवा शून्य प्रतिनिधित्व; आणि ४) व्यापार आणि उद्योग या क्षेत्रांत अपुरे प्रतिनिधित्व. ह्या निकषांना अनुसरून अहवालात २३९९ मागासलेल्या जाति-जमातींची यादी देण्यात आली होती आणि त्यांतील ८३७ जाति-जमातींचे 'अत्यंत मागासलेल्या' असे वर्गीकरण केले होते. आयोगाने भारतातील सर्व स्त्रिया एक वर्ग म्हणून मागासलेल्या आहेत असा निर्णय केला होता, हे उल्लेखनीय आहे. मागासवर्गीयांच्या प्रगतीसाठी आयोगाने जमीनधारणा, ग्रामीण अर्थव्यवस्थेची पुनर्रचना, कुटिर–उद्योग, प्रौढ साक्षरता इ. विविध क्षेत्रांत कोणत्या सुधारणा करता येतील याविषयी तपशीलवार सूचना केल्या होत्या. त्यांच्यांत, सर्व तांत्रिक आणि व्यावसायिक शिक्षणसंस्थांमध्ये पात्र (क्वॉलिफाइड) मागासवर्गीय विद्यार्थ्यांसाठी ७० टक्के जागा राखून ठेवाव्या आणि सरकारी आणि निमसरकारी नोकऱ्यांत, पहिल्या दर्जाच्या नोकऱ्यांत २५ टक्के, दुसऱ्या दर्जाच्या नोकऱ्यांत ३३⅓ टक्के आणि तिसऱ्या व चौथ्या दर्जाच्या नोकऱ्यांत ४० टक्के अशा जागा राखून ठेवाव्या ह्या शिफारशींचाही अंतर्भाव होता.

कालेलकर आयोगाच्या अहवालाविषयी दोन गोष्टी ध्यानात घेण्याजोग्या आहेत. एक तर त्याचे निष्कर्ष आणि शिफारशी यांच्याविषयी आयोगाच्या सदस्यांत एकमत नव्हते. तीन सदस्यांचा मागासलेपणा आणि जात यांच्यामध्ये संबंध जोडायला विरोध होता. म्हणजे एखादी जात हिंदू जातिव्यवस्थेमध्ये खालची मानण्यात येते ह्या केवळ कारणावरून तिच्यातील बहुसंख्य लोक मागासलेले आहेत असे मानणे त्यांना मान्य नव्हते. जातीच्या आधारे नोकऱ्यांत राखीव जागा ठेवायलाही त्यांचा विरोध होता. त्यांनी आपले भिन्न विसंवादी मत अहवालाला जोडले होते. दुसरी गोष्ट अशी, की जरी अहवालात खालची जात हा मागासलेपणाचा निकष म्हणून स्वीकारलेला होता तरी आयोगाचे अध्यक्ष काका कालेलकर यांचेच, ह्या बाबतीत, आयोगाचे काम संपत येण्याच्या घडीला, मतपरिवर्तन घडून आले होते. त्यांनी जरी आपले विसंवादी मत अहवालाला जोडले नाही, तरी अहवाल सादर करताना त्यांनी जे ३० पृष्ठांचे पत्र राष्ट्रपतींना पाठविले, त्याच्यात आपले बदललेले मत त्यांनी मांडले आहे. त्यात ते म्हणतात,








अनुक्रमणिका

"हिंदूमधील उच्च जातींनी 'खालच्या' जातीची हेळसांड करण्याचा जो अपराध केला आहे, त्याचे प्रायश्चित्त त्यांनी घेतले पाहिजे अशी माझी खात्री असल्यामुळे फक्त मागासलेल्या वर्गांना (जातींना) काय ती सर्व खास मदत करावी आणि उच्च वर्गातील (जातींतील) गरीब व पात्र व्यक्तींना ह्या खास मदतीच्या लाभापासून वगळण्यात अनमान करू नये अशी सरकारला शिफारस करायला मी तयार होतो. पण जातीच्या अधिष्ठानावर आधारलेल्या इलाजांचा राष्ट्राच्या मुस्लिम आणि ख्रिस्ती विभागांवर जो अतिशय विकृत (अन्‌हेल्दी) परिणाम होणार आहे तो ध्यानात आल्यावर माझे डोळे उघडले आणि ह्या इलाजांतील धोके मला दिसले."

"...... ज्या अनिष्ट गोष्टींशी आम्ही मुकाबला करू पाहत होतो त्यांच्यापेक्षा आम्ही सुचविलेले इलाज अधिक हानिकारक आहेत ह्या निर्णयाला मी येऊन ठेपलो."

"सरकारी नोकऱ्यांत कोणत्याही जमातीसाठी जागा राखून ठेवण्याच्या मी निश्चितपणे विरोधी आहे आणि ह्याचे साधे कारण असे आहे, की नोकऱ्या ह्या नोकरांसाठी असत नाहीत तर सबंध समाजाची सेवा करण्यासाठी त्या असतात ..."

"पहिल्या आणि दुसऱ्या दर्जाच्या नोकऱ्यांच्या संबंधात मी असे मानतो, की जर मागासवर्गीयांनी जागांमध्ये आरक्षित टक्केवारीची मागणी केली नाही आणि निवड करताना मागासवर्गीयांना झुकते माप देण्याच्या बाबतीत ते सरकारच्या न्यायबुद्धीवर (फेअर-माइण्डेडनेस) विसंबून राहिले तर त्यांचा नैतिक व भौतिक असा दुहेरी लाभ होईल."

काट्याने काटा काढावा त्याप्रमाणे जातिसंस्थेच्या अनिष्ट परिणामांचे निराकरण करण्यासाठी केवळ जातीच्या आधारावर योजलेले उपाय कामी पडतील अशी आपली धारणा होती, असे कालेलकरांनी नमूद केले आहे. पण पुढे त्यांचे मत बदलले.

कालेलकरअहवाल आणि त्यावरील आपले टिपण (मेमोरॅन्डम) सरकारने सप्टेंबर १९५६ मध्ये संसदेच्या प्रत्येक गृहापुढे ठेवले. सरकारचे म्हणणे थोडक्यात असे होते : अहवालाप्रमाणे पाहता काही थोडके अपवाद वगळले तर सबंध भारतीय समाज मागासलेला ठरतो. तेव्हा ह्या प्रचंड संख्येमध्ये ज्यांना विशेष साहाय्याची खरोखर गरज आहे ते हरवून जातील आणि त्यांच्याकडे पुरेसे ध्यान देता येणार नाही. दुसरी गोष्ट अशी : समताधिष्ठित समाजाच्या दिशेने प्रगती करण्यात जातिव्यवस्थेकडून होणारा अडसर हा सर्वांत मोठा आहे हे निर्विवाद आहे. पण काही विशिष्ट जातींना मागासलेल्या जाती म्हणून जर ओळखण्यात येऊ लागले, तर त्याचे परिणाम आज जातीच्या पायावर जे भेद आहेत ते तसेच राखण्यात आणि भविष्यातही चालू राहण्यात होईल. योजना आयोगाने मागासलेपणाचे निर्मूलन करण्यासाठी काही कार्यक्रमांची आखणी केली आहे हे नमूद करून सरकारी टिपण असे म्हणते, की "ज्या मुख्य मुद्द्यावर जोर दिला पाहिजे तो असा, की आज अस्तित्वात असलेल्या कार्यक्रमांच्या चौकटीत जे अग्रक्रम स्वीकारण्यात आले आहेत त्यांत काही प्रमाणात बदल केल्याने किंवा त्यांची पुनर्रचना केल्याने मागासवर्गीयांच्या विशेष गरजांचे अधिक प्रमाणात आणि अधिक परिणामकारकतेने समाधान करता येईल की त्यासाठी आणखी काही कार्यक्रमांची तजवीज करणे आवश्यक आहे (ह्याचा विचार झाला पाहिजे)."

आपले टिपण सादर केल्यानंतर सरकारने समाजाच्या विभागांची ज्याच्या आधारे मागासवर्गीयांत गणना करता येईल असा, जातीहून अन्य असा, व्यावहारिक निकष शोधून काढण्याचे प्रयत्न केले. जातीऐवजी सुतार, लोहार यांसारख्या व्यावसायिक जमातींशी सामाजिक मागासलेपणा जोडता येईल का, हे पाहण्याच्या दिशेने हे प्रयत्न करण्यात आले होते. पण त्यातून काही निष्पन्न झाले नाही. असे निकष हाती लागले नाहीत. अखेरीस केंद्र सरकारने असे ठरविले, की मागासवर्गीयांची अखिल भारतीय यादी करू नये आणि अनुसूचित जातिजमातींशिवाय इतर कोणाही मागासवर्गीयांना केंद्र सरकारच्या नोकऱ्यांत आरक्षण देऊ नये. ऑगस्ट १९६१ मध्ये केंद्रीय मंत्रालयाने राज्य सरकारांना पाठविलेल्या निवेदनात दोन महत्त्वाच्या घोषणा केल्या. एक अशी, की राज्यसरकारांना मागासपणाची व्याख्या करणारे स्वत:चे निकष निवडण्याची मुखत्यारी असली तरी

अनुक्रमणिका

भारतसरकारचे मत असे आहे, की ह्या बाबतीत जातीचा आधार न घेता आर्थिक कसोट्या स्वीकारणे इष्ट ठरेल. दुसरी घोषणा अशी होती, की जरी समजा केंद्र सरकारने कित्येक सामाजिक गटांचा 'इतर मागासवर्गीयांत' अंतर्भाव केला तरी प्रत्येक राज्यसरकारला राज्यघटनेच्या कलम १५ आणि १६[२] यांतील तजविजींच्या संदर्भात मागासवर्गीयांच्या याद्या बनविण्याचे स्वातंत्र्य असेल. तेव्हा भारतसरकारने मागासवर्गांची स्वतःची यादी बनविण्याला फारसा व्यावहारिक अर्थ उरत नाही.

ह्या घोषणेचा अर्थ केंद्रसरकारने ह्या संबंधातील स्वतःची जबाबदारी झटकून ती राज्यसरकारांवर टाकली, असा लावता येईल. परंतु असे करणे अनुदारपणाचे ठरेल. केंद्रसरकारच्या भूमिकेमागील विचार सहानुभूतीने मांडायचा तर असा मांडता येईल : समाजाचे कित्येक विभाग मागासलेले आहेत असे ठरविण्यामागील हेतू हा, की त्यांचा मागासलेपणा कमी करण्यासाठी काही खास प्रयत्न करावा. आता देशातील बहुसंख्य लोक गरीब आहेत, अशिक्षित, पारंपरिक समजुतींनी ग्रासलेले आहेत. नागरिकांचे सरासरी वार्षिक उत्पन्न इतके कमी आहे, की अमेरिकन लोकांना ही माणसे जगतात तरी कशी, असा प्रश्न पडतो. तेव्हा मूठभर माणसे सोडली तर बाकी सर्वच मागासलेली आहेत आणि त्या सर्वांची मागासलेल्या वर्गात गणना केली तर आपली मर्यादित साधनसामग्री ध्यानी घेता कोणासाठीच विशेष काही करता येणार नाही. तेव्हा ठिकठिकाणी अगदीच तळागाळाच्या थरात जे गट असतील त्यांच्यासाठी विशेष प्रयत्न करणे योग्य ठरेल आणि ह्या मुख्यतः स्थानिक जातिजमाती असल्यामुळे त्यांची निवड करण्याचे काम केंद्रसरकारपेक्षा राज्यसरकारे अधिक सोयीने करू शकतील. समाजाच्या इतर अनेक विभागांच्या अडचणीही खऱ्याच आहेत, अगदी वरचे थर घेतले तर त्यांच्या तुलनेने तेही मागासलेले आहेत; पण सबंध देशाची आर्थिक आणि शैक्षणिक प्रगती जसजशी होत जाईल, तसतशी तिची फळे ह्या वर्गांनाही मिळतील आणि त्यांच्या अडचणी दूर होतील. त्याला पुढे आणण्याचा अधिक जलद असा व्यावहारिक मार्ग आज उपलब्ध नाही, हे सर्वांनी ओळखण्यात आज समंजसपणा आहे. त्यांनाही विशेष साहाय्य करण्याचा आग्रह आज धरला तर कोणालाच विशेष साहाय्य करता येणार नाही; विशेषतः ह्या साहाय्याची गरज निकराने आहे त्यांच्यासाठी काहीच करता येणार नाही. तेव्हा ठोकळेबाजपणे काही निकष लावून– मग हे निकष एऱ्हवी कितीही रास्त असले तरी– मागासवर्गीयांची यादी फुगविणे हानिकारक ठरेल.

दुसरी गोष्ट अशी, की भारतीय राज्यघटनेला जो समाज अभिप्रेत आहे, साध्य म्हणून अभिप्रेत आहे, तो सर्व भारतीय समान नागरिक आहेत, त्यांना समान नागरी हक्क आहेत या तत्त्वावर आधारलेला आहे. असा समाज जेव्हा निर्माण होईल तेव्हा त्याच्या घटकव्यक्तींमध्ये, समान हक्क, समान कायदे आणि समान संधी यांच्याशी सुसंगत असे हरतऱ्हेचे भेद आढळतील; पण जातीवर आधारलेले भेद आढळणार नाहीत. निदान शासनाच्या अखत्यारीत येणाऱ्या सामाजिक व्यवहारांत जातीवर आधारलेल्या वहिवाटी उरणार नाहीत. पण जात ही जशी सामाजिक व्यवहारात असते, तशी ती लोकांच्या मनात असते. एका जातीचे लोक एकमेकांना आपल्या जातीचे म्हणून ओळखतात, इतरांपासून वेगळे मानतात (इतरही त्यांना एका जातीचे व इतरांपासून अलग म्हणून ओळखतात), त्या त्या जातीचे म्हणून काही रूढी, प्रथा पाळणे स्वतःवर बंधनकारक आहेत असे मानतात, जातीतील कुणा व्यक्तीने त्या मोडल्या तर तिला सामाजिक शासन करतात, इत्यादी. ह्या शासनाची जातीतील व्यक्तींना खोल भीती असते आणि जातीत असण्याची, जातीकडून स्वीकारले जाण्याची खोल मानसिक गरज असते. एका जातीचे म्हणून जगण्यात ह्या जातीहून भिन्न अशा इतर जाती आहेत, हेही अनिवार्यपणे अभिप्रेत असते. तेव्हा जात हे जसे संघटनेचे, व्यक्तींना एकत्र आणण्याचे तत्त्व आहे तसेच ते विभाजनाचे, जातींना एकमेकांपासून वेगळे करणारे तत्त्व आहे. ज्या प्रमाणात जाती आहेत, त्या प्रमाणात समान व्यक्तींचा एकमेकांशी स्वायत्तपणे संबंध जोडणाऱ्या व्यक्तींचा बनलेला समाज अस्तित्वात येणार नाही. जातींचे विसर्जन करणे हे भारतीय राज्यघटनेचे (एक) साध्य आहे; सर्व जातींना समान पातळीवर आणणे हे नव्हे.

जातींचे विसर्जन करायचे तर समाजाच्या बाह्य व्यवहारातून जशी जात गेली पाहिजे, सामाजिक व्यवहाराचे नियमन करणाऱ्या कायद्यांचा, शासकीय नियमांचा, संकेतांचा जातींशी जसा कोणत्याही प्रकारे संबंध असता कामा नये त्याप्रमाणे जातीशी संबंधित असलेली मानसिकताही क्षीण करीत नेली पाहिजे. ही माणसे अमुक एका जातीची म्हणून त्यांना जर काही सवलती मिळाल्या, तर त्या जातीची माणसे हा छाप त्यांच्यावर अधिक ठामपणे बसेल; त्यांच्या स्वतःच्या दृष्टीतून आणि इतरांच्याही दृष्टीतून. समजा, क्ष ही जात मागासलेली ठरविली आणि तिच्यासाठी य टक्के जागा नोकऱ्यांमध्ये राखून ठेवल्या. मग आपण क्ष जातीचे आहोत, आपल्या जातीला ही सवलत मिळाली आहे, आपल्यातीलच व्यक्तींना ह्या सर्व जागा मिळतात की नाही ह्याविषयी आपण जागरूक असले पाहिजे अशी वृत्ती क्ष जातीमध्ये निर्माण होईल. कोण खरोखर क्ष जातीचा आहे आणि कोण नाही हे अधिक काटेकोरपणे ठरविण्यात येईल. म्हणजे जातीला अलग करणारी रेषा अधिक नेमकी होईल. ह्या सर्व प्रश्नांच्या बाबतीत नेतृत्व करणारे क्ष जातीचे पुढारी पुढे येतील आणि क्ष जातीचे लोक त्यांचे अनुयायी बनतील. क्ष जातीसाठी अधिक टक्केवारीची मागणी करून ती पदरात पाडून घेणारा पुढारी सर्वांत अधिक लोकप्रिय होईल. एवढ्याने भागत नाही. ‘क्ष जातीचा माणूस’ एवढे केवळ लेबल क्ष जातीच्या सर्व माणसांना एकत्र ठेवायला पुरेसे नसते. काही समान आचार, प्रथा, संकेत, समारंभ यांच्यांत ते व्यक्त व्हावे लागते. आता क्ष जातीच्या सर्व माणसांना एकत्र आणणारे हे जे सामाजिक व्यवहार असतील ते त्या जातीच्या परंपरागत रूढीवर आधारलेले असतील. तेव्हा नोकऱ्यांनील सवलतींसारख्या आधुनिक कारणासाठी म्हणून जरी क्ष जात एकत्र आली तरी त्याचा अप्रत्यक्ष परिणाम तिच्या जातीय परंपरेचे पुनरुज्जीवन होण्यात होणार. उदा., इराणसारख्या बहुसंख्येने मुसलमान असलेल्या समाजाला पाश्चात्त्य देशांकडून आपल्यावर अन्याय होतो ह्याची तीव्र जाणीव जेव्हा झाली आणि ह्या अन्यायाचा प्रतिकार करायला जेव्हा तो उद्युक्त झाला, तेव्हा आपण म्हणजे मुसलमान, ते म्हणजे वेगळे, त्यांच्यांत आणि आपल्यात शत्रुत्व आहे या दृष्टीने तो स्वतःकडे पाहू लागला. ह्या संघर्षाचा भाग म्हणून स्वतःचे मुसलमानीपण अधिक अस्सल केले पाहिजे ह्या कल्पनेने तो भारून गेला आणि त्याचा परिणाम जुनाट मुसलमानी परंपरेचे पुनरुज्जीवन होण्यात झाला. तेव्हा जातीची अस्मिता कोणत्याही कारणाने आपण अधिक ठाम केली किंवा ज्यामुळे ती अधिक ठाम होईल असे काहीही केले, तर त्यातून पुनरुज्जीवनवाद उफाळून येण्याचा धोका असतो.

अस्पृश्यांची गोष्ट वेगळी आहे. अस्पृश्य जातींना गावापासून बहिष्कृतच करण्यात आले होते आणि विटाळाच्या कल्पनांनी गाव आणि अस्पृश्य यांच्यामधील दरी अनुल्लंघ्य करून ठेवली होती. त्यांना एकात्म आणि सर्वसमावेशक अशा समाजात सामावून घेण्यासाठी काही खास उपायांची आवश्यकता होती. त्यांच्यामधील व्यक्ती समाजात अधिकाराची, मानाची स्थाने प्राप्त करून घेऊ शकतील यासाठी अनुकूल परिस्थिती योजनापूर्वक निर्माण करणे जरूरीचे होते. शिक्षणसंस्था व सरकारी नोकऱ्या यांत त्यांच्यासाठी काही जागा राखून ठेवणे हा ह्या योजनेचा भाग होता. भटक्या आणि ‘विमुक्त’ (पूर्वी गुन्हेगार मानलेल्या) जातिजमातींची गोष्टही बरीचशी अस्पृश्यांसारखी आहे. त्यांनाही वसलेल्या समाजात स्थान नव्हते. ह्या जातिजमातींचे, तसेच अस्पृश्यांचे समाजात पुनर्वसन– खरे पाहता पहिले वसन –करणे आवश्यक होते. इतर समाजाची त्यांचे असे पुनर्वसन करण्यासाठी जी किंमत देणे आवश्यक असेल ती द्यायची तयारी आहे असे आश्वासनही त्यांना देणे आवश्यक होते आणि राखीव जागांच्या स्वरूपाने हे आश्वासन त्यांना देण्यात आले.

समाजात जे इतर मागासलेले वर्ग आहेत, त्यांची स्थिती अशी नाही. ते कितीही मागासलेले असले तरी त्यांना समाजात स्थान होते. आज त्यांच्या मागासलेपणाचे प्रमुख कारण त्यांची गरिबी हे आहे. आज एखादी कुंभार जातीची व्यक्ती आपण घेतली. तू कुंभार आहेस म्हणजे शूद्र आहेस, तुला शिक्षणाचा अधिकार नाही, म्हणून तुला शाळेत प्रवेश मिळणार नाही असे आज कुणी म्हणत नाही आणि व्यवहारात आज असे कुणी वागत नाही (पण तू महार आहेस म्हणून तुला ह्या विहिरीवर पाणी

भरता येणार नाही, असे माणसे म्हणतात आणि पाणी भरू देत नाहीत.). किंवा एखाद्या कुंभाराला उपहारगृह काढण्यासाठी किंवा किराणा मालाचे दुकान थाटण्यासाठी बँकेकडून कर्ज पाहिजे. असेल तर तू कुंभार आहेस, तू मडकी बनविली पाहिजेस, तुला उपहारगृह काढण्याचा अधिकार नाही, म्हणून तुला कर्ज मिळणार नाही, असे कुणी म्हणणार नाही. किंवा ह्या कारणासाठी त्याला कर्ज नाकारण्यात येणार नाही. तरी कुंभार जातीची बहुसंख्य मुले अशिक्षित राहतात आणि कुंभारकाम करून पोट भरतात असे असेल, तर त्याचे खरे कारण आज ज्या स्वरूपात जातिव्यवस्था आहे त्याच्यात आढळणार नाही. जर एखाद्या कुंभार मुलाने माध्यमिक शिक्षणक्रम यशस्वी रीतीने पार पाडला, तर आधुनिक जीवनात ज्या विविध व्यावसायिक संधी उपलब्ध असतात त्यांची त्याला चांगल्या प्रकारे कल्पना येईल आणि त्यांचा लाभ उठविण्याची कुवतही त्याच्यात येईल. तो कुंभारकाम करणार नाही आणि त्याने कुंभारकाम केले तरी तो वेगळ्या प्रकारचा कुंभार होईल. आज कुंभारांची मुले जर माध्यमिक शिक्षण पार पाडू शकत नसतील, तर त्याचे खरे कारण कुंभारकुटुंबांची गरिबी हे होय. बहुसंख्य खेड्यांतून प्राथमिक शाळा असल्या आणि प्राथमिक शिक्षण सक्तीचे आणि मोफत असले, तरी ही मुले शाळेत टिकू शकत नाहीत. त्यांना १६ वर्षे होईतो शाळेत ठेवण्याइतके आर्थिक सामर्थ्य कुटुंबाकडे असत नाही. नवव्या–दहाव्या वर्षी मुला–मुलींना घरी किंवा बाहेर काम करून प्रत्यक्ष–अप्रत्यक्षपणे आईबापांच्या संसाराला हातभार लावावा लागतो. अशिक्षित, जवळजवळ निरक्षर राहिलेली ही मुले मग मोठेपणी अपरिहार्यपणे कुटुंबाच्या पारंपरिक व्यवसायाकडे वळतात. कारण एक तर ते काम कुटुंबातील प्रौढांच्या देखरेखीखाली ती शिकलेली असतात. दुसरे कोणतेही व्यावसायिक काम करण्याची कुवत त्यांनी संपादन केलेली नसते. त्यांची त्यासाठी आवश्यक असलेली शैक्षणिक पूर्वतयारी झालेली नसते. कुंभारकामावर पोट भरेल अशी परिस्थिती नसली तर मोलमजुरी करण्याशिवाय त्यांना गत्यंतर नसते. दारिद्र्याचे आणि जातीय व्यवसायाचे दुष्टचक्र चालू राहते.

ह्यातून बाहेर पडण्याचा एक परिणामकारक मार्ग म्हणजे जलद गतीने आर्थिक विकास घडवून आणणे. रोजगार वाढेल, खेडेगावांतून अधिक विविध रोजगार उपलब्ध होतील आणि सर्व थरांतील लोकांचे उत्पन्न वाढेल अशी व्यवस्था जर घडवून आणली तर मुले शिकू शकतील, आधुनिक मूल्ये व दृष्टी आत्मसात करू शकतील आणि विशेष म्हणजे जातीय व्यवसायाच्या बेडीतून आणि तिला जखडून ठवणाऱ्या दारिद्र्यातून बाहेर पडू शकतील. जातीचा एक प्रमुख आधार म्हणजे कुटुंबाने पिढ्यान्‌पिढ्या जातीय व्यवसाय करीत राहणे. तो जर उलथून पाडला, तर जात पुसट होत जाईल. तेव्हा व्यावसायिक कामाचे आधुनिकीकरण साधणारा आर्थिक विकासाचा कार्यक्रम हा जातिसंस्थेचे आणि तिच्याशी संलग्न असलेल्या विषमतेचे निर्मूलन घडवून आणण्याचा फलदायी मार्ग होय. हा कार्यक्रम आखताना, समाजात जे अधिकच वंचित आणि म्हणून सामाजिक-शैक्षणिक दृष्ट्या मागासलेले थर आहेत, त्यांना अधिक तातडीने आणि अधिक प्रमाणात कसे साहाय्य होईल ह्याचा विचार करून ह्या कार्यक्रमांची रचना कशी करावी ह्याविषयीचे मार्गदर्शन मागास वर्ग आयोगाकडून अपेक्षित आहे, असे केंद्र सरकारच्या वर उल्लेखिलेल्या टिपणीचे सार आहे.

या युक्तिवादात बरेच तथ्य आहे, पण मंडल आयोगाने त्याची दखल घेतलेली नाही. आयोगाने प्रथमपासून केवळ आरक्षणाच्या लक्ष्यावर दृष्टी केंद्रित केली आहे असे दिसून येईल. भारतीय समाजातील सामाजिक व शैक्षणिक दृष्ट्या मागासलेले विभाग ह्या प्रामुख्याने हिंदू जातिसंस्थेतील हलक्या मानलेल्या जाती होत. ह्या जातींत समाविष्ट असलेल्या व्यक्तींवर नीचत्वाचा छाप मारून जातिसंस्थेने त्यांना काही विशिष्ट व्यवसायांशी वंशपरंपरेने जखडून ठेवले, स्वतःचा विकास करून घेण्याची, स्वतःच्या प्रयत्नांच्या व बुद्धीच्या जोरावर संपत्ती आणि संस्कृती संपादन करण्याची संधी नाकारली आणि म्हणून या जाती मागासलेल्या तर राहिल्याच पण त्यांचा स्वाभिमान, आत्मविश्वास नष्ट झाला, आता औपचारिकपणे त्यांना समान संधी उपलब्ध करून दिली तरी तिचा लाभ घेण्याची त्यांना कुवत असत नाही, ईर्ष्या असत नाही; तेव्हा



अनुक्रमणिका

# मराठी विश्वकोश

शास्त्रीय व तांत्रिक विषयांतील मानवी ज्ञान मराठी भाषेत उपलब्ध करून देण्याचा महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळाचा अभिनव लक्षणीय उपक्रम.

**प्रत्येकी सुमारे १,१०० पृष्ठांचे २० खंड.**

**१ ते १० खंड विक्रीस तयार, खंड ११ लवकरच विक्रीस उपलब्ध होत आहे. उर्वरित खंड प्रकाशनाच्या मार्गावर.**

**किंमत : एक खंड – रु. १००/–, २० खंडांचा संच रु. २,०००/–**

रु. २००/– आगाऊ अनामत भरणाऱ्यास २० खंडांचा संच रु १६००/– ला पडेल. सरकारमान्य शिक्षणसंस्था, ग्रंथालये, संशोधनसंस्था यांना सवलत. प्रत्येक खंडास रु. ७०/– आणि २० खंडांच्या संचास रु. १,४००/–

शासनमान्य पुस्तकविक्रेत्यांना व प्रकाशकांना संचावर २५ टक्के वटाव.

**विश्वकोशासंबंधी चौकशी–**

सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ,
एन्साहटमेंट, " डी " ब्लॉक, आझाद मैदान, मुंबई–४०० ००१.

**प्रत्यक्ष विक्रीसाठी चौकशी–**

व्यवस्थापक, पाठ्यपुस्तक भांडार व वितरण केंद्रे–

१) "बालभारती", १०/उद्योगनगर,
स्वामी विवेकानंद मार्ग,
गोरेगांव, मुंबई–४०० ०६२.
(दूरध्वनी क्र. ६९८०७१)

२) "बालभारती", सेनापती बापट मार्ग,
पुणे–४११ ००४.
(दूरध्वनी क्र. ५९४६६)

३) "बालभारती" रवींद्रनाथ टागोर
सायन्स कॉलेजसमोर,
महाराजाबाग रोड,
नागपूर–४४० ०१२.
(दूरध्वनी क्र. २३०७८)

४) एम्. आय्. डी. सी. रोड
नं. २ व ३, रेल्वे स्टेशनजवळ,
औरंगाबाद–४३१ ००१.
(दूरध्वनी क्र. ४११०)

ह्या जातींना पुढे आणण्यासाठी खास प्रयत्न केले पाहिजेत आणि शैक्षणिक संस्थांत, विशेषतः उच्च शिक्षणाच्या संस्थांत आणि नोकऱ्यांत त्यांच्यासाठी आरक्षित जागा उपलब्ध करून देणे असे ह्या प्रयत्नांचे प्रमुख स्वरूप असले पाहिजे ही भूमिका आयोगाने सुरुवातीपासूनच स्वीकारलेली दिसते. अहवालाची रचना ह्या भूमिकेच्या समर्थनासाठी केल्यासारखी दिसते. आता ह्या भूमिकेतही बरेच तथ्य आहे. पण आयोगाने तिची मांडणी योग्य प्रकारे केली आहे, असे दिसत नाही.

"पारंपरिक भारतीय समाजात सामाजिक मागासलेपणा हा जातीच्या ( कनिष्ठ ) दर्जाचा साक्षात परिणाम होता आणि इतर प्रकारचा मागासलेपणा माणसाला लंगडे करून सोडणाऱ्या ह्या प्रतिबंधापासून (हँडिकॅप) सरळ निष्पन्न होत असे." (भाग पहिला, पृ. १७). हा आपला मुद्दा सिद्ध करण्यासाठी आयोगाने एक सबंध प्रकरण–चौथे प्रकरण–खर्ची घातले आहे. हा अहवाल प्रथमतः भारत सरकारसाठी, लोकप्रतिनिधींसाठी आणि नंतर भारतीय जनतेसाठी आहे. पण जणू काय ह्या मंडळींना जातिसंस्था, तिचा चातुर्वर्ण्याच्या संकल्पनेशी असलेला अस्पष्ट संबंध, तिचा धूसर इतिहास, तिच्यात गोवलेली सोवळ्याओवळ्याची, कित्येक बाबतीत आचरट अतिरेकाला जाणारी कल्पना, तिच्यात अंतर्भूत असलेली सामाजिक विषमता या गोष्टी अपरिचित असाव्यात अशा थाटात ह्या प्रकरणाची आखणी केली आहे. आयोगापुढील प्रश्न असा आहे, की आज भारतीय समाजात जे विशेष मागासलेले विभाग आहेत, ज्यांच्यासाठी खास प्रयत्नांची जरुरी आहे असे जे मागासलेले विभाग आहेत ते कोणते आहेत, हे कसे ओळखावे ? ते ओळखण्यासाठी कोणत्या कसोटया वापरणे योग्य ठरेल ? आणि ह्या मागासलेल्या विभागांना त्यांचा मागासलेपणा कमी करण्यासाठी जे विशेष साहाय्य केले पाहिजे त्याचे स्वरूप काय असावे ? आता आयोगाचे म्हणणे, समजा, असे आहे की आजच्या भारतीय समाजात जे मागासलेले विभाग आहेत त्या म्हणजे बव्हंशाने पारंपरिक हिंदू समाजात ज्या खालच्या मानलेल्या जाती आहेत त्याच होत. आता ह्या म्हणण्यात 'एखाद्या समाजातील सामाजिक दृष्टया मागासलेला विभाग' ही संकल्पना आणि 'खालची जात' ही संकल्पना ह्या भिन्न आहेत असे गृहीत आहे हे उघड आहे. जेथे जातिसंस्था नाही अशा समाजात सामाजिक दृष्टया मागासलेले विभाग नसतात काय? इंडोनेशिया, युगांडा, अमेरिका इ. ज्या देशांत जातिसंस्था नाही, त्यांच्यांत सामाजिक दृष्टया मागासलेले विभाग नाहीत काय ? असतील तर सामाजिक मागासलेपणाचे जातिनिरपेक्ष असे निकष असले पाहिजेत. हे निकष ठरविल्यानंतर भारतीय समाजाच्या संदर्भात दोन मुद्दे मांडता येतील. एक असा : ह्या जातिनिरपेक्ष निकषांप्रमाणे जे सामाजिक विभाग मागासलेले ठरतात त्या बऱ्याच प्रमाणात हिंदू समाजाच्या खालच्या जाती निघतात. म्हणजे तुरळक अपवाद सोडले तर ह्या निकषांप्रमाणे मागासलेली ठरणारी लोकसंख्या आणि खालच्या जातींची लोकसंख्या ही एकच असते असे दिसून येते. तेव्हा भारतीय समाजाचे मागासलेले विभाग म्हणजे अमूक जाती असे त्यांना ओळखणे सोयीचे आहे. जात ही लोकप्रसिद्ध गोष्ट आहे. ह्या जाती कोण आणि त्यांतली माणसे कोण हे सर्वजण ओळखतात. तेव्हा कोणत्याही समाजाला लागू पडणाऱ्या मागासलेपणाच्या निकषांच्या आधारे भारतीय समाजाचे मागासलेले विभाग मुक्रर केले आणि जातींशी त्यांची सांगड घालता येते हे दाखवून दिले, की जातींच्या द्वारे हे मागासलेले विभाग ओळखणे कारभाराच्या दृष्टीने सोयीचे ठरते.

दुसरा, अधिक महत्त्वाचा मुद्दा असा, की भारतीय समाजाच्या संदर्भात हा मागासलेपणा घडवून आणणारी आणि टिकवून धरणारी कारणे कोणती ह्याचा शोध घेतला पाहिजे आणि ती नाहीशी केली पाहिजेत. नाहीतर मागासलेपणाचे निर्मूलन होणार नाही. ह्या कारणांचा शोध घेतला तर ती जात ह्या सामाजिक संस्थेमध्ये गुंतलेली आहेत असे आढळून येते. तेव्हा मागासलेपणा क्रमशः नाहीसा करण्यासाठी जात ही संस्था नष्ट केली पाहिजे. आता वर पाहिल्याप्रमाणे जातीचे अस्तित्व दुहेरी असते. जात व्यवहारात असते आणि म्हणून जात नष्ट करण्यासाठी जातीवर आधारलेल्या सामाजिक व्यवहाराचा अंत घडवून आणला पाहिजे. ह्याचा एक मार्ग म्हणून खालच्या जातींतील लोकांना

आधुनिक शिक्षणात प्रवेश दिला पाहिजे, आणि ह्या द्वारे आधुनिक शासकीय व्यवहारात, तंत्राधिष्ठित औद्योगिक उत्पादनात वगैरे ते सहभागी होतील अशी व्यवस्था केली पाहिजे. म्हणजे पारंपरिक जातिबद्ध व्यवसायांपासून त्यांची मुक्तता केली पाहिजे. पण जातीचे अस्तित्व मनातही असते. ते श्रेष्ठत्व–कनिष्ठत्व, सोवळे-ओवळे ह्यांविषयीच्या काही संकल्पनांवर, तसेच काही खास धार्मिक संकल्पनांवरही– उदा., पापपुण्य, कर्म, पुनर्जन्म इ.– आधारलेले असते. तेव्हा जात मनातून घालविण्यासाठी ह्या संकल्पनांचा बिमोड केला पाहिजे व ह्यासाठी आज जातीशी संबंधित असलेल्या व्यवहाराचे नियमन करणाऱ्या ह्या धार्मिक व इतर संकल्पना नेमक्या आहेत तरी काय, ह्याचा काळजीपूर्वक शोध घेतला पाहिजे.

हा शोध एक समाजशास्त्रीय अभ्यास असेल व तो अत्यंत उपयुक्त ठरेल यात शंका नाही. हा शोध घेण्याचा प्रयत्न आयोगाने केलेला नाही किंवा समाजशास्त्रज्ञांकडून तो करवून घेऊन त्याचे जे निष्कर्ष हाती लागतील त्यांचा उपयोग केलेला नाही. त्याऐवजी साधारण साडेतीन पृष्ठांत हिंदू सामाजिक–धार्मिक परंपरेचे विश्लेषण त्यांनी केले आहे. त्याचा प्रारंभ पुरुषसूक्तापासून करून १९७६–७७ सालापर्यंत ते येऊन ठेपले आहेत. हा अर्थात आयोगाचा अधिकार नाही. आयोगाचे सदस्य कुणी भारतीय संस्कृतीचे किंवा इतिहासाचे अभ्यासक नव्हते. ह्या फंदात पडायचे तर त्यासाठी आवश्यक असलेला गृहपाठही त्यांनी केलेला नाही. ते शतपथब्राह्मण, महाभारत इ. ग्रंथांतील वचने उद्धृत करतात, पण डॉ. जी. एस. घुर्ये, डॉ. जे. आर. कांबळे, डॉ. एम. एस. ए. राव इ. विद्वानांमार्फत. मूळ वचनांचा संदर्भ देत नाहीत किंवा ह्या आधुनिक विद्वानांच्या ग्रंथांच्या पृष्ठांचाही संदर्भही देत नाहीत. हा सर्वच प्रकार हास्यास्पद आहे. उदा. पुढील वचन घ्या : “ The Mahabharat says, ‘The Shudra can have no absolute property, because his wealth can be appropriated by his master at will’ ” (भाग पहिला, पृ. १५). हे वचन एम. एस. ए. राव यांच्या एका ग्रंथातून घेतले आहे. त्याचा अर्थ असा : “शूद्राची निरपेक्ष (अॅब्सोल्यूट) अशी मालमत्ता असू शकत नाही, कारण त्याचा धनी आपल्या इच्छेप्रमाणे त्याची संपत्ती बळकावू शकतो.” आता हे राव यांच्या ग्रंथात कुठे, कोणत्या संदर्भात उद्धृत केले आहे हे स्पष्ट केलेले नाही आणि ते महाभारतात कोणत्या स्थळी आले आहे तेही सांगितले नाही. ह्या वचनाचा अर्थ समजून घेणेही सोपे नाही. त्याचा अर्थ असा आहे का, की महाभारतकाली (किंवा ज्या काळाला अनुलक्षून महाभारतात हे विधान करण्यात आले आहे त्या काळी) प्रत्येक शूद्राला एक धनी असे आणि तो शूद्र जे उत्पादन करीत असे ते तो स्वत: आपले म्हणून बाळगू शकत असे, पण धन्याला त्यावर कधीही हक्क सांगता येत असे. असे असेल तर ही एक असाधारण सामाजिक प्रथा होती असे म्हटले पाहिजे. कारण शूद्राचा जर धनी असेल तर शूद्र त्या धन्याचा दास असणार आणि दासाने निर्माण केलेली संपत्ती धन्याचीच असणार, तेव्हा ती दासापासून बळकावून घेण्याचा प्रश्नच उपस्थित होणार नाही. उलट, शूद्रच धन्याची संपत्ती असणार. सर्वच शूद्र आणि फक्त शूद्रच असे दास होते का ? ते कोणाचे दास असत ? काही पत्ता लागत नाही.

हिंदू धार्मिक-सामाजिक परंपरेचे ह्या प्रकारे विश्लेषण करून आयोगाने जो निष्कर्ष काढला आहे तो असा : “ If religion was ever used as an opium of the masses it was done in India, where a small priest–class, by a subtle process of conditioning the thinking of the vast majority of the people hyphotised them for ages into accepting a role of servility with humility. As labourers, cultivators, craftsmen, etc. shudras where the main producers of social surplus. Their social labour was the life–blood of India's great civilisation. Yet socially, they were treated as outcastes; they had no right in private property; they carried the main burden of taxes, and the heaviest punishments were awarded to them for minor infringements of the









social code." (भाग पहिला, पृ. १६). भाषांतर: "जर धर्माचा बहुजनसमाजाची अफू म्हणून कुठेही वापर करण्यात आला असेल, तर तो भारतात करण्यात आला. येथे एका लहान पुरोहित–वर्गाने फार मोठ्या संख्येच्या लोकांच्या विचारांना एक विशिष्ट वळण देणाऱ्या सूक्ष्म प्रक्रियेचा अवलंब करून त्यांच्या मनांना युगानुयुगे मोहनिद्रेत गुंगविले आणि त्यांना लीनपणे दास्याची भूमिका स्वीकारायला प्रवृत्त केले. कामगार, शेतकरी, कारागीर इ. म्हणून प्रामुख्याने शूद्र समाजात अतिरिक्त संपत्ती निर्माण करीत होते. त्यांचे सामाजिक कष्ट हे महान भारतीय संस्कृतीच्या धमन्यांतून खेळणारे जीवनदायी रक्त होते. पण सामाजिक व्यवहारात त्यांना बहिष्कृत म्हणून वागविण्यात येत असे. त्यांना खाजगी मालमत्तेचा काहीही अधिकार नव्हता; करांचा मुख्य भार त्यांच्यावर पडत असे, आणि सामाजिक नियमांचा (कोड) त्यांनी यत्किंचितही भंग केला तर, त्यांना जबर शासन करण्यात येत असे."

आता प्रश्न असा आहे, की हे वर्णन कोणत्या काळाला लागू पडते. अफू वगैरे सोडू या; कारण ती मार्क्सवाद धरून सर्व धर्मांना लागू पडते. पण शूद्रांची ही जी स्थिती वर्णन केली आहे, ती कोणत्या काळाविषयी खरी आहे? 'शूद्र' हा शब्द ग्रंथांतरीचा, पंडितांचा, इतिहासकारांचा आहे. लोकव्यवहारात एकमेकांना कुणबी, सुतार, लोहार इ. म्हणून ओळखीत, ओळखतात. हे सर्व निश्चितपणे 'शूद्र' आहेत. आता पेशवाईचा कालखंड घेऊ. तो साहेबाने न विटाळलेला आणि ज्याच्याविषयी तत्कालीन शूद्रांच्या आजच्या वंशजांच्या अनेक रास्त तक्रारी आहेत असा कालखंड आहे. आता पेशवाईत ह्या लोकांना मालमत्ता बाळगण्याचा अधिकार नव्हता काय? त्यांची अवजारे तरी त्यांची स्वतःची होती की नव्हती? बरे त्यांची जर खाजगी मालमत्ता नव्हती तर करांचा बोजा त्यांच्यावर सर्वांत जास्त कसा काय पडत असे? हा कर ते कुठून देत? हे लोक कशापासून बहिष्कृत होते? ते तर गावगाड्यात होते. अस्पृश्य गावापासून बहिष्कृत होते असे म्हणता येईल. पण शूद्र म्हणजे अस्पृश्य नव्हेत. सामाजिक नियम (कोड) मोडले, तर शूद्रांना जे जबर शासन करण्यात येत असे असे आयोगाचे म्हणणे आहे, ते शासन कोण करीत असे? प्रत्येक जात स्वायत्त असे, तिच्या रहाटीचे नियम जातीतल्या माणसांवर बंधनकारक असत आणि ते एखाद्याने मोडले, तर जातीची पंचायत हे शासन करीत असे. सामान्यपणे सरकारचा याच्याशी काही संबंध नसे. हे सर्व भोंगळ विवेचन आहे.

ह्याची आयोगाला काहीशी जाणीव आहे. जातिसंस्था ३००० वर्षे खिळून (transfixed) राहिली आहे असे जरी त्यांनी म्हटले आहे (पृ. १६) तरी ती कावेबाज, न हटणारी अशी संस्था आहे, ती नवनवीन रूपे धारण करते असेही त्यांनी म्हटले आहे. "Caste has endured over the ages owing to its great resilience like the proverbial cat it has nine lives. In fact no scheme of social organization can survive for long anless it keeps adjusting with changes in society and is able to produce effective answers to the contemporary problems (पृ. १८) "जातिसंस्था अनेक युगे टिकून राहिली आहे कारण तिच्या अंगी पुनरुत्थानाची मोठी शक्ती आहे; मांजराला नऊ जीव असतात असे म्हणतात तसे तिला नऊ जीव आहेत. समाजात होत असलेल्या बदलांशी स्वतःला जुळवून घेत राहिल्याशिवाय आणि समकालीन समस्यांना परिणामकारक उत्तरे देण्याची शक्ती तिच्या अंगी असल्याशिवाय समाजसंघटणेची रचना फार काळ टिकू शकणार नाही ही वस्तुस्थिती आहे." आता ब्राह्मणांनी मोहिनीविद्येचा वापर करून बहुजनसमाजाला गुंगीत ठेवून, त्याचा बुद्धिभ्रंश करून प्रस्थापित केलेली आणि टिकवून धरलेली समाजरचना हे जातिव्यवस्थेचे वर्णन मागे पडले. मग आता प्रश्न असा आहे, की कोणत्या समकालीन समस्यांना आज जातिव्यवस्था उत्तरे पुरवीत आहे आणि ही उत्तरे काय आहेत?

ह्याविषयीचे आयोगाचे म्हणणे अहवालात रजनी कोठारी आणि इतर काही समाजशास्त्रज्ञांच्या आधारे मांडले आहे. रजनी कोठारी यांनी असे दाखवून दिले आहे, की भारतात स्वातंत्र्यानंतर लोकशाही चौकट स्वीकारली तेव्हा राजकीय पुढाऱ्यांना जातिसंस्थेमध्ये लोकांपर्यंत पोहोचायचे,

लोकांना जागवून संघटित करण्याचे व राजकीय प्रक्रियांना, निर्णयांना आपल्याला हवे तसे वळण देण्याचे एक आयते, तयार साधन सापडले आणि त्याचा त्यांनी स्वाभाविकपणे वापर केला. ह्याचा परिणाम असा झाला, की जात हा राजकारणात एक प्रभावी घटक बनला. ह्या घटनेशी संलग्न असलेली दुसरी घटना अशी की, संख्येने लहान असलेल्या जाती एकएकटया निष्प्रभ असल्यामुळे राजकारणावर प्रभाव पाडण्यासाठी एकत्र आल्या व संघटित झाल्या. जात एकटी राजकारणात वावरत नाही तर समान दर्जाच्या अनेक जातींचा संघ राजकारणात व्यवहार करतो. अहवालात ह्या घडामोडी रजनी कोठारी, एल. ए. व सुझन रुडॉल्फ इत्यादिकांच्या पुस्तकांतून उतारे उद्धृत करून नमूद करण्यात आल्या आहेत. पण आयोगापुढचा मुख्य प्रश्न जो आहे, म्हणजे मागासलेल्या विभागांची आज परिस्थिती काय आहे आणि ती सुधारण्यासाठी काय करता येईल हा जो प्रश्न आहे, त्याच्या संदर्भात ह्या घडामोडींचा काहीच विचार केलेला नाही. पारंपरिक जातिव्यवस्थेत ज्या सर्वांत खालच्या जाती आहेत त्या अशा प्रकारे एकत्र येऊन संघटित झाल्या आहेत का ? ह्या संघटना राजकीय दडपण आणून आपल्या समाजांची सामाजिक, आर्थिक, शैक्षणिक परिस्थिती सुधारण्यात किती प्रमाणात यशस्वी झाल्या आहेत ? जर ह्या जाती एकत्रित येऊ शकल्या नसतील, तर त्या का एकत्र येऊ शकल्या नाहीत ? त्यांच्या वरच्या दर्जाच्या जाती एकत्रित होऊन राजकीय प्रभाव गाजवू लागल्या आहेत का ? असल्यास त्याचे कोणते अनुकूल-प्रतिकूल परिणाम मागासवर्गीयांवर झाले आहेत ? जर सर्वांत खालच्या जाती राजकीय दृष्टया संघटित होऊ शकत नसतील किंवा झाल्या नसतील आणि उलट वरच्या स्तरातील जाती संघटित होऊन राजकीय सत्ता हस्तगत करीत असतील आणि ह्याचे खालच्या जातींवर प्रतिकूल परिणाम होत असतील तर अलीकडच्या काळात ह्या खालच्या जातींची परिस्थिती अधिकच बिघडलेली असणार. मग ह्या नवीन प्रतिकूल घटकाचे निराकरण करण्याचा मार्ग कोणता ? आयोगाने हे प्रश्न उपस्थितही केलेले नाहीत. त्यांनी ह्या घडामोडीपासून जो निष्कर्ष काढला आहे तो असा, की "जरी अलीकडच्या काळात आधुनिकतेच्या शक्तींमुळे कित्येक प्रदेशांत जुनी जातीची बंधने सैल झाली आहेत आणि काही पारंपरिक जातिनिर्बंध क्षीण झाले आहेत तरी जातिव्यवस्थेत दुबळेपणाची चिन्हे दिसू लागली आहेत असे यापासून निष्पन्न होत नाही." (पृ. २०). तसेच "जातीने कर्मकांडाच्या आघाडीवर जेवढे गमावले आहे त्यापेक्षा तिने राजकीय आघाडीवर अधिक कमावले आहे. ह्याचा परिणाम म्हणून वरच्या आणि खालच्या जातींमधील सत्तेच्या समीकरणामध्ये काही फेरजुळणी (adjustment) झाली आहे, आणि ह्यांतून सामाजिक तणाव अधिक तीव्र झाले आहेत. ह्या तणावांमुळे हे समाजरूपी महावस्त्र फाटून निघेल की काही आंतरिक फेरजुळणी करून ह्या तणावाचे शमन समाज करू शकेल हे आज सत्ताधारी असलेल्या उच्च जाती, इतिहासात दडपल्या गेलेल्या आणि मागासलेल्या वर्गांच्या न्याय्य आकांक्षा आणि मागण्या किती सामंजस्याने हाताळतात ह्यावर अवलंबून राहील." (पृ. २०).

ही विधाने बरीचशी संदिग्ध आहेत आणि प्रस्तुत विषयाशी त्यांचा नेमका काय संबंध आहे हे स्पष्ट करण्यात आलेले नाही. स्वातंत्र्यानंतर लोकशाही राजकारण सुरू झाले तेव्हा वरच्या जाती, जाती म्हणून संघटित झाल्या, त्यांनी राजकीय सत्ता मिळविली आणि तिचा जातीय स्वार्थासाठी वापर केला. खालच्या जातीही आता जागृत झाल्या आहेत, त्यांच्याही सत्ता आणि संपत्तीच्या भागिदारीविषयी काही न्याय्य आकांक्षा आहेत आणि त्यांचे समाधान झाले नाही तर सामाजिक लढे तीव्र होतील आणि समाज अस्वस्थ राहील. तेव्हा ह्या आकांक्षांचे समाधान करणे हा सध्याच्या सत्ताधारी जातींच्या दृष्टीने समंजसपणाचा, शहाण्या स्वार्थाचा मार्ग होय. ह्या आकांक्षांचा एक भाग म्हणजे बहुधा शासकीय इ. नोकऱ्यांत तसेच उच्च शिक्षणसंस्थांत संख्येच्या प्रमाणात जागा मिळणे आणि त्यासाठी आरक्षणाची तजवीज करणे. आता ह्या मार्गाने सर्वच जाती, जाती म्हणून अधिक दृढ होतील की नाही ? सत्ता आणि संपत्तीच्या भागिदारीत संख्येच्या प्रमाणात सर्व जातींचा समतोल राखणे म्हणजे सामाजिक न्यायाची स्थापना होणे असे

आयोगाला म्हणायचे आहे काय ? हा प्रश्न उपरोधाने उपस्थित केलेला नाही. असा युक्तिवाद करता येईल, की भारतीय समाजाला जातिसंस्थेचा जो वारसा मिळाला आहे, तो इतका भक्कम आहे की तो नष्ट करता येणार नाही. तेव्हा भारतीय समाजाच्या संदर्भात सामाजिक न्याय या संकल्पनेची व्याख्या ह्या वस्तुस्थितीशी सुसंगत ठरेल अशा रीतीने केली पाहिजे. आणि जातींमधील समतोल अशीच ही व्याख्या होईल.

आयोगाची भूमिका अशी आहे, असे दिसत नाही. जातिविहीन समाज प्रस्थापित करण्याचा घटनाकारांचा इरादा होता ही गोष्ट ते नमूद करतात (पृ. १९). जात राजकारणात उतरल्यामुळे जातीमधील भेदरेषा अधिक खोल झाल्या आहेत, ही खंत त्यांनी व्यक्त केली आहे (पृ. १९). घटनेशी सुसंगत ठरेल एवढ्या प्रमाणात 'खालच्या' जातीसाठी आरक्षण असावे अशी शिफारसही त्यांनी केली आहे. ह्यामुळे काही काळ तरी जाती अधिक दृढ होणार ह्यात शंका नाही. मग जातिसंस्थेचे विसर्जन करण्याच्या उद्दिष्टाचे काय होणार ? काटयाने काटा काढावा, विषाने विष मारावे तसा हा प्रकार आहे असे म्हणण्यात येईल. पण ही आलंकारिक भाषा झाली. जातींची जाणीव काही काळपर्यंत अधिक दृढमूल झाल्यानंतर, जाती राजकारणाच्या रिंगणात उतरल्यानंतर ज्या सामाजिक परिस्थितीत जाती नाहीशा होतील तेथपर्यंतची वाटचाल कोणत्या टप्प्यांनी होऊ शकेल आणि ती घडवून आणण्यासाठी किंवा सुकर करण्यासाठी कोणते उपाय योजावे लागतील ह्याचे काही दिग्दर्शन आयोगाने करणे आवश्यक होते. ही आवश्यकताच आयोगाला जाणवलेली दिसत नाही. पृ. ५७ वर (पहिला भाग) असे म्हणण्यात आले आहे : " लोकशाही रचनेत प्रत्येक व्यक्तीला आणि जमातीला (कम्युनिटी) ह्या देशाच्या राज्यकारभारात सहभागी होण्याचा हक्क आणि आकांक्षा असणे न्याय्य आहे." (अधोरेखा मूळात नाही). लोकशाही रचनेत जमातीला जमात म्हणून हक्क नसतात. हक्क नागरिकांना असतात. जाती कायम ठेवून सर्व जातींना, प्रगत आणि मागासलेल्या, त्यांचे न्याय्य हक्क मिळवून देण्यासाठी आयोगाने आपल्या शिफारसी केल्या आहेत, की जातींचे विसर्जन जिच्यात झाले आहे आणि सर्व नागरिकांना जिच्यात त्यांचे न्याय्य हक्क प्राप्त झाले आहेत अशी सामाजिक स्थिती निर्माण करण्याचे उपाय म्हणून ह्या शिफारसी करण्यात आल्या आहेत ह्याविषयी आयोगाच्या विचारात स्पष्टता आहे असे म्हणवत नाही.

असाच गोंधळ समाजिक न्याय आणि अर्हता (मेरिट) ह्यांविषयी आयोगाने जे विचार मांडले आहेत त्यांच्यांत आढळतो. ह्याविषयी त्याने जे विवेचन केले आहे, त्याचा सारांश असा : " घटनेच्या कलम १५, १६ आणि २९ मध्ये भारतीय नागरिकांच्या समानतेचे तत्त्व प्रस्थापित केले आहे. त्यामध्ये समान संधीचे तत्त्व अनुस्यूत आहे. प्रथमदर्शनी जरी समान संधीचे तत्त्व न्याय्य वाटले, तरी त्याच्यात एक गोम आहे. खरी समानता समानांमध्येच असू शकते. विषम परिस्थितीतील व्यक्तींना समान संधी किंवा समान वागणूक दिली तर तिचे परिणाम विषम होतात. विषम परिस्थितीतील व्यक्तींमध्ये समान संधीच्या पायावर स्पर्धा लावली तर जे तगडे आहेत ते तगून राहतात. पण 'तगड्यांनी तगावे' हा जंगलचा कायदा आहे, त्याच्यात माणुसकी नाही. समाजातील दुबळ्या वर्गांना संरक्षण देण्यात माणुसकी आहे. घटनेने दिलेले मूलभूत हक्क हे व्यक्तीला दिलेले आहेत. उलट घटनेमध्ये जी 'राज्याच्या धोरणाची मार्गदर्शक तत्त्वे' नमूद करण्यात आली आहेत ती सामाजिक हिताचे संरक्षण करण्यासाठी आहेत. ही तत्त्वे आणि घटनेने स्वीकृत केलेले व्यक्तीचे मूलभूत हक्क यांच्यांत प्रसंगी विरोध येणे शक्य असते.

" मानवी समाजाच्या संदर्भात समतेचे तीन अर्थ होऊ शकतात. संधीची समता, वागणुकीची समता आणि परिणामांची समता. आता विषम परिस्थितीतील व्यक्तींना समान संधी दिली किंवा समान वागणूक दिली तरी तिचे विषम परिणाम होणार. तेव्हा समान परिणाम साधण्यात, म्हणजे सर्व व्यक्तींची स्थिती समान होईल अशी तजवीज करण्यात खरी समानता असते. ह्या दृष्टीने ज्यांची परिस्थिती प्रतिकूल आहे त्यांना विशेष साहाय्य

अनुक्रमणिका

करून त्यांना इतरांबरोबर आणण्यात खरी समानता असते.

"ह्या संदर्भात 'अर्हते'ची (मेरिट) जी संकल्पना आहे, तिच्यामुळे बरीच रागवारागवी होते. मागासलेल्या वर्गातील व्यक्तींना चांगले शिक्षण मिळावे यासाठी त्यांनी विशेष सोयी उपलब्ध करून दिल्या तर त्याला कोणाचा विरोध नसतो. पण सर्वसामान्य उमेदवारांतून ७५ टक्के गुण मिळविलेल्या विद्यार्थ्याला बाजूला सारून ४५ टक्के मिळविलेल्या मागासवर्गीय विद्यार्थ्याला जेव्हा वैद्यकीय महाविद्यालयात प्रवेश दिला जातो, तेव्हा अनेक लोक रागावतात. किंवा बऱ्याच खालच्या क्रमांकाच्या मागासवर्गीय उमेदवाराला त्याच्यावर क्रमांक मिळवलेल्या उमेदवारांना डावलून जेव्हा अखिल भारतीय शासकीय सेवेत नेमले जाते तेव्हाही अशीच प्रतिक्रिया होते. हा रोष दोन मुद्द्यांवर आधारलेला असतो. कमी अर्हतेच्या व्यक्तीला अधिक अर्हतेच्या व्यक्तीला बाजूस सारून पसंत करणे हे रास्त नाही, न्यायाशी विसंगत आहे हा एक मुद्दा. दुसरा मुद्दा असा, की अधिक अर्हतेची माणसे उपलब्ध असताना कमी अर्हतेच्या माणसांना स्थाने दिल्यामुळे समाजाची हानी होते, अधिक अर्हतेच्या माणसांच्या सेवेपासून समाजाचा जो लाभ झाला असता त्याला तो मुकतो.

"पण अर्हतेच्या ह्या संकल्पनेत एक गंभीर तर्कदोष आहे. समजा, मोहन हा उच्च मध्यमवर्गीय कुटुंबातील मुलगा आहे. त्याचे आईबाप सुशिक्षित, सुसंस्कृत इ. आहेत. शाळेत, घरी त्याला सर्व प्रकारच्या सुविधा आहेत. समजा, लल्लू हा खेड्यातला, खालच्या जातीतला, निरक्षर, गरीब आईबापांच्या पोटी जन्मलेला मुलगा आहे आणि अतिशय प्रतिकूल परिस्थितीत, अनेक कष्ट सहन करीत तो शिकत आलेला आहे. समजा परीक्षेत मोहनला लल्लूपेक्षा ५० टक्के गुण अधिक मिळाले. मग मोहनची अर्हता लल्लूच्या अर्हतेपेक्षा ५० टक्क्यांनी अधिक आहे असा निष्कर्ष काढता येईल का ? समजा, मोहन आणि लल्लू यांची अंगभूत, मूळची बुद्धिमत्ता सारखीच असती तरी त्यांच्या विषम परिस्थितींमुळे त्यांच्या शैक्षणिक गुणवत्तेत खूपच फरक पडणार नाही का ? समजा, लल्लू मोहनच्या परिस्थितीत वाढला असता आणि मोहन लल्लूच्या परिस्थितीत वाढला असता, तर त्यांची तौलनिक गुणवत्ता कशी असती हे आपण सांगू शकू का ? अर्हतेमध्ये कणखर जिद्द, निर्धार, संकटांविरुद्ध झगडण्याची कुवत इ. गुणांचा अंतर्भाव केला तर मग ह्या गुणांचा लाभ लल्लूला देऊन त्या प्रमाणात परीक्षेमध्ये त्याला मिळालेले गुण वाढविणे आवश्यक ठरेल की नाही ? ज्या समाजात विषमता आहे त्याच्यात अर्हता ही व्यक्तीच्या मूळच्या अंगभूत शक्ती आणि तिच्या सामाजिक परिसरापासून होणारे फायदेतोटे ह्या दोहोंनी निश्चित होते. जेव्हा असमान व्यक्तींना आपण एकाच स्पर्धेत भाग घ्यायला लावतो, तेव्हा उच्चवर्गीयांना त्यांच्या अनुकूल परिस्थितीमुळे जे विशेष लाभ होत असतात ते आपण ओळखले पाहिजेत आणि त्यांच्यामुळे अर्हतेत जी भर पडलेली असते ती बाजूला काढून आपण व्यक्तींच्या अर्हतेची तुलना केली पाहिजे. हेच सुसंस्कृत समाजाच्या सद्‌सद्विवेक बुद्धीला पटणारे आहे आणि सामाजिक न्यायाच्या तत्त्वाला धरून आहे."

असा आयोगाने ह्या प्रश्नाच्या केलेल्या विवेचनाचा सारांश आहे आणि तो जवळजवळ त्यांच्याच शब्दांत (भाषांतर करून) दिलेला आहे. त्याच्यात प्रचंड गोंधळ आहे आणि ती सर्व उकलण्यासाठी स्वतंत्र लेख लिहावा लागेल. पण काही मुद्दे मांडणे अगत्याचे आहे,

१) विषम परिस्थितीतील व्यक्तींना समान संधी द्यायची तर त्यासाठी प्रतिकूल परिस्थितीतील व्यक्तीला विशेष सवलती दिल्या पाहिजेत हे तत्त्व न्यायाचे आहे की माणुसकीचे आहे ? समजा, प्रत्येक व्यक्तीला स्वतःची भरभराट करण्याची समान संधी दिलेली असणे हे न्यायाचे (एक) तत्त्व आहे हे आपण मान्य केले. पुढे विचार केल्यावर आपल्याला असे दिसून येते, की विषम परिस्थितीतील व्यक्तींना औपचारिक दृष्ट्या समान संधी दिलेली असली, तरी अनेकदा ती 'खरीखुरी' समान संधी नसते. आयोगानेच घेतलेल्या उदाहरणातील मोहन आणि लल्लू यांना एकाच परीक्षेला बसून आपली अर्हता सिद्ध करण्याची समान संधी दिली, तरी खरी समान संधी नाही. आयोगाने मांडलेल्या विचाराचा अनुवाद करून आपण असे ठरवू या, की मोहन आणि लल्लू यांना









खरी समान संधी देण्यासाठी लल्लूला परीक्षेत जे गुण मिळतील त्यात ३० गुणांची भर घातली पाहिजे. आता समजा, परीक्षेत मोहनला ७० गुण पडले, लल्लूला ३५ गुण पडले आणि मोहनसारख्याच परिस्थितीत वाढलेला मोहनचा चुलतभाऊ जो सोहन त्याला ६० गुण पडले. आपल्या कोष्टकाप्रमाणे लल्लूचे संस्कारित गुण ६५ ठरतील. मोहनचे ७० आणि सोहनचे ६० असतील. समजा, दोनच नोकऱ्या उपलब्ध असल्या तर मोहन व लल्लू यांना त्या मिळतील आणि सोहनला नोकरी मिळणार नाही. खऱ्या समान संधीच्या तत्त्वाप्रमाणे आपण सर्वांना न्याय केला आहे. सोहनवर अन्याय केलेला नाही आणि लल्लूला माणुसकी दाखविलेली नाही. उलट, आपण खऱ्या समान संधीचे तत्त्व न लावता औपचारिक समान संधीचे तत्त्व लावले असते आणि मोहन व सोहन यांना नोकरीसाठी निवडले असते तर लल्लूवर अन्याय झाला असता. तेव्हा माणुसकीचा प्रश्न आत आणून आयोगाने निष्कारण धुरळा उडविला आहे.

माणुसकीवर आधारलेली किंवा माणुसकीशी सुसंगत अशी समाजव्यवस्था कशी असेल, तिच्यातील व्यवहार कसे असतील हा महत्त्वाचा प्रश्न आहे. पण माणुसकीची भूमिका न्यायाची नसते, ती माणसांविषयीच्या न्यायनिरपेक्ष आस्थेची, मैत्री आणि करुणा यांची असते.

२) समतेचे तीन अर्थ लावून आयोगाने परिणामांची समता ही खरी समता आहे असे म्हटले आहे. आता ह्याविषयी दोन गोष्टी म्हटल्या पाहिजेत. एक परिणामांची समता हे भारतीय घटनेने स्वीकारलेले साध्य नाही, सामाजिक न्यायात अंतर्भूत असलेल्या समतेवर आधारलेली समाजव्यवस्था निर्माण करणे हे तिचे साध्य आहे. ह्या समतेमध्ये संधीची समता हा एक महत्त्वाचा घटक आहे, आणि ही संधीची समता 'खरी' असावी, केवळ औपचारिक असू नये यासाठी आवश्यक त्या तजविजी तिला अभिप्रेत आहेत. परंतु परिणामांची समता हे तत्त्व घटनेमध्ये स्वीकारलेले नाही. परिणामांची जी समता आयोगाला संमत आहे असे दिसते, तिच्यात सर्व व्यक्तींना समान साधनसामग्री उपलब्ध असेल असे अंतर्भूत आहे. त्यांनी पसंतीपूर्वक उद्‌धृत केलेले एक वाक्य असे आहे. "म्हणून, परिणामांची समता (इक्वॉलिटी ऑफ् रिझल्ट्स) हे समतेचे एकमेव खरे तत्त्व आहे आणि प्रारंभी जे प्रतिकूल परिस्थितीत आहेत त्यांना यथावकाश, समान साधनसामग्री किंवा हक्क प्राप्त करून देण्यासाठी त्यांना असमान संधी किंवा वागणूक देणे ह्या तत्त्वाच्या दृष्टीने आवश्यक असणे शक्य आहे." (पृ. २२). आता सर्वांना समान साधनसामग्री प्राप्त झालेली असणे ह्याचा अर्थ सर्वांचे समान उत्पन्न असणे असा असेल, तर हे आपल्या घटनेने स्वीकारलेले ध्येय नाही हे उघड आहे. उदा., मार्गदर्शक तत्त्वांमध्ये " (सर्व) नागरिकांना, पुरुष आणि स्त्रिया यांना समानतेने, निर्वाहाची पुरेशी साधने (मीन्स ऑफ् लाइव्ह् लिहुड) मिळण्याचा हक्क प्राप्त करून देण्याच्या दिशेने राज्याने आपली धोरणे आखावी." असे एक तत्त्व आहे. सर्व नागरिकांना निर्वाहाची समान साधने मिळतील अशा दिशेने धोरणे आखावी असे म्हटलेले नाही. घटनेने समानतेचे जे तत्त्व आणि जे ध्येय स्वीकारले आहे, ते स्पष्ट करण्याचा आयोगाने कसून प्रयत्न केलेलाच नाही.

'खऱ्या' समान संधीच्या तत्त्वामध्ये 'परिणामांची विषमता' अभिप्रेत आहे. पण ती न्याय्य विषमता असल्यामुळे तिला आक्षेप घेण्याचे कारण नाही. वरील उदाहरणामध्ये मोहन, सोहन आणि लल्लू यांच्यामध्ये खरी समान संधी आहे. तिचा परिणाम असा होतो की मोहन आणि लल्लू यांना चांगली नोकरी मिळते पण सोहनला मिळत नाही. तो नंतर, समजा, एक कनिष्ठ नोकरी स्वीकारतो. मोहन व लल्लू एका बाजूला आणि सोहन दुसऱ्या बाजूला यांच्यांत विषमता आहे. पण ती खऱ्या समान संधीच्या तत्त्वाशी सुसंगत आणि तिचा परिणाम म्हणून निर्माण झाली आहे. आता ही विषमता एका मर्यादेपर्यंत वाढू दिली तर सामाजिक हितावर तिचे अनिष्ट परिणाम होणे शक्य आहे आणि खऱ्या समान संधीच्या तत्त्वालाही तिची बाधा होईल. म्हणून समान संधीच्या तत्त्वाचा परिणाम म्हणून निर्माण होणाऱ्या विषमतेलाही मर्यादा घालणे भाग असते, ह्याचे भान घटनेला आहे. मार्गदर्शक तत्त्वांतले एक तत्त्व असे आहे, की आर्थिक व्यवस्थेत अंत-

भूत असलेल्या व्यवहारांमुळे संपत्ती आणि उत्पादनाची साधने यांचे समाजाला हानिकारक ठरेल असे केंद्रीकरण होणार नाही अशी खबरदारी राज्याने घ्यावी. याच्यात केंद्रीकरणाला मर्यादा घातली आहे; पण काही जणांकडे इतर काही जणांपेक्षा अधिक संपत्ती असेल, हे गृहीत धरले आहे.

३) 'अर्हते'च्या (मेरिट) बाबतीत आयोगाने फारच घोटाळे केले आहेत. तेव्हा ह्या संकल्पनेचा काहीसा उलगडा करणे आवश्यक आहे. आधुनिक समाजात भोग्य वस्तू आणि सेवा यांचा पुरवठा सातत्याने चालू ठेवण्यासाठी काही यंत्रणा असतात–उद्योगधंदे, व्यापारी पेढ्या, शासनव्यवस्था, शाळा, विद्यापीठे इत्यादी. या यंत्रणांत वेगवेगळी स्थाने असतात आणि या स्थानांशी काही 'पारितोषिके'–आर्थिक उत्पन्न, अधिकार, मानसन्मान इ. –निगडित असतात. या पारितोषिकांत विषमता असते. उदा., कारखान्यात अभियंत्याला फिटरपेक्षा अधिक पगार आणि प्रतिष्ठा असते. आय.ए.एस. अधिकाऱ्याला चतुर्थश्रेणी कर्मचाऱ्यांपेक्षा अधिक पगार असतो इत्यादी. पारितोषिकांतील ही विषमता कितपत न्याय्य असते, तिचे समर्थन कसे करता येते किंवा येतेच का हा एक प्रश्न आहे. हा सध्या बाजूला ठेवू. (हा बाजूला ठेवता येईल; कारण आयोगाने त्याला हात घातलेला नाही आणि ते योग्यच आहे. त्यांनी फक्त ही स्थाने आणि त्यांना जोडलेली पारितोषिके प्राप्त करून घेण्यासाठी सर्वांना खरी समान संधी असली पाहिजे या तत्त्वावर भर दिला आहे आणि तेही योग्यच आहे.)

ह्या स्थानांच्या संबंधात मांडण्यात येणारे एक तत्त्व असे, की त्यांच्यावरील नेमणुका अर्हतेला अनुसरून झाल्या पाहिजेत. म्हणजे त्या त्या स्थानाशी संबंधित असलेले काम करण्यासाठी जी जास्तीत जास्त लायक माणसे उपलब्ध असतील त्यांची नेमणूक त्या स्थानांवर झाली पाहिजे. उदा., सैन्यात अधिकारी म्हणून समाधानकारपकणे काम करण्यासाठी माणसाच्या अंगी नेतृत्व, धाडस, काटकपणा, शिस्त, हत्यारे हाताळण्याचे कौशल्य इ. गुण असावे लागतात. एकेकाळी फक्त जमीनदार कुटुंबातील तरुणांना सैन्यात अधिकारी म्हणून नेमत असत. जमीनदाराचे कुळ असलेल्या कुटुंबातील तरुणांना सैन्यात अधिकारी म्हणून प्रवेश द्यायला मज्जाव असे. अशा एखाद्या कुटुंबातील तरुणाच्या अंगी इष्ट गुण खानदानी कुटुंबातील तरुणाच्या मानाने अधिक प्रमाणात असले असते, तरीही अधिकारी म्हणून त्याची नेमणूक झाली नसती. वरील तत्त्वानुसार हे अयोग्य आहे. करिअर शुड बी ओपन टु टॅलेन्ट. कोणत्याही स्थानावर नेमणूक करताना आवश्यक ते गुण व्यक्तीच्या अंगी आहेत की नाहीत एवढे काय ते पाहून नेमणूक केली पाहिजे आणि जिच्या अंगी हे गुण असतील, तिच्या नेमणुकीत इतर कारणांसाठी– म्हणजे तिच्या कुटुंबाचा सामाजिक दर्जा, तिचा धर्म, वंश, इ.–आडकाठी करता कामा नये. एखाद्या स्थानासाठी दोन माणसे उपलब्ध असली, तर त्यांतील ज्या माणसाच्या ठिकाणी इष्ट गुण अधिक प्रमाणात असतील त्याची नेमणूक केली पाहिजे. ह्याला अर्हतेचे तत्त्व म्हणू. अर्हता स्थानसापेक्ष असते. अर्हता म्हणजे त्या विशिष्ट स्थानाशी निगडित असलेले काम चांगल्या प्रकारे पार पाडण्यासाठी आवश्यक असलेले सर्व प्रकारचे गुण.

आता हे जे अर्हतेचे तत्त्व आहे– थोडक्यात कोणत्याही कामासाठी जास्तीत जास्त लायक असलेल्या माणसाची ते काम करण्यासाठी नेमणूक करावी हे तत्त्व–ते न्यायाचे तत्त्व नाही. ते उपयुक्ततेचे तत्त्व आहे. अधिक गुणी माणसाला अधिक पारितोषिक देणे योग्य आहे असा ह्या तत्त्वाचा आशय नाही. समजा, सामाजिक रचना अशी असली की सर्व स्थानांना समान पारितोषिके मिळतात–सर्वांचे पगार सारखे आहेत तरीही नेमणुका करताना अर्हतेच्या तत्त्वाला अनुसरून नेमणुका करणे योग्य ठरेल. एखाद्या स्थानी अधिक लायक माणूस उपलब्ध असताना कमी लायक माणसाची नेमणूक केल्याने अधिक लायक माणसावर अन्याय होणार नाही; कारण इतर कुठेही काम केले तरी त्याला तेच वेतन, तीच प्रतिष्ठा, तोच मानमरातब मिळणार आहे. पण त्याच्याऐवजी कमी लायक माणसाची त्या स्थानावर नेमणूक झाल्याने त्याने केले असते तितके चांगले काम ह्या दुसऱ्या माणसाकडून होणार नाही, म्हणजे समाजाला कमी भोग्य वस्तू आणि सेवा उपलब्ध












राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

असतील किंवा कमी प्रतीच्या वस्तू आणि सेवा उपलब्ध असतील आणि अशा रीतीने समाजाची हानी होईल. हे अर्हतेच्या तत्त्वाचे समर्थन आहे. हे तत्त्व विवेकानुसारी (रॅशनल) आहे याचे कारण उपलब्ध कच्च्या साधनसामग्रीतून जास्तीत जास्त उत्पातन होईल अशा रीतीने कामाचे संघटन करणे विवेकानुसारी आहे. अधिक लायक माणूस उपलब्ध असताना कमी लायक माणसाची कामावर नेमणूक करणे ह्या तत्त्वाशी विसंगत आहे आणि म्हणून असे करणे विवेकाशी विसंगत आहे.

अर्हतेचे तत्त्व हे न्यायाचे तत्त्व नाही. न्यायाचे तत्त्व हे इष्ट व अनिष्ट गोष्टींच्या रास्त (फेअर) वाटपाविषयीचे तत्त्व असते. इष्ट वस्तू म्हणजे उपभोग्य वस्तू, सेवा इत्यादी. अनिष्ट वस्तू म्हणजे कष्ट, कंटाळा, त्रास इत्यादी. आयोगाने घेतलेल्या मोहन आणि लल्लू यांच्या उदाहरणाकडे वळू या. हे दोघे आय. एस. च्या परीक्षेला बसले आहेत असे समजू या. आय. ए. एस. अधिकाऱ्यांची निवड करताना अर्हतेचे तत्त्व लावायचे तर पुढील दोन गोष्टी कराव्या लागतील. ह्या अधिकाऱ्यांना जी कामे करावी लागतात ती चांगल्या प्रकारे करण्यासाठी जे गुण आवश्यक असतील, त्यांची संपूर्ण यादी करावी लागेल. तसेच ह्या कामांच्या संदर्भात ह्या वेगवेगळ्या गुणांचे तौलनिक महत्त्व काय आहे. हेही ठरवावे लागेल. उदा., एका पातळीची बुद्धिमत्ता आणि संभाषणचातुर्य हे दोन्ही गुण आवश्यक असतील पण बुद्धिमत्तेपेक्षा संभाषणचातुर्य कमी महत्त्वाचे असेल तर बुद्धिमत्तेला आपण १० गुण (मार्क) देऊ तर संभाषणचातुर्याला २ गुण देऊ. (औषधे विकणारे फिरस्ते वैद्यकीय प्रतिनिधी घेतले तर त्यांच्या अर्हतेत संभाषणचातुर्याला तुलनेने अधिक महत्त्व असेल.) लल्लूच्या अंगी कणखर जिद्द, निर्धार इ. गुण मोहनपेक्षा जास्त असतील आणि हे गुण महत्त्वाचे आहेत, परीक्षेच्या निकालात हे गुण प्रतिबिंबित होत नसतात, लल्लूची अर्हता ठरविताना हे गुण पण लक्षात घेतले पाहिजेत असा युक्तिवाद आयोगाने केला आहे. आता हे गुण किंवा इतर कोणतेही गुण जर आय. ए. एस. अधिकाऱ्यांच्या कामाच्या संदर्भात प्रस्तुत असतील, तर त्यांचा ह्या विशिष्ट अर्हतेत समावेश केला पाहिजे आणि आज तो केला गेला नसेल व त्यांना योग्य तो भार (वेट) दिला गेला नसेल तर अर्हतेच्या तत्त्वाच्या दृष्टीनेच आज ह्या अधिकाऱ्यांची निवड करण्याची पद्धती सदोष आहे असा त्याचा अर्थ होईल. अर्हतेच्या तत्त्वाला अनुसरून अधिकाऱ्यांची निवड करायची तर ह्या विशिष्ट कामाशी प्रस्तुत असलेल्या अर्हतेत कोणकोणते गुण अंतर्भूत आहेत आणि त्यांचे तौलनिक महत्त्व काय आहे ह्याची बरीचशी निश्चित कल्पना बनविली पाहिजे आणि हे गुण मापून एखाद्या उमेदवाराच्या अंगी असलेल्या अर्हतेचे प्रमाण निश्चित करण्याची पद्धती ठरविली पाहिजे. परीक्षा, मुलाखत, मानसशास्त्रीय चाचण्या काय असेल ते. आयोगाने जो एक मुद्दा उपस्थित केला आहे तो असा, की जरी आज मोहनचे ज्ञान लल्लूच्या ज्ञानापेक्षा अधिक असले तरी लल्लूची अंगची बुद्धिमत्ता मोहनच्या अंगच्या बुद्धिमत्तेपेक्षा अधिक असेल. फक्त तिला प्रतिकूल परिस्थितीमुळे वाव मिळाला नसेल. आता आय. ए. एस. अधिकाऱ्याच्या विशिष्ट अर्हतेत जर अंगची बुद्धिमत्ता हा घटक असेल, तर ही अर्हता ठरविताना तिचे योग्य प्रकारे मापन झाले पाहिजे आणि जर प्रचलित परीक्षापद्धतीत कमावलेल्या ज्ञानाचे मापन होत असेल, अंगच्या बुद्धिमत्तेचे होत नसेल तर तिचेही मापन योग्य प्रकारे करण्याची व्यवस्था केली पाहिजे. पण कामाच्या दृष्टीने अंगच्या बुद्धिमत्तेपेक्षा कमावलेल्या ज्ञानाला अधिक महत्त्व किंवा कितीतरी अधिक महत्त्व असेल, तर अर्हतेचे मापन करताना अंगच्या बुद्धिमत्तेपेक्षा कमावलेल्या ज्ञानाला त्या प्रमाणात अधिक महत्त्व दिले पाहिजे. उदा., ट्रक ड्रायव्हर्सची निवड करताना आज ट्रक चालविण्याचे कौशल्य उमेदवारांच्या ठिकाणी किती आहे ह्याला, दृष्टी आणि हातापायांचे स्नायू यांच्यांत एकवाक्यता (कोऑर्डिनेशन) घडवून आणण्याची मूळची शक्ती किती आहे यापेक्षा अधिक महत्त्व असेल. उलट, ट्रक चालविण्याचे ट्रेनिंग देण्यासाठी जर उमेदवारांची निवड करायची असेल, तर ह्या मूळच्या कुवतीला अधिक महत्त्व असेल; कारण ती जास्त प्रमाणात अंगी असलेले उमेदवार ट्रेनिंगचा अधिक फायदा करून घेतील आणि ट्रक चालवायला अधिक चांगल्या प्रकारे शिकतील.

कामाच्या दृष्टीने अर्हता ठरली आणि तिच्या मापनाची पद्धती ठरली, की आज मोहन आणि लल्लू यांतून निवड करताना ती अर्हतेच्या निकषानुसार केली पाहिजे. लल्लूच्या ठिकाणी कमी अर्हता असली तर तो त्याचा दोष नव्हे, प्रतिकूल परिस्थितीचा दोष आहे हे मान्य करूनही मोहनच्या ऐवजी लल्लूची नेमणूक करणे गैर ठरेल, कारण त्यामुळे समाजाचे नुकसान होईल. आज उपलब्ध असलेल्या उमेदवारांच्या ठिकाणी जी वेगवेगळ्या पातळीची अर्हता आहे तिचे श्रेय त्यांना स्वतःला किती द्यावे, त्यांच्या अनुकूल परिस्थितीला किती द्यावे, ह्या अनुकूल-प्रतिकूल परिस्थितीला कोण किती जबाबदार आहे इ. गोष्टींचा निर्णय करायला आपण बसलेलो नाही, अर्हतेला अनुसरून निवड करायला आपण बसलेलो आहो. लल्लूची अर्हता कमी असली तरी तो त्याचा स्वतःचा दोष नव्हे, तेव्हा त्यामुळे त्याला शासन होता कामा नये आणि मोहनची अर्हता जास्त असली तरी तिचे श्रेय त्याच्या स्वतःपेक्षा त्याच्या अनुकूल परिस्थितीला दिले पाहिजे, तिचे त्याला बक्षीस देणेही चूक आहे, लल्लूऐवजी मोहनला निवडण्यात अन्याय आहे हा सर्व विचार अप्रस्तुत आहे. आपण कुणाला बक्षीस देत नाही किंवा कुणाला शिक्षा करीत नाही. काम जास्तीत जास्त चांगले व्हावे या उद्देशाने त्या विशिष्ट कामाला जास्तीत जास्त लायक असलेला उमेदवार आपण निवडीत आहोत. वर म्हटल्याप्रमाणे हे न्यायाचे तत्त्व नाही, हे कार्यक्षमतेचे, उपयुक्ततेचे तत्त्व आहे.

हे म्हटल्यानंतर लगेच इतरही काही गोष्टी म्हणणे आवश्यक आहे. अर्हतेचे तत्त्व हे विवेकानुसारी (रॅशनल) तत्त्व का आहे? कारण सर्व सामाजिक स्थानांवर त्याला अनुसरून नेमणुका झाल्या तर भोग्य वस्तू आणि सेवा यांचा समाजाला शक्य तितका अधिक पुरवठा होईल. ह्या तत्त्वाशी विसंगत पद्धतीने जर नेमणुका होत असल्या, तर हा पुरवठा कमी होईल आणि त्यामुळे समाजाचे नुकसान होईल. आता भोग्य वस्तू आणि सेवा यांचा शक्य तितका जास्त पुरवठा समाजाला व्हावा हे जसे एक योग्य साध्य आहे तशीच समाजाची इतरही साध्ये असतील. उदा., सामाजिक तणाव कमी करून समाजात अधिक सुसंवादी वातावरण निर्माण करणे हे एक महत्त्वाचे साध्य असेल किंवा सामाजिक न्याय अधिक प्रमाणात प्रस्थापित करणे हे वेगळे साध्य असेल, इत्यादी. अधिक लायक माणसे उपलब्ध असतानाही काही स्थानांवर काही प्रकारच्या कमी लायक माणसांची नेमणूक केल्याने ही इतर साध्ये सिद्ध होण्याला मदत होणार असेल तर तसे करण्याचा निर्णय योग्य ठरेल. उदा., मागासलेल्या वर्गात जर अशी भावना असेल की आपल्यातल्या कोणालाही वरची स्थाने लाभत नाहीत, आपण दुय्यम दर्जाचे नागरिक आहोत इ. तर ती सामाजिक सुसंवादाला विघातक ठरेल आणि ती दूर किंवा सौम्य करण्यासाठी त्यांच्यामधून आज उपलब्ध असलेली माणसे तुलनेने कमी लायक असली तरी त्यांची काही स्थानांवर नेमणूक करणे योग्य ठरेल. पण असे करण्याची आपण काही किंमत देत असतो. कोणत्याही स्थानावर अधिक लायक माणूस उपलब्ध असताना कमी लायक माणूस नेमण्याने कामाची जी हानी होत असते तिच्या स्वरूपात ही किंमत देत असतो. अर्थात दैवयोगाने प्राप्त झालेल्या गोष्टी सोडल्या तर कोणतीही इष्ट गोष्ट प्राप्त करून घेण्यासाठी आपल्याला किंमत मोजावीच लागते.

पण अर्हतेच्या तत्त्वाला मुरड किंवा मर्यादा घातल्याने आपण ही किंमत मोजत नाही अशी बतावणी करणे अयोग्य आहे. आणि ही किंमत कुणाला मोजावी लागते हा प्रश्नही सामाजिक न्यायाच्या दृष्टीने प्रस्तुत आहे. उदा., सार्वजनिक इस्पितळातून कमी लायक डॉक्टरांची नेमणूक झाली तर एऱ्हवी बरे झाले असते असे काही रोगी मरतील, काही बरे व्हायला अधिक वेळ लागेल, काही रोगी अपुरेपणे बरे होतील. जे उशीरा बरे होतील त्यांची काही दिवसांची कमाई बुडेल, जे अपुरेपणे बरे होतील त्यांची कमाई करण्याची शक्ती कमी होऊ शकेल. ही किंमत गरीब वर्गाला साक्षात भरावी लागेल. श्रीमंत लोक आवश्यक तितके पैसे देऊन लायक डॉक्टरांकडे जाऊ शकतात. कमी लायक शिक्षकांची जर आपण नेमणूक केली तर त्यांच्या विद्यार्थ्यांची एऱ्हवी झाली असती तेवढी प्रगती होणार नाही. भावी आयुष्यात कमाई करण्याची त्यांची कुवत कमी होईल, तसेच शास्त्र-

वाङ्मय यांचा आनंद घेण्याची त्यांची शक्तीही विकसित होणार नाही. तेव्हा हे विद्यार्थी ही किंमत साक्षात मोजतील आणि शिक्षणसंस्थांमधून कमी समर्थतेची माणसे बाहेर पडत असल्यामुळे जे उत्पादन कमी होईल त्याच्या रूपाने सर्वसाधारण समाजाला काही किंमत द्यावी लागेल. हा मुद्दा स्पष्टपणे ध्यानी घेणे आवश्यक आहे; कारण आरक्षणाचे समर्थन करणारे लोक या बाबतीत अनेकदा बेजबाबदार रीतीने बोलत असतात. जणू काही आरक्षणाची काही किंमत द्यावी लागत नाही अशा थाटात ते बोलत असतात. ही बेजबाबदार वृत्ती आयोगाच्या पुढील विधानांत आढळते. " अनुसूचित जाती आणि जमाती व इतर मागासवर्गीय उमेदवारांची आरक्षित पदांवर मोठ्या प्रमाणात भरती झाली तर शासकीय सेवांची गुणवत्ता खाली येईल ही आशंका एका मर्यादेपर्यंतच समर्थनीय आहे. पण अर्हतेच्या आधारे सर्व उमेदवार प्रामाणिक, कार्यक्षम, कष्टाळू आणि निष्ठावान निघतात असे म्हणता येते का ? सध्या शासकीय सेवांतील सर्वोच्च पदांवर खुल्या स्पर्धेतून निवडून आलेले उमेदवार प्रामुख्याने आहेत आणि आमच्या शासकवर्गाने दाखविलेले कर्तृत्व पाहिले तर त्यांनी गौरवास्पद कामगिरी बजाविली आहे असे म्हणणे कठीण आहे. अर्थात हे म्हणण्यात असे अभिप्रेत नाही, की आरक्षित जागांसाठी निवडलेले उमेदवार अधिक चांगले ठरतील. त्यांना सहन कराव्या लागलेल्या सामाजिक आणि सांस्कृतिक अडचणींमुळे ते थोडेबहुत कमी कर्तबगार ठरतील अशी शक्यता आहे. पण उलटपक्षी समाजाच्या मागासलेल्या वर्गांची दुःखे व समस्या ह्यांचे प्रत्यक्ष ज्ञान त्यांना असेल ही त्यांची मोठीच जमेची बाजू असेल. प्रत्यक्ष काम करणारे किंवा अत्युच्च पातळीवरून धोरण आखणारे ह्या दोघांच्याही दृष्टीने ही कमी महत्त्वाची पुंजी नव्हे. " ( पृ. ५७ ).

कमी अर्हतेच्या उमेदवारांची शासकीय सेवांत नेमणूक केल्याने प्रत्यक्षात फारसे काही बिघडत नाही असा सूर वरील परिच्छेदात आहे आणि तो बौद्धिक अप्रामाणिकपणा आणि त्याहीपेक्षा वाईट म्हणजे भोंगळपणा यांचा निदर्शक आहे. आज खुल्या स्पर्धेतून निवडून येणारे उमेदवार जर पुढे शासक म्हणून अयशस्वी ठरत असतील, तर निवडीच्या कसोट्या बदलल्या पाहिजेत. मागासलेल्या वर्गातील माणसांच्या वास्तव स्थितीचे ज्ञान हा शासकाला आवश्यक असलेल्या अर्हतेचा महत्त्वाचा भाग असेल तर त्याला ह्या कसोट्यांत योग्य ते स्थान दिले पाहिजे. ह्या सुधारित कसोट्यांना अनुसरून जे उमेदवार जास्तीत जास्त पात्र ठरतील, त्यांची नेमणूक झाली पाहिजे. जर अशा उमेदवारांतील काहींच्या ऐवजी काही कारणामुळे, अतिशय योग्य कारणामुळेही, कमी पात्र उमेदवारांची नेमणूक झाली तर सेवेची गुणवत्ता खाली येईल ही वस्तुस्थिती मान्य केली पाहिजे. ह्या इतर कारणांना आपण किती महत्त्व देतो हे किती प्रमाणात ही किंमत जाणीवपूर्वक द्यायला आपण तयार आहोत यावरून निश्चित होते.

अर्हतेचे तत्त्व हे न्यायाचे तत्त्व नव्हे, हे आपण पाहिले. पण समाजातील स्थानांवर नेमणुकांसाठी निवड करताना सामाजिक न्यायाचेही तत्त्व प्रस्तुत असते. ह्या स्थानांशी वेगवेगळी पारितोषिके– वेतन, अधिकार, प्रतिष्ठा, इ.– निगडित असतात. विशिष्ट स्थानावर नेमणूक झालेल्या माणसाला त्याच्याशी निगडित असलेले पारितोषिक लाभते. तेव्हा स्थानावर नेमणूक होणे हा पारितोषिक प्राप्त करून घेण्याचा अप्रत्यक्ष मार्ग असतो. कोणाची कोणत्या स्थानावर नेमणूक होते ह्यावरून कुणाला वेतन, अधिकार, इ. वस्तू किती मिळणार हे ठरते. म्हणजे ह्या नेमणुका म्हणजे इष्ट वस्तूंचे समाजातील व्यक्तींमध्ये वाटप करण्याची पद्धती ठरते व म्हणून ह्या नेमणुका कशा होतात ह्याच्याशी सामाजिक न्यायाचे तत्त्व संबंधित आहे.

वेगवेगळ्या स्थानांशी जी असमान पारितोषिके निगडित केलेली असतील– अभियंत्याला इतका पगार, फिटरला इतकाच पगार, इ.– ती न्यायाशी कितपत सुसंगत आहेत आणि त्यांचे समर्थन कसे करता येईल, हा प्रश्न आपण बाजूला सारलेला आहे. ही स्थाने आणि त्यांच्याशी निगडित असलेली विषम पारितोषिके यांची रचना गृहीत धरू या. अर्हतेच्या तत्त्वाला अनुसरून किंवा अर्हतेच्या तत्त्वाला सामाजिक एकात्मता, सुसंवाद, इ. साध्यांसाठी काही मर्यादा घालून आपण ह्या स्थानांसाठी जी निवड करू ती रास्तपणे (फेअर्ली) केली

अनुक्रमणिका

पाहिजे, निवड करण्याची पद्धती रास्त असली पाहिजे आणि तिचे रास्तपणे उपयोजन झाले पाहिजे. असे करण्यात सामाजिक न्याय आहे. ज्यांच्याशी कमी-अधिक पारितोषिके निगडित झालेली असतात ती ही स्थाने व्यक्तीच्या दृष्टीने कमी-अधिक इष्ट असतात आणि त्यांतील कोणत्याही स्थानासाठी निवडून येण्याचा प्रयत्न करण्याचा सर्व व्यक्तींना समान हक्क असला पाहिजे आणि समान संधी असली पाहिजे. वेगळ्या रीतीने ही गोष्ट मांडायची तर ह्या सर्व स्थानांसाठी पूर्णपणे खुली अशी स्पर्धा असली पाहिजे आणि तिच्यात भाग घेण्याची सर्व व्यक्तींना समान संधी असली पाहिजे. काही व्यक्तींना प्रथमपासूनच ह्या स्पर्धेतून वगळले असेल – धर्माच्या, वंशाच्या, जातीच्या इ. कारणांवरून–, तर ते समान संधीच्या तत्त्वाशी विरोधी व म्हणून अन्याय्य ठरेल. ( ते अर्हतेच्या तत्त्वाशीही विसंगत ठरेल कारण वगळलेल्यांत जी लायक माणसे असतील त्यांचा विचार निवडीच्या वेळी होणार नाही. निवडलेल्यापेक्षा अधिक लायक माणसे वगळलेल्यांत असण्याची नेहमीच शक्यता असेल. ह्या उपयुक्तता व न्याय या दोन्ही तत्त्वांचा एकच परिणाम होतो. )

आता, समान संधी ही खरीखुरी समान संधी असली पाहिजे. आधुनिक समाजात सर्वसाधारणपणे पाहता सामाजिक स्थानांशी संबंधित असलेली अर्हता प्राप्त करून घेण्यासाठी सर्वसामान्य शिक्षण आणि त्यावर आधारलेले प्रशिक्षण ( ट्रेनिंग ) घ्यावे लागते. उदा., ट्रकड्रायव्हर होण्यासाठी काही प्रशिक्षण घ्यावे लागते, रासायनिक अभियंता होण्यासाठी वेगळे शिक्षण व प्रशिक्षण घ्यावे लागते. तेव्हा स्थानांसाठी समान संधी असायची तर शिक्षणाची समान संधी सर्व व्यक्तींना असली पाहिजे. आता ही खरी असान संधी असली पाहिजे. माणूस किती व कसा शिकतो हे तीन गोष्टींवर अवलंबून राहील. एक, त्याची शिकण्याची शक्ती किंवा बुद्धिमत्ता; दोन, शिक्षणाच्या साधनांची उपलब्धता, शिक्षक, पुस्तके, इ; तीन, त्याची शिकण्याची इच्छा. बुद्धिमत्ता अंगभूत असते जसे मानू या. व्यक्तींना शिक्षणाची समान संधी द्यायची तर समर्थ शिक्षक, आवश्यक ती पुस्तके इ. साधने सर्वांना सारख्या प्रमाणात उपलब्ध करून दिली पाहिजेत. आज ही गोष्ट होते असे नाही. पण ते प्रयत्नाने साधता येईल. शिकण्याची इच्छा हा जो तिसरा घटक आहे तोही बऱ्याच प्रमाणात परिस्थितिजन्य असतो. सामाजिक दृष्ट्या मागासलेल्या वर्गांतील मुलांमुलींमध्ये, म्हणजे ज्यांच्यांत शिक्षणाची परंपरा नाही अशा कुटुंबांत जन्मलेल्या मुलांमुलींमध्ये शिकण्याची प्रवृत्ती अनेक कारणांमुळे क्षीण असते. ह्यामुळे त्यांनी शिक्षण अर्धवट सोडून दिले तर अंगी पुरेशी बुद्धिमत्ता असूनही व आवश्यक ती बाह्य साधने असूनही पुरेशा शिक्षणाच्या अभावी त्यांना पुढे अनेक स्थानांसाठी स्पर्धा करता येत नाही. म्हणजे प्रत्यक्षात त्यांना समान संधी लाभत नाही. ती त्यांना प्राप्त करून देण्यासाठी त्यांची शिकण्याची प्रवृत्ती बळकट केली पाहिजे. ती करण्याचा एक उपाय म्हणजे त्यांच्या एकंदर कष्टमय परिस्थितीतसुद्धा त्यांनी अमूक टप्प्यापर्यंतचे शिक्षण पूर्ण केले तर त्या शिक्षणाने प्राप्त होणाऱ्या अर्हतेशी संबंधित असलेली काही स्थाने त्यांना मिळतील अशी हमी त्यांना देणे. म्हणजे तितकी स्थाने खुल्या स्पर्धेतून वगळून मागासवर्गीयांसाठी आरक्षित ठेवणे. ह्या उपायाचा एक भाग म्हणून ह्या टप्प्यानंतरच्या वरच्या शिक्षणक्रमामध्ये, ज्याच्यात स्पर्धेत यशस्वी झाल्याने प्रवेश मिळतो त्याच्यात, मागासवर्गीयांसाठी काही जागा आरक्षित ठेवणे.

आरक्षणाचा हा उपाय म्हणजे उपयुक्ततेच्या, अर्हतेच्या तत्त्वावर घातलेली मर्यादा आहे. पण अर्हतेचेच तत्त्व न्यायाला धरून लावायचे तर विषम सांस्कृतिक परिस्थिती असलेल्या समाजात ही मर्यादा घालणे आवश्यक आहे. जर समाजातील सर्व कुटुंबे सर्वसाधारणपणे समान सांस्कृतिक पातळीवर असतील तर ही मर्यादा घालण्याचे कारण नव्हते. लक्षात घेण्यासारखी गोष्ट अशी की मागासवर्गीयांसाठी उच्च शिक्षणक्रमात आणि सामाजिक स्थानांत काही जागा आरक्षित करण्याच्या आणि त्यायोगे मागासवर्गीयांच्या शिक्षणाची इच्छा तीव्र करण्याच्या उपायाचा अवलंब म्हणजे समान संधी अधिक प्रमाणात निर्माण करण्यासाठी करण्यात येणाऱ्या वाटचालीचा एक भाग आहे. ही वाटचाल आपण किती जलद गतीने करणार आणि त्यासाठी किती किंमत देणार हे सारासार विचाराने ठरवायचे आहे.



अनुक्रमणिका

एक एकान्तिक भूमिका अशी राहील, की समान संधी प्रस्थापित करण्याच्या प्रयत्नांना आपण अग्रक्रम देणार आणि त्याचा भाग म्हणून सर्व स्थाने आणि उच्च शिक्षणक्रमातील जागा मागासवर्गीयांसाठी आरक्षित करणार. आणि त्यामुळे अकार्यक्षमतेतून उद्‌भवणारी सर्व हानी सहन करणार. दुसऱ्या टोकाची भूमिका अशी, की भारतासारख्या ज्याच्यात बहुसंख्य लोक दरिद्री आहेत अशा देशात कार्यक्षमता वाढविणे, त्यातून उत्पादन वाढविणे आणि यासाठी आज उपलब्ध असलेले विज्ञान व तंत्रज्ञान आत्मसात करणे, त्याचे उपयोजन करण्याची कुवत वाढविणे, नवीन तंत्रज्ञान सिद्ध करण्याचे सामर्थ्य वाढविणे ह्या कार्यक्रमाला अग्रस्थान दिले पाहिजे. यासाठी शिक्षणाच्या संधीचा लाभ जे जास्तीत जास्त उठवू शकतील त्यांनाच शिक्षण दिले पाहिजे आणि त्यातून जी शिक्षित माणसे उपलब्ध होतील त्यांतील सर्वांत लायक माणसांना त्या त्या स्थानावर नेमले पाहिजे. यातून जे उत्पादन वाढेल त्याचा फायदा अर्थात मागासलेल्या वर्गांना दिला पाहिजे. त्यांची आर्थिक स्थिती जशी सुधारत जाईल तशी शिक्षणापासून मिळणाऱ्या संधीचा लाभ उठवण्याची त्यांची कुवतही वाढत जाईल आणि सामाजिक न्यायाच्या दिशेने वाटचाल सुरू होईल.

आजची सामाजिक व्यवस्था अन्यायाची आहे हे दुसऱ्या भूमिकेचे समर्थकही मान्य करतील. तेव्हा न्यायावर आधारलेल्या समाजव्यवस्थेच्या दिशेने सध्याच्या समाजव्यवस्थेत परिवर्तन घडवून आणणे आपल्यावर बंधनकारक आहे ही सर्वसंमत गोष्ट आहे. असे परिवर्तन घडवून आणण्याच्या कार्यक्रमाचा एक भाग म्हणून खऱ्या समान संधीच्या व्याप्तीमध्ये समाजाचे अधिकाधिक विभाग आणण्याचा कार्यक्रम हाती घ्यावा लागेल, हेही उघड आहे. पण दुसऱ्या पक्षाचे म्हणणे असे आहे : आपली परिस्थिती अतिशय भीषण आहे, हा कार्यक्रम अर्थपूर्ण रीतीने हाती घेण्यासाठी, सामाजिक परिवर्तनाचा भाग म्हणून हाती घेण्यासाठी, एकंदर समाजाची जेवढी सुस्थिती असावी लागेल ती अवस्थाही आपल्यापासून दूर आहे आणि ती आपल्याला प्रथम गाठावी लागेल. ह्या अवस्थेचे थोडक्यात वर्णन असे करता येईल, की तिच्यात समाजाच्या गरिबांतल्या गरीब थरातील कुटुंबांचे उत्पन्नही शिकण्याच्या वयाच्या मुलामुलींना कामाला न लावता कुटुंबाचा चरितार्थ चालविण्यासाठी पुरेसे असेल. ही मजल गाठीपर्यंत समाजातील सर्व थरांना समान संधी देण्यासाठी त्यांना शैक्षणिक-सांस्कृतिक क्षेत्रात प्रवेश देण्याचा प्रयत्न करण्याच्या गोष्टी कल्पनाजालासारख्या आहेत. आज आपण असे जे प्रयत्न करू, ते फार तर प्रतीकात्मक असतील. म्हणजे त्यांच्यामुळे मागासलेल्या वर्गांतील बहुसंख्य लोकांची स्थिती सुधारणार नाही किंवा त्यांना समान संधी अधिक प्रमाणात लाभत आहे असे घडणार नाही. तेव्हा उत्पादन तातडीने जास्तीत जास्त वाढवून त्याचा लाभ गरिबांतल्या गरीब थरापर्यंत मिळेल अशी व्यवस्था केली पाहिजे. ह्यासाठी जास्तीत जास्त लायक माणसांना सर्व स्थानांवर नेमले पाहिजे. ह्या तत्त्वाशी आपण तडजोड केली तर ह्या कार्यक्रमात व्यत्यय येईल आणि न्याय्य समाजव्यवस्था प्रस्थापित करण्याचे ध्येय लांबणीवर पडेल.

अनेकजण स्पष्टपणे ही भूमिका मांडताना आढळतात आणि अनेकजण करीत असलेल्या युक्तिवादात ही भूमिका, अध्याहृत असते, तेव्हा तिचा थोडक्यात परामर्श घेणे आवश्यक आहे. ह्या संदर्भातील एक महत्त्वाचा प्रश्न असा, की आज भारतात वेगवेगळ्या स्थानांशी जी पारितोषिके निगडित आहेत त्यांच्यामध्ये असलेल्या प्रचंड तफावतीचे समर्थन कसे करता येईल ? वेगवेगळ्या स्थानांशी जोडलेली पारितोषिके एकंदरीत न्याय्य आहेत का ? ह्याचे उत्तर संक्षेपाने द्यायचे तर असे द्यावे लागेल, की ही पारितोषिके न्यायाच्या तत्त्वाने ठरत नाहीत, ती उपयुक्ततेच्या तत्त्वाने ठरतात. म्हणजे असे, की जी कौशल्ये व ज्ञान सामाजिक उत्पादनाच्या दृष्टीने अधिक महत्त्वाचे असून ते प्राप्त करून घेण्यासाठी अधिक मेहनत घ्यावी लागते आणि तुलनेने अधिक विरळा अशी बुद्धिमत्ता व इतर गुण अंगी असावे लागतात, त्यांच्याशी अधिक मोठे पारितोषिक निगडित केलेले असते. कारण नाहीतर ही कौशल्ये प्राप्त करून घेण्यासाठी आपल्या अंगच्या गुणांचा वापर करून आवश्यक ती मेहनत करण्याला माणसे उद्युक्त

होणार नाहीत. स्थाने आणि त्यांना जोडलेली पारितोषिके ही रचना न्यायाच्या तत्त्वावर आधारलेली नसते. ती वर मांडलेल्या विचारावर आधारलेली असते. पण एकदा ती रचना सिद्ध झाल्यावर तिच्यातील स्थानावर नेमणुका करण्यात न्याय किंवा अन्याय आढळून येतात. आता अशी विषम रचना आपण तिच्या उपयुक्ततेसाठी म्हणून, तिच्यामुळे एऱ्हवी वाढले असते त्यापेक्षा उत्पादन अधिक वाढते म्हणून, स्वीकारली तर तिच्यापासून निष्पन्न होणाऱ्या दोन परिणामांविषयी जागरुक राहावे लागते. एक परिणाम असा की शैक्षणिक-सांस्कृतिक प्रगती, संपत्ती आणि अधिकार ज्यांच्याकडे कितीतरी अधिक प्रमाणात आहे अशा कुटुंबांचा एक वर्ग तयार होतो. आपली ह्या गोष्टींची मक्तेदारी सोडून द्यायला हा वर्ग तयार होत नाही. ज्यांच्याशी अल्प पारितोषिके निगडित असतात अशी स्थाने व्यापणाऱ्या खालच्या वर्गातील व्यक्तींना ह्या परिस्थितीत खरीखुरी समान संधी मिळू शकत नाही. तसेच या रचनेमुळे उत्पादन वाढले तरी जी अधिक संपत्ती निर्माण होते तिच्यात वरच्या वर्गालाच तुलनेने अधिक हिस्सा मिळतो. कारण त्यांच्या पारितोषिकांचे प्रमाणही वाढवावे लागते. ह्या दोन्ही प्रवृत्तींना आळा घालण्यासाठी, खालच्या वर्गातील व्यक्तींना वरिष्ठ स्थाने मोकळी ठेवण्यासाठी आणि वाढत्या संपत्तीत गरीब वर्गाला अधिक हिस्सा देण्यासाठी जाणीवपूर्वक प्रयत्न करावे लागतात.

अधिक कार्यक्षम माणसे योग्य ती पारितोषिके घेऊन महत्त्वाच्या स्थानांशी निगडित असलेली कामे चांगल्या प्रकारे पार पाडतात आणि त्यातून वाढलेल्या संपत्तीचा लाभ गरिबांना मिळतो व त्यांची स्थिती सुधारत जाते, ते बौद्धिक संस्कृतीच्या क्षेत्रात प्रवेश करतात आणि हळूहळू समाजात संधीची समानता, म्हणजे न्याय, वाढत जातो हे सारे सुरळितपणे घडत नाही. इतिहासाच्या ओघातून संस्कृती आणि संपत्ती यांची मक्तेदारी असलेला एक वर्ग आणि बौद्धिक संस्कृतीबाहेर आणि गरीब असलेला वर्ग यांच्यांत एक सुप्त संघर्ष असतो आणि गरीब वर्ग जेव्हा जागृत होतो, आपल्यातील माणसांना संधीची खरीखुरी समानता लाभत नाही हे जेव्हा त्याच्या ध्यानी येते आणि ही व्यवस्था स्वीकारण्याचे जेव्हा तो नाकारतो तेव्हा हा संघर्ष प्रखर होतो आणि प्रकट होतो. ही सर्वसामान्य परिस्थिती झाली. भारताच्या विशिष्ट परिस्थितीत खालचे सामाजिक विभाग म्हणजे खालच्या जाती होत आणि संस्कृती व संपत्ती यांचा मक्ता असलेले विभाग म्हणजे वरच्या जाती होत. वरच्या आणि खालच्या जातींमधील संघर्ष आज भारतात प्रकट स्वरूपात आहे; पेटलेला आहे.

खालच्या जातीत निर्माण झालेली ही ईर्ष्या न्यायाधिष्ठित समाजव्यवस्था निर्माण करण्यासाठी आवश्यक असलेल्या परिवर्तनाच्या प्रक्रियेमागील एक जबरदस्त प्रेरणा आहे. या परिस्थितीत अगदी तात्पुरता आणि केवळ डावपेचापुरता विचार जरी केला तर उत्पादनव्यवस्था सुरळीतपणे चालू ठेवण्यासाठी मागासलेल्या जातींचे जे सर्वांत पात्र असे प्रतिनिधी उपलब्ध असतील त्यांतील कित्येकांना, योग्य त्या प्रमाणात, शैक्षणिक–सांस्कृतिक क्षेत्रांत आणि उच्च सामाजिक स्थानांत प्रविष्ट करून घेणे आवश्यक झाले आहे. म्हणजे शैक्षणिक क्षेत्रात आणि सामाजिक स्थानांत योग्य ठरेल अशा प्रमाणात त्यांच्यासाठी आरक्षित जागा ठेवणे आवश्यक झाले आहे. उपयुक्तता आणि न्याय ह्या दोन्ही तत्त्वांच्या दृष्टीने हे योग्य असल्याचे दिसून येते. ही अर्थात अर्हतेच्या तत्त्वाशी केलेली तडजोड आहे. ही तडजोड नेमकी कुठे करावी, अर्हतेच्या तत्त्वाला कुठे मर्यादा घालावी हे कोणत्याही तत्त्वाच्या आधारे निश्चित करता येणार नाही; ते व्यवहारबुद्धीने ठरवावे लागते. पण आपण पाहिल्याप्रमाणे अर्हतेचे तत्त्व उपयुक्ततावादी आहे. त्या तत्त्वाला अनुसरून व्यवहार केला तर उत्पादन जास्तीत जास्त वाढविता येते यावर त्याचे प्रामाण्य आधारलेले आहे. तेव्हा सामाजिक तणावामुळे उत्पादनप्रक्रियाच कुंठित होईल अशी परिस्थिती निर्माण होणार असेल तर अर्हतेच्या तत्त्वाला मर्यादा घालून जे जास्तीत जास्त उत्पादन शक्य असेल ते साधणे उपयुक्ततावादाला धरून आहे. सामाजिक न्यायाच्या दृष्टीने पाहिले तर आरक्षणाची व्यवस्था प्रतीकात्मक ठरते. संधीची खरीखुरी समानता निर्माण करण्याच्या दिशेने सामाजिक परिवर्तन करायची आपली तयारी आहे असे









अनुक्रमणिका

आश्वासन वरिष्ठ वर्गाकडून कनिष्ठ वर्गाला आश्वासनाच्या स्वरूपात मिळते. आरक्षणाच्या मार्गाने याहून अधिक काय साधले जाते, संधीची समानता समाजात प्रत्यक्षात किती वाढते हे समजून घेतले पाहिजे.

हे समजून घेण्याचे एक साधन आपल्यापाशी आहे. दलित जाती आणि जमातींसाठी शैक्षणिक आणि शासकीय सेवांच्या क्षेत्रांत आरक्षण करण्याची घटनात्मक तरतूद आहे. गेली तीस वर्षे चाललेल्या या प्रयोगातून काय हाती लागले ? एक तर हा प्रयोग किती प्रामाणिकपणे, सरळपणे राबविण्यात आला ? आरक्षणाचा प्रत्यक्ष लाभ ज्या कुटुंबांना लाभला ती शैक्षणिक आणि सांपत्तिक भेदरेषेच्या वर आली असणार. पण ह्या त्यांच्या उदाहरणापासून या थरातील इतर किती कुटुंबांनी स्फूर्ती घेतली ? मागासलेपणातून एक विशिष्ट मनोवृत्ती तयार झालेली असते. मागासलेल्यांचा आत्मविश्वास, त्यांच्या आकांक्षाच मरगळलेल्या असतात. आपल्यातील काहीजण त्यांना काही साहाय्य मिळाले आणि संधी मिळाली तर वरची पातळी गाठू शकतात ह्या अनुभवातून इतर कितीजण सामाजिक प्रगती करण्यासाठी आवश्यक तो प्रयत्न करू लागले ? ह्याचे एक गमक आरक्षित स्थानांशिवाय इतर किती स्थाने शिक्षित दलितांनी व्यापली यापासून लाभू शकेल. दुसरा संबंधित प्रश्न असा, की दलितांमध्येही जातिभेद असतो आणि कमीअधिक दुःस्थितीत असलेले सामाजिक थर असतात. दलितांना साहाय्य करण्यासाठी ज्या तरतुदी करण्यात येतात, त्यांचा लाभ घेण्याची प्रारंभिक कुवतही त्या समाजाच्या लहानशा थरात आणि एका विभागात आढळते. तेवढयाच थरातील आणि विभागातील व्यक्ती वर सरकतात आणि इतर विभाग आणि जाती जागच्या जागीच राहतात. ह्यातून दलितांतर्गत सामाजिक तणाव वाढतात. यावरील खरा उपाय जागृतीचे, अस्मितेचे, ईर्ष्येचे लोण सर्व थरांपर्यंत पोचविणे आणि विशेषतः दलितांमधील प्रगत थराने इतर थरांना साहाय्य करण्यात पुढाकार घेणे हाच होय. ही जाणीव महाराष्ट्रातील प्रगत दलित थरात, निदान त्याच्या तरुण नेतृत्वात वाढू लागली आहे ही समाधानाची गोष्ट आहे. दलितांसाठी आरक्षणाचा जो प्रयोग सुरू आहे, त्याच्या यशापयशाचे वस्तुनिष्ठ मूल्यमापन होणे आवश्यक आहे. मंडल आयोगाने पुरुषसूक्त आणि मनुस्मृती यांचा मध्यस्थामार्फत अभ्यास करण्याऐवजी हे मूल्यमापन करण्याचा प्रयत्न केला असता, तर ते अधिक उपयुक्त झाले असते.



या पार्श्वभूमीवर भारतीय समाजात किमान सामाजिक सुसंवाद टिकवून धरण्यासाठी विशेष मागासलेल्या जातींना, जातींच्या पायावर, उच्च शिक्षणक्रम आणि शासकीय सेवा यांच्यांत काही प्रमाणात आरक्षण देण्याला आज पर्याय नाही, हे स्पष्ट होते. हे आरक्षण जातीच्या पायावर देणे आवश्यक आहे; कारण मागासलेल्या जातींचे जाती म्हणून, ऐतिहासिक गाऱ्हाणे आहे आणि आरक्षणाचे एक महत्त्वाचे कार्य मागासलेल्या थरांना प्रगत थरांच्या वतीने, आम्ही समाजाच्या सर्वच थरांना आणि म्हणून तुम्हालाही खऱ्याखुऱ्या समान संधीच्या व्याप्तीत सामावून घ्यायला वचनबद्ध आहो असे आश्वासन देणे हे असेल, तर हे आश्वासन मागासलेल्या जातींना जाती म्हणून दिले पाहिजे. मंडल आयोगाने विशेष मागासलेल्या जाती ओळखण्याचे जे निकष दिले आहेत त्यांच्या बाबतीत फारतर तपशीलाच्या संबंधात दुमत होऊ शकेल. हे निकष असे आहेत :

अ) सामाजिक :

१. इतरांनी सामाजिक दृष्टया मागासलेल्या मानलेल्या जाती/वर्ग.

२. प्रामुख्याने शारीरिक श्रमांवर जगणाऱ्या जाती/वर्ग.

३. ज्या जातीत/वर्गात ग्रामीण विभागात राज्याच्या सरासरीपेक्षा निदान २५ टक्के अधिक स्त्रिया व १० टक्के अधिक पुरुष १७ वयापूर्वी लग्न करतात आणि शहरी विभागात १० टक्के अधिक स्त्रिया व ५ टक्के अधिक पुरुष अशी लग्ने करतात.

४. ज्या जातीत/वर्गात राज्याच्या सरासरीपेक्षा २५ टक्के अधिक स्त्रिया पोटासाठी श्रम करतात.

ब) शैक्षणिक :

१. ज्या जातीत/वर्गात राज्याच्या सरासरीपेक्षा ५–१५ वयोगटातील शाळेत प्रवेश न घेतलेली मुले निदान २५ टक्क्यांनी अधिक आहेत.

अनुक्रमणिका

२. ज्या जातीत/वर्गात राज्याच्या सरासरी-पेक्षा ५–१५ वयोगटातील शाळेतून गळलेली मुले २५ टक्क्यांनी अधिक आहेत.

३. ज्या जातीत/वर्गात मॅट्रिक झालेल्यांचे प्रमाण राज्याच्या सरासरीपेक्षा निदान २५ टक्क्यांनी कमी आहे.

क) आर्थिक :

१. ज्या जातीत/वर्गात कुटुंबाची सरासरी मालमत्ता राज्याच्या सरासरीपेक्षा निदान २५ टक्क्यांनी कमी आहे.

२. ज्या जातीत/वर्गात कच्च्या घरात राहणाऱ्या कुटुंबांची संख्या राज्याच्या सरासरीपेक्षा निदान २५ टक्क्यांनी अधिक आहे.

३. ज्या जातीत/वर्गात प्यायचे पाणी भरण्याचे ठिकाण निदान ५० टक्के कुटुंबांना अर्धा किलोमीटर-पेक्षा दूर आहे.

४. ज्या जातीत/वर्गात उदरनिर्वाह चालविण्या-साठी कर्ज काढलेल्या कुटुंबांचे प्रमाण राज्याच्या सरासरीपेक्षा २५ टक्क्यांनी अधिक आहे.

ह्या निकषांना आक्षेप घेता येईल, असे वाटत नाही. आपला प्रश्न मागासलेल्या जातींना कसे निवडावे हा नाहीच. तर बहुसंख्य असलेल्या मागास-लेल्यांतून कुणाकुणाला वगळले असता जे विशेष मागासलेले आहेत ते दृष्टोत्पत्तीस येतील असा प्रश्न आहे. आयोगाने समाजशास्त्रज्ञांचे साहाय्य घेऊन जे वर दिलेले निकष मुक्रर केले आहेत ते सर्वमान्य होण्यासारखे आहेत.

ह्या निकषांना अनुसरून भारतातील मागास-वर्गीयांची संख्या एकंदर लोकसंख्येच्या प्रमाणात ५२ टक्के आहे, असा आयोगाचा अंदाज आहे. कलम १५(४) आणि कलम १६(४) ह्यांमध्ये मागास-वर्गीयांसाठी शासकीय सेवेतील जागा राखून ठेव-ण्याची जी तरतूद आहे तिला अनुसरून राखीव म्हणून ठरविलेल्या जागा ५० टक्क्यांहून अधिक असता कामा नयेत असा वरिष्ठ न्यायालयाचा निर्णय आहे. तो ध्यानात घेऊन आयोगाने वरील मागास-वर्गीयांसाठी २७ टक्के जागा राखून ठेवाव्या अशी शिफारस केली आहे. कारण अनुसूचित जातिजमातीं-साठी २२.५ टक्के जागा अगोदरच आरक्षित आहेत.

ह्या जागा केंद्रीय सरकार, राज्य सरकारे, सार्व-जनिक उद्योग, राष्ट्रीयीकृत बँका, सरकारकडून ज्यांना आर्थिक साहाय्य मिळते असे खाजगी उद्योग, विद्यापीठे व महाविद्यालये यांच्या सेवांमध्ये आर-क्षित करायच्या आहेत. अधिकाऱ्यांना पदोन्नती देतानाही आरक्षणाचे हे प्रमाण पाळले जावे अशी आयोगाची शिफारस आहे. तसेच केंद्र व राज्य सरकारांनी चालविलेल्या वैज्ञानिक, तांत्रिक आणि व्यावसायिक शिक्षणसंस्थांमध्येही २२.५ टक्के जागा इतर मागासवर्गीयांसाठी राखीव असाव्यात, अशी शिफारस आयोगाने केली आहे.

उच्चवर्गीयांना ह्या शिफारसी रुचण्यासारख्या नाहीत, हे उघड आहे. मागासवर्गीयांच्या वतीने बोलणारेही आम्ही लोकसंख्येच्या इतके टक्के आहोत तेव्हा समतेच्या तत्त्वाला अनुसरून शासकीय सेवां-मध्ये त्या प्रमाणात जागा मिळण्याचा हक्क आहे अशी भाषा बोलताना आढळतात. हे बोलणे चूक आहे आणि गैरही आहे. हे इतके साधे व सरळ गणित नाही. ज्या समतेला अनुसरून सर्व सामाजिक व्यवहारांची पुनर्रचना करायची आहे, ती व्यक्तीं-मधील समता आहे, जातींमधील समता आहे, आणि शिवाय संधीची व वागणुकीची समता आहे, परि-णामांची समता नव्हे हे आपण पाहिलेच आहे. पण त्यांचे गणित चुकले असले तरी उत्तर बरोबर आहे. उच्चवर्गीयांनी मंडल आयोगाने शिफारस केलेली आरक्षणाची तजवीज स्वागतशील वृत्तीने स्वीका-रावी; स्वतःच्या हितासाठी आणि राष्ट्राच्या हिता-साठीही. आजची विषम व्यवस्था, खालच्या जाती जागृत झाल्यानंतर, फार काळ टिकू शकणार नाही. आपल्यावर झालेल्या ऐतिहासिक अन्यायाचे परि-मार्जन करायला उच्च जाती आजही तयार नाहीत अशी खालच्या जातींची भावना झाली तर सामा-जिक अंदाधुंदीच माजेल आणि तिचा फायदा सर्व जातींचे कावेबाज आणि कोडगे पुढारी काय ते घेऊ शकतील. पण देशात काही उभारता येणार नाही. आम्हाला आमचे टुमदार संसारही सुरक्षित-पणे बांधता येणार नाहीत. अमेरिकेत पळून जायलाही काही मर्यादा आहेत. उलट, उच्च जातींनी बंधु-भावाचा हात पुढे केला आहे असे मागासवर्गीयांना दिसून आले तर सामाजिक वातावरणात क्रांति-

अनुक्रमणिका







कारक बदल घडून येईल, एकतेची भावना समाजात उफाळून येईल, विधायक चैतन्याचा स्पर्श समाजाच्या सर्व थरांना होईल. राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या चळवळीत ह्या भावनेचा काहीसा अनुभव आपण घेतला होता. राष्ट्रबांधणीच्या ह्या अत्यंत बिकट पर्वात तीच भावना राष्ट्राची तारक होऊ शकेल. उच्चवर्गीय आपल्या ऐतिहासिक विशेषाधिकारांचे विसर्जन करायला तयार आहेत, ज्ञानाच्या आणि संस्कृतीच्या क्षेत्रांत समाजाच्या सर्व थरांना सामावून घेण्यात पुढाकार घेत आहेत असा अनुभव बहुजनसमाजाला आला तरच ही भावना निर्माण होऊ शकेल. नाहीतर सामाजिक कलह अटळ आहे आणि त्याची किंमत सर्वांनाच द्यावी लागेल. सामाजिक जीवनाचे वाढते पाशवीकरण हा ह्या किंमतीचा एक भाग असेल. उच्च जातींना तो परवडण्यासारखा नाही.

सबंध समाजात संधीची समता प्रस्थापित करण्याच्या ध्येयाच्या संदर्भात आरक्षणाची तजवीज ही केवल प्रतीकात्मक कृती आहे आणि काही काळ तरी तिचा परिणाम जातीय भावना दृढ होण्यात होणार आहे हेही आपण पाहिले आहे. सामाजिक समतेसाठी, मागासलेल्यांना इतरांबरोबर एका पातळीवर आणण्यासाठी सामाजिक–आर्थिक परिवर्तनाचा एक व्यापक कार्यक्रम हाती घ्यावा लागेल. काही मामुली आणि अस्पष्ट सूचना करण्यापलीकडे मंडल आयोगाने ह्या गोष्टीचा विचार केला नाही, ही खेदाची गोष्ट आहे. विज्ञान व तंत्रज्ञान, तसेच आधुनिक व्यवस्थापकीय आणि शासकीय कार्यपद्धती यांच्यावर आधारलेले सामाजिक व्यवहार जसजसे समाजजीवनाचे अधिकाधिक क्षेत्र व्यापू लागतील, तसतशी जातीची भावनाही क्षीण होत जाईल; कारण सामाजिक जीवनातील तिचा आधारच संकुचित झालेला असेल. पण हजारो वर्षांचा ऐतिहासिक वारसा विलक्षण चिवट असू शकतो. म्हणून जातीय भावनेचे निर्मूलन करण्यासाठी व्यक्तीची स्वायत्तता, तिची समान प्रतिष्ठा इ. मूल्यांचा जाणीवपूर्वक प्रसारही समाजात करावा लागेल. ह्या सर्व कार्यक्रमात उच्च जातीयांचा मनापासून आणि मोठ्या प्रमाणात सहभाग असण्यावर पुढील काही दशकांतील सामाजिक स्वास्थ्य अवलंबून राहील.

## टीपा :

१. कलम ३४० असे आहे : मागासलेल्या वर्गांच्या परिस्थितीविषयी चौकशी करण्यासाठी आयोगाची नेमणूक :

(१) भारताच्या प्रदेशातील सामाजिक आणि शैक्षणिक दृष्टया मागासलेल्या वर्गांच्या परिस्थितीची आणि ज्या अडचणींचा त्यांना त्रास होत असेल त्यांची चौकशी करण्यासाठी आणि ह्या अडचणी दूर करण्यासाठी आणि त्यांची स्थिती सुधारण्यासाठी संघराज्याने किंवा कोणत्याही राज्याने जे उपाय योजावेत त्यांची, तसेच ह्या उद्देशासाठी संघराज्याने किंवा कोणत्याही राज्याने जी अनुदाने द्यावी आणि ज्या अटींवर ही अनुदाने द्यावी याविषयी शिफारशी करण्यासाठी राष्ट्रपती आपल्या आदेशान्वये आपल्याला योग्य वाटतील अशा व्यक्ती ज्याचे सदस्य आहेत असा आयोग नेमू शकतात.

(२) अशा रीतीने नेमण्यात आलेल्या आयोगाने ज्या बाबी त्याच्याकडे सोपविण्यात आल्या असतील त्यांच्यासंबंधी चौकशी करील आणि आपल्याला वस्तुस्थिती जशी असल्याचे आढळून आले असेल तशी ती मांडणारा आणि आपल्याला योग्य वाटतील अशा शिफारशी करणारा अहवाल राष्ट्रपतींना सादर केला पाहिजे.

(३) अशा रीतीने सादर करण्यात आलेला अहवाल, त्यावर करण्यात आलेल्या कृतीचे स्पष्टीकरण देणाऱ्या टिपणासमवेत, संसदेच्या प्रत्येक गृहासमोर ठेवला जाईल अशी तजवीज राष्ट्रपतींनी केली पाहिजे.

अनुक्रमणिका

श्री. मंडल यांच्या मते सप्रेस्ड, डिप्रेस्ड आणि ऑप्रेस्ड यांच्यावरील ज्यांची निष्ठा स्पष्ट आहे त्या श्रीमती इंदिरा गांधी यांच्या सरकारने वरील (३) ला अनुसरून कार्यवाही केलेली नाही.

२. कलम १५ व १६ अशी आहेत :

कलम १५ : धर्म वंश, जात, लिंग आणि जन्मस्थान यांच्या आधारे भेदाभेद करण्याला बंदी :

(१) केवळ धर्म, वंश, जात, लिंग, जन्मस्थान यांच्या किंवा यांपैकी कोणत्याही आधारे कोणत्याही नागरिकाविरुद्ध राज्याने भेदाभेद करता कामा नये.

(२) केवळ धर्म, वंश, जात, लिंग किंवा जन्मस्थान यांच्या आधारे किंवा त्यांच्यापैकी कशाच्याही आधारे कोणत्याही नागरिकावर कोणतीही असमर्थता किंवा बोजा किंवा बंधन किंवा पुढील बाबतीत कोणतीही विशेष अट लादली जाता कामा नये.

(अ) दुकाने, सार्वजनिक उपाहारगृहे, हॉटेले किंवा करमणुकीची सार्वजनिक स्थाने यांत प्रवेश;

(ब) राज्याच्या पैशाने किंवा सार्वजनिक उपयोगासाठी म्हणून बांधण्यात आलेल्या विहिरी, तळी, रस्ते किंवा सार्वजनिक वासस्थानें यांचा उपयोग.

(३) स्त्रिया आणि मुले यांच्यासाठी राज्याने विशेष तजवीज करण्याविरुद्ध जाईल असे काहीही या कलमाच्या आशयात समाविष्ट नाही.

(४) ह्या कलमाच्या, तसेच कलम २९ च्या (२) पोटकलमच्या आशयात, सामाजिक व आर्थिक दृष्टया मागासलेल्या अशा नागरिकांच्या कोणत्याही वर्गासाठी किंवा अनुसूचित जाती आणि अनुसूचित जमातींसाठी विशेष तजवीज करण्यापासून राज्याला प्रतिबंध करील असे काहीही नाही.

कलम २९ (२) : राज्याच्या निधीतून चालविलेल्या किंवा जिला साहाय्य लाभत आहे अशा शिक्षणसंस्थांत केवळ धर्म, वंश, जात, भाषा या कारणांवरून किंवा यांपैकी कोणत्याही कारणावरून कोणाही व्यक्तीला प्रवेश नाकारता येणार नाही.

⊙ ⊙ ⊙





# राष्ट्रीय एकात्मता : काही विचार

ना. र. इनामदार

राष्ट्रीय एकात्मतेसंबंधी पुष्कळ विचार स्वातंत्र्यानंतर आजपावेतो झालेला आहे. पण तरीही राष्ट्रीय एकात्मता देशामध्ये समाधानकारक प्रमाणात निर्माण झालेली नाही, असे सर्वसाधारणरीत्या मानले जाते. अशी अवस्था प्रत्येक विकासमान स्वतंत्र देशाची आहे असे विधान करून प्रश्न बाजूला सारण्याचाही प्रयत्न काहीजणांकडून केला जातो. त्याचप्रमाणे देशाच्या हितशत्रूंनी निर्माण केलेला हा एक बागुलबुवा आहे अशीही भलावणी काहीजण करतात. भारत या देशाची राष्ट्रीय परंपरा प्राचीन असून तिची पाळेमुळे देशाच्या इतिहासामध्ये व लोकांच्या मनोभूमिकेमध्ये खोलवर रुजलेली आहेत, तेव्हा लोकांनी घबराटीच्या वातावरणापासून दूर राहावे, असाही तर्क काहीजण लढवतात.

उलट बाजूने, भारत हे राष्ट्रच नाही, स्वातंत्र्य अभावितपणे आपसूक, इतिहासाच्या चक्रामध्ये, मिळून गेले; त्यात देशाच्या राष्ट्रीय भावनेचा संपूर्ण विजय होऊन राष्ट्रीयत्व सिद्ध झाले असे काहीही झालेले नाही, असे सांगण्यात येते. हिंदुस्थान देश हा 'राष्ट्रकां'चा ( काहीजण 'उपराष्ट्रकां'चा असे म्हणतात ) बनलेला आहे, तेव्हा ही राष्ट्रके जर देशामधून विभक्त झाली तर त्यात वावगे काही घडत नाही, या राष्ट्रकांना राष्ट्रात सामावून घ्यावयाचे असेल तर त्यांच्या सर्व राजकीय, आर्थिक व सांस्कृतिक मागण्या मान्य करावयास हव्यात, असा दुसऱ्या टोकाचा तर्कवाद काही राजकीय पक्षांकडून व विशिष्ट विचारसरणीच्या व्यक्तींकडून पुढे केला जातो. अखंड हिंदुस्थान देशामधून, स्वातंत्र्य मिळाले त्यावेळी, पाकिस्तानची निर्मिती झाली. ते अपरिहार्य होते, कारण पाकिस्तान हे मुसलमानांचे राष्ट्र हिंदुस्थान देशामध्ये ऐतिहासिक काळापासून, तेराव्या शतकापासून, महमद घोरीच्या यशस्वी हल्ल्यापासून अस्तित्वात होते. त्याला वैधानिक व वास्तविक मान्यता ऑगस्ट १९४७ मध्ये मिळाली. जे राष्ट्र ब्रिटिश सत्तेने १८५८ मध्ये दिल्ली काबीज करण्यापूर्वी अस्तित्वात होतेच ते एकोणनव्वद वर्षांनंतर पुन्हा अवतीर्ण झाले, इतकेच काय ते. पाकिस्तान–निर्मिती हा ऐतिहासिक अपघात नव्हता, तर इतिहासाला दिलेली ती अधिमान्यता होती. तेव्हा आता भारत-निर्मितीनंतर जर काही राष्ट्रके येथून पुढे या देशामधून फुटून निघाली तर पाकिस्तान–विभक्तीमुळे जी ऐतिहासिक प्रक्रिया सुरू झाली तीच पुढे चालू राहणार आहे. ही या तर्कवादाची परिणती समजली पाहिजे.

'राष्ट्रीय एकात्मता' ही संज्ञा 'राष्ट्रीयत्व'; 'राष्ट्रबांधणी' व 'राष्ट्रनिर्मिति' या संज्ञांपासून पृथक् आशयाची समजली पाहिजे.

राष्ट्रीय एकात्मता राष्ट्रीयत्व गृहीत धरते. देशामध्ये राष्ट्रीयत्व सिद्ध झाले आहे, परंतु राष्ट्रीयत्वाची भावना अद्याप देशाच्या विविध प्रदेशांमध्ये अगर राष्ट्रीय समाजाच्या वेगवेगळ्या थरांमध्ये किंवा विभागांमध्ये पुरेपूर भिनलेली अगर मुरलेली नाही, त्यामुळे राष्ट्रीय एकात्मतेच्या आन्दोलनाची व त्यासाठीच्या क्रियात्मक उपायांची आवश्यकता आहे, अशी पार्श्वभूमी त्या संज्ञेपाठीमागे असते. भारत हा राज्यसंघ ( Union of States ) आहे असे विधान भारतीय राज्यघटनेमध्ये समाविष्ट केलेले आहे. निरनिराळ्या प्रदेशांना भारत या राष्ट्रामध्ये एकत्रित आणण्याची घटना या विधानामध्ये ध्वनित होते, त्याचप्रमाणे विविध धर्मांचे समाज, विभाग या राष्ट्रामध्ये सामावलेले आहेत, हे "श्रद्धा व उपासना यांचे स्वातंत्र्य" या भारताच्या संविधानाच्या प्रास्ताविकेच्या उद्घोषणेने स्पष्ट होते.

'राष्ट्रबांधणी' ( Nation–Building ) ही संज्ञा अलीकडे दुसऱ्या महायुद्धानंतर, अमेरिकन सामाजिक–शास्त्रज्ञांनी विकासमान, स्वातंत्र्याच्या








उंबरठ्यावर उभ्या असलेल्या किंवा स्वातंत्र्य मिळाल्यानंतरही, देशवासीयांमध्ये राष्ट्रीयत्वाची भावना पूर्णपणे ओतप्रोत भरलेली नाही अशा देशांना उद्देशून वापरलेली आहे. सामाजिक, आर्थिक प्रशासनिक, राजकीय ही व अन्य विविध अंगे विकासाच्या प्रक्रियेला असतात अशी या सामाजिक-शास्त्रज्ञांची धारणा असते. हिंदुस्थानसारख्या देशामध्ये हे राष्ट्रबांधणीचे कार्य देशाच्या स्वातंत्र्य-संग्रामामध्ये नेतृत्व केलेल्या राजकीय कार्यकर्त्यांनी व त्यांच्यापूर्वीच्या सामाजिक कार्यकर्त्यांनी समाज-प्रबोधन करून पार पडले. सामाजिक विकासाची प्रक्रिया आर्थिक, प्रशासनिक व राजकीय विकास प्रक्रियांच्या तुलनेने हिंदुस्थानमध्ये मागे पडलेली आहे, ही विदारक वस्तुस्थिती ध्यानात घेण्याजोगी आहे. जिथे स्वातंत्र्याची चळवळ दीर्घकाळ लढवली गेलेली नव्हती, त्या आफ्रिका, कॅरिबियन, पॅसिफिक महासागर इ. जगाच्या भागांमधील देश दुसऱ्या महायुद्धानंतर वसाहतवादाची पीछेहाट सुरू झाल्यानंतर एकापाठोपाठ स्वतंत्र झाले. निरनिराळ्या वंशांच्या वन्य जमातींमधील दीर्घ वैमनस्यामुळे आफ्रिकेमधील काही नवजात राष्ट्रे विघटित झाली, त्याचप्रमाणे स्वातंत्र्याबरोबर स्थापन झालेल्या लोकशाही राजकीय संस्थांचाही तेथे लोप झाला. काही अमेरिकन सामाजिक-शास्त्रज्ञ आजच्या भारताला उद्देशूनही 'राष्ट्रबांधणी' ही संज्ञा वापरतात, पण ती तितकीशी सयुक्तिक नाही.

'राष्ट्रनिर्मिती' ही संज्ञा वरील संज्ञांच्या मानाने कमी व्याप्तीची आहे. 'राष्ट्रबांधणी'ची प्रक्रिया दीर्घकाळ चालू असणारी किंवा चालणारी असते, तर 'राष्ट्रनिर्मिती'ची प्रक्रिया नवीन राष्ट्राच्या जन्मकाळापुरती मर्यादित असते. बेल्जम कांगो या मध्य आफ्रिकेमधील देशामधून बेल्जम या साम्राज्यशाही देशाने काढता पाय घेतल्यावर बेल्जम कांगो या नवीन राष्ट्राची निर्मिती झाली, पण तेथे राष्ट्रबांधणीची प्रक्रिया झालेलीच नव्हती. त्यामुळे त्या देशात भाडोत्री बेल्जम सैनिकांनी तो देश स्वतंत्र झाल्यावर धुमाकूळ घातला, देशात यादवी युद्ध माजले व देशाच्या चिरफळ्या झाल्या, अशी बरीच उदाहरणे दुसऱ्या महायुद्धानंतर दृष्टोत्पत्तीस आली. 'राष्ट्रनिर्मिती'पूर्वी 'राष्ट्रबांधणी'ची प्रक्रिया देशात दीर्घकाळ प्रवर्तित झालेली असेल तर ते नवजात राष्ट्र स्थायी स्वरूपात टिकू शकते हा इतिहासाचा अनुभव आहे.

वरील विवेचनाचा मथितार्थ असा सांगता येईल, की भारतामधील राष्ट्रीयत्व स्वतंत्र राष्ट्र या स्वरूपात सिद्ध झालेले आहे. राष्ट्रबांधणीची प्रक्रिया स्वातंत्र्यापूर्वीच्या त्यासाठी झालेल्या संग्रामामध्ये झाली; तिच्यामध्ये समाजसुधारणा, धार्मिक परिवर्तन, शैक्षणिक संस्थांची स्थापना व पुनर्निर्माण इ. क्षेत्रांमध्ये कामगिरी केलेल्या कार्यकर्त्यांचाही सहभाग होता. या राष्ट्रबांधणीच्या प्रक्रियेचा परिपाक म्हणून भारत या स्वतंत्र राष्ट्राची निर्मिती झाली. परंतु या राष्ट्राच्या निरनिराळ्या घटक प्रदेशांमध्ये, समाजाच्या वेगवेगळ्या थरांमध्ये व विभागांमध्ये एकराष्ट्रीयत्वाची भावना जितक्या मनस्वीपणे भिनावयास हवी होती तितकी ती भिनलेली नाही. वेळोवेळी या प्रदेशामध्ये, समाजाच्या थरांमध्ये व विभागांमध्ये तणाव निर्माण होतात व त्या तणावांचे रूपान्तर हिंसाचारात होते. त्यामुळे राष्ट्रीय एकात्मतेला, ऐक्याला तडा जातो. भारत हे राष्ट्र एकसंध राहणार की नाही, का त्याच्या चिरफळ्या होणार, अशी शंका या देशाच्या नागरिकांच्या मनामध्येच नव्हे तर परदेशीय जाणकारांमध्येही निर्माण होते. तसे पाहिले तर हिंदुस्थानच्या सबंध इतिहासामध्ये आज जो व जेवढा भूभाग भारतामध्ये समाविष्ट आहे तो व तेवढा आजच्या दृढ व स्थिर स्वरूपात यापूर्वी कधीही समाविष्ट झालेला नव्हता. ऐतिहासिक काळामधील मौर्य साम्राज्य, गुप्त साम्राज्य, विजयनगर साम्राज्य व ब्रिटिश राज्य ज्याचे वारसदार झाले ते मोगल साम्राज्य, यांपैकी कोणत्याही साम्राज्यामध्ये आजच्या भारत या राष्ट्रामधील एकसंधता, दृढता व स्थिरता नव्हती. जलद दळणवळणाची व संचरणाची साधने ऐतिहासिक काळामध्ये अस्तित्वात नसल्याने या साम्राज्यांमध्ये विस्कळितपणा होता. त्याचप्रमाणे त्यांचे प्रशासनही स्थिर स्वरूपाचे नव्हते. 'राष्ट्र' ही आधुनिक संकल्पना, काही विशिष्ट राजवटी व त्यांतील अभिजन वर्ग आणि संस्कृतीचे नेतृत्व हाती असलेल्या व्यक्ती सोडल्या तर त्या काळी अस्तित्वात नव्हती.

राष्ट्र ही संकल्पना आधुनिक आहे, पण भारतातील समाजपद्धती प्राचीन काळापासून चालत आलेली आहे आणि त्याचबरोबर पाश्चिमात्य संस्कृतीचे प्रतिनिधित्व करणाऱ्या ब्रिटिश सत्ताधाऱ्यांच्या आगमनाबरोबर येथे आलेल्या त्या संस्कृतीच्या, प्राकृतिक शास्त्रे व व्यक्तिस्वातंत्र्यासारख्या मूल्यांवर आधारलेल्या, नवीन आकृतिबंधाची भर पडली. ब्रिटिश राजवटीने देशाचे राजकीय, आर्थिक व प्रशासनिक ऐक्य साधले गेले. काही प्रमाणात येथील विविध धार्मिक समाजांमध्ये आधुनिकीकरणाच्या प्राकृतिक प्रक्रियांचा व मूल्यांचा प्रवेश झाला, पण त्यांचे प्रमाण त्या त्या समाजाच्या मुक्त रचनेवर अवलंबून होते. हिंदू समाजामध्येसुद्धा निरनिराळ्या जाती–जमाती संस्कृतीच्या विभिन्न पातळ्यांवर स्थिरावलेल्या होत्या. ब्रिटिश राजवटीचे फायदे या निरनिराळ्या जाती–जमातींना त्यांच्या या सांस्कृतिक पातळीनुसार मिळत गेले. सांस्कृतिक दृष्ट्या पुढारलेल्या जाती–जमाती व धार्मिक समाज ब्रिटिश राजवटीने येथे घडून आलेल्या प्रशासनिक, वैधानिक, आर्थिक व शैक्षणिक परिवर्तनामुळे अधिकच पुढारल्या. काही प्रमाणात मागासलेल्या जाती–जमातींमधील व धार्मिक गटांमधील या परिवर्तनाच्या कक्षेत आलेल्या निवडक व्यक्ती पुढे सरसावल्या. म्हणून राष्ट्रीय एकात्मतेची प्रक्रिया ही राजकीय क्षेत्रापुरती मर्यादित राहून चालणार नाही, तिचा परीघ आर्थिक, सामाजिक, शैक्षणिक इ. क्षेत्रांना सामावून घेणारा असला पाहिजे.

स्वातंत्र्यापूर्वी बहुसंख्य हिंदु व अल्पसंख्य मुसलमान यांच्यामध्ये ऐतिहासिक कारणामुळे, तसेच परकीय ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या अल्पसंख्याकांना प्रोत्साहन व चिथावणी देण्याच्या धोरणामुळे, वितुष्ट असे. काही अल्पकालीन व तात्कालिक कारणांमुळे या वितुष्टाचे रूपान्तर हिंसाचारामध्ये होई. सबंध हिंदुस्थानमध्ये जरी मुसलमान अल्पसंख्य असले तरी वायव्येला सिंध, पंजाब, सरहद्द व बलुचिस्तान या व पूर्वेला बंगाल प्रांतामधून ते बहुसंख्य होते. लोकशाहीवर आधारलेल्या स्वयंनिर्णयाच्या तत्त्वानुसार पाकिस्तानच्या निर्मितीचे समर्थन केले गेले असले, तरी त्यापाठीमागे परकीय ब्रिटिश राजवटीचा हात होता हेही तितकेच खरे आहे. मुसलमानांच्या पाकिस्तान या स्वतंत्र राष्ट्राच्या निर्मितीनंतर भारतामध्ये येथील मुसलमान राष्ट्रीय प्रवाहामध्ये सामावून जातील अशी अपेक्षा होती व आजही ती अपेक्षा बाळगली जाते. घटनासमितीने, मुसलमानांसकट स्वातंत्र्यापूर्वीचे वेगवेगळ्या जाती–जमातींचे विभक्त मतदारसंघ नष्ट केले, केवळ अनुसूचित जाती व वन्य जमाती यांच्यासाठी विधिमंडळांमधून व प्रशासनांमध्ये काही राखीव जागा निर्माण केल्या. बांगलादेशच्या निर्मितीनंतरच्या उर्वरित पाकिस्तानच्या तुलनेने भारतामधील मुसलमानांची लोकसंख्या अधिक आहे; बिहार, उत्तरप्रदेश येथे ती उल्लेखनीय प्रमाणात आहे; काही शहरांमधून ती भरीव आहे. स्वातंत्र्यपूर्व काळाच्या तुलनेने राजकीय दृष्ट्या कमी झालेल्या महत्त्वामुळे भारतामधील मुसलमानांमध्ये एक प्रकारची विफलतेची भावना असणे अस्वाभाविक नसले, तरी त्यांच्या स्वतःच्या भविष्यकालीन प्रगतीच्या व या देशाच्या भवितव्याच्या दृष्टीने तिचे राजकीय भांडवल करणे गैर आहे. विधिमंडळांमधून व प्रशासनांमध्ये राखीव जागा मागणे म्हणजे स्वातंत्र्यपूर्व इतिहासाचीच उजळणी करण्यासारखे आहे. मुसलमान समाजापुढील मुख्य समस्या आहे ती आधुनिकीकरणाची. धर्माच्या आवरणाखाली स्त्रियांना स्वातंत्र्य नाकारणे, बहुपत्नीकत्व, बुरखा यांसारख्या चाली अजूनही अनुसरणे, यामुळे देशाच्या सर्वसाधारण प्रगतीचे वारे या समाजाच्या बहुसंख्य विभागापर्यंत पोहोचत नाहीत. हिंदुधर्मीयांमध्येही जातींच्या अडसरामुळे प्रगतीचा वेग सर्व थरांमधून व विभागांमधून समप्रमाणात आढळत नाही, पण शिक्षणाच्या द्रुत प्रसारामुळे आजपावेतो वंचित असलेले विभाग वर येऊ लागले आहेत. गतकाळापासून स्फूर्ती घेणे व विघातक रूढीने ग्रासलेल्या तथाकथित धार्मिक समजुती व प्रथा यांना अवाजवी महत्त्व देणे, आधुनिकीकरणाच्या प्रक्रियेमधील मोठे अडसर होत. मुसलमान समाज तुर्कस्थान, ईजिप्त, इण्डोनेशिया येथील स्वधर्मीयांच्या प्रगत मार्गाचा अवलंब करणार की सौदी अरेबिया, खोमेनीप्रणीत इराण, शेखांची राज्ये येथील बुरसटलेल्या धर्मकल्पनांचा व चालीरीतींचा ? आर्थिक प्रगतीच्या वाटा खुल्या करून घ्यावयाच्या असतील तर शिक्षणाचा सार्वत्रिक प्रसार या

समाजामध्ये व्हावयास हवा, वाढत्यासंख्येने तरुणांनी तांत्रिक व व्यावसायिक शिक्षण संपादन करावयास हवे. आधुनिकीकरणाची प्रक्रिया जितक्या अधिक प्रमाणात व जलद गतीने मुसलमान समाजात प्रसार पावेल, तितक्या प्रमाणात तो समाज मुख्य राष्ट्रीय प्रवाहात एकरूप होईल व लोकशाही, व्यक्ति-स्वातंत्र्य व समाजवाद या ध्येयमूल्यांशी निगडित होईल.

ईशान्य भारतामधील वन्य जमातींचा तुटकपणा अंशतः राजकीय कारणामुळे व अंशतः आर्थिक स्वरूपाच्या प्रादेशिक मागासलेपणामुळे उद्‌भवलेला आहे. ख्रिश्चन मिशनऱ्यांचे व त्यांच्या पाठीमागे असणाऱ्या परकीय सत्तांचे सवते सुभे निर्माण करण्याचे प्रयत्न यशस्वी झाले नाहीत. वन्य जमातींची 'वन्य' संस्कृती जाणून बुजून नष्ट करणे वेगळे व आर्थिक, शैक्षणिक, राजकीय व प्रशासनिक प्रक्रियांमुळे या संस्कृतीत परिवर्तन होणे निराळे. असे परिवर्तन होणे अपरिहार्य आहे, इतकेच नव्हे तर इष्टही आहे. देशाच्या अन्य भागामध्ये ऐतिहासिक सामाजिक रूढी व परंपरा टिकवून धरणे जितके अनैसर्गिक होते व आहे, तितकेच ही 'वन्य' संस्कृती कृत्रिमरीत्या संरक्षित ठेवणे अनैसर्गिक व काळाच्या प्रवाहाविरुद्धचा वर्तनक्रम होय.

हिंदू समाजामधील सवर्णांच्या हरिजनांविरुद्ध, वेगवेगळ्या मागासलेल्या जातींमधील, अत्याचारांच्या प्रकारांना राजकीय बाजू जशी आहे तशाच आर्थिक सामाजिक, शैक्षणिक व सांस्कृतिक बाजू आहेत. स्वातंत्र्यानंतर प्राप्त झालेल्या मताधिकारामुळे एक नवीन राजकीय शक्ती हरिजनांना मिळालेली आहे. तिचा उपयोग त्यांनी जर संघटितपणे विधायक कार्यासाठी, आपल्यावरील अन्याय दूर करण्यासाठी व आर्थिक प्रगतीसाठी केला तर ते योग्यच होय. शतकानुशतके दबल्या गेलेल्या या समाजाला सवर्णांनी समानतेची वागणूक तर दिलीच पाहिजे, पण आर्थिक, शैक्षणिक व अन्य सवलतींच्या बाबतीत झुकते माप त्यांच्या पदरात घातले पाहिजे. तरच राष्ट्रीय एकात्मतेचा दीप या वंचित भागाच्या घराघरांमधून प्रज्वलित होईल.

सध्याचा पंजाबचा प्रश्न संपूर्णतया राजकीय स्वरूपाचा आहे. शीख या देशामधील सर्व दृष्टींनी पुढारलेल्या भागांपैकी होत. तेव्हा भारतापासून विभक्त होण्याचे त्या समाजामधील मूठभर व्यक्तींचे स्वप्न हे दिवास्वप्नच ठरेल.

भाषिक तणाव राष्ट्रीय एकात्मतेला बाधा आणण्याइतक्या गंभीर स्वरूपाचे आहेत, असे म्हणवत नाही. आसाममध्ये आसामी-बंगाली भाषिकांमधील मतभेदांपेक्षाही परकीय घूसखोरांच्या प्रश्नामुळे परिस्थिती चिघळलेली आहे. तामिळनाडूमधील अतिरेकी स्वायत्ततेची मागणी आता मागे पडलेली आहे. मुख्य राष्ट्रीय प्रवाहामध्येच आपले स्थान आहे याची जाणीव तामिळनाडूमधील प्रादेशिक राजकीय शक्तींना एव्हाना झालेली आहे, असे विधान करण्यास भरपूर आधार आहे. महाराष्ट्र—कर्नाटक यांसारखे भाषिक संलग्नतेमुळे उद्‌भवलेले प्रादेशिक वाद सामोपचाराने, वाटाघाटींच्या मार्गाने व देवाणघेवाणीनेच सुटावयास हवेत. 'स्थानिक' विरुद्ध देशवासीय हा वादही राष्ट्रीय परिदृष्टी ठेवून त्या त्या ठिकाणच्या लोकांना सार्वजनिक प्रकल्पांमधील मोठ्या प्रमाणावरील बिनकसबी नोकऱ्या उपलब्ध करून सोडवता येईल. राष्ट्रीय एकात्मतेमध्ये या वादाचा प्रतिबंध येण्याचे कारण नाही.

देशामध्ये १९५० मध्ये योजनाबद्ध अर्थव्यवस्थेला शासनाने संमती दिली व तिची कार्यवाही सुरू झाली. आर्थिक विकासाच्या विविध योजना (schemes), प्रकल्प (projects) व कार्यक्रम (programmes) शासनाने लोकशाही राज्यव्यवस्थेच्या चौकटीत कार्यान्वित केल्यामुळे नियोजनबद्ध अर्थव्यवस्थेसंबंधीच्या निर्णयांना काही प्रमाणात राजकीय स्वरूप येणे साहजिक होते. भारतीय संघराज्यामधील प्रत्येक राज्याला राष्ट्रीय विकासनिधीमधील जास्तीत जास्त वाटा मिळावा असे वाटणे नैसर्गिक होते. आर्थिक व सामाजिक मागासलेपणाचे निकष ठरवून त्यांच्या आधाराने विकासासाठी आर्थिक साहाय्य काही प्रमाणात दिले गेले असले, तरी या प्रक्रियेमध्ये राजकीय प्रभावही परिणामकारी ठरलेला आहे. काही ठिकाणी राज्याराज्यांमधील असंतुलन वाढलेले आहे, तर काही ठिकाणी ते कमी झाले आहे. पण अपेक्षित प्रमाणात ते कमी झालेले नाही. आसाम, ईशान्य भारत, ओरिसा, मध्यप्रदेशचा जंगली भाग हे मागासलेलेच

अनुक्रमणिका

राहिले आहेत. काश्मीरसारख्या राज्यामध्ये देशामधल्या नागरिकांवर आर्थिक व्यवहार करण्यास पूर्ण मोकळीक नसल्यानेही आर्थिक विकास पुरेशा प्रमाणात झालेला नाही. काही प्रमाणात, आर्थिक असंतुलनामुळे वेगवेगळ्या ठिकाणच्या लोकांमधील असंतोष प्रगतीच्या ईर्ष्येमधून उद्‌भवलेला असल्यामुळे यथायोग्यच समजला पाहिजे. संघशासनाने राज्यांना आर्थिक विकासासाठी योग्य निकषांवर अधिक अर्थसाहाय्य प्राप्त करून दिले पाहिजे, त्याचबरोबर राज्यांनीही स्वतःहून आपली स्वतःची सामग्री अधिक प्रमाणात उभी केली पाहिजे. संघ व राज्ये यांच्यामधील विधायक सहयोगामुळेच राष्ट्रीय एकात्मता बळावेल.

वरील विवेचनाचा असा अर्थ नाही, की राष्ट्रीय एकात्मतेची प्रक्रिया अगदी सुलभ व सुकर आहे. देशाच्या संविधानाने त्यासाठी काही यंत्रणा निर्माण केल्या आहेत. अनुसूचित जाती-जमातींसाठीचे आयुक्त, भाषिक अल्पसंख्याकांसाठीचे आयुक्त, प्रादेषिक भाषांना दिलेले राष्ट्रीय स्थान, अधिकृत भाषेची/भाषांची तरतूद, वित्त आयोग, इ. यंत्रणा भारतीय संविधानाने कार्यान्वित केल्या आहेत. पण, राष्ट्रीय एकात्मतेचा स्रोत प्रत्येक भारतीयाच्या हृदयामधून पाझरला पाहिजे, तरच शासनाने, प्रशासनाने व देशातील विविध संस्थांनी व गटांनी त्यासाठी केलेल्या प्रयत्नांचा योग्य उठाव होऊ शकेल. " सदैव जागृतता ही स्वातंत्र्याची किंमत होय ", या उक्तीप्रमाणे " सदैव जागृतता हीच राष्ट्रीय एकात्मतेची किंमत होय " असे आपल्याला म्हणावे लागेल. आणि ही जागृतता प्रत्येक भारतीयाने बाळगली पाहिजे.







अनुक्रमणिका








अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत


नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# भ्रष्टाचाराची विकृत संस्कृती

सुनील आडगांवकर

स्वातंत्र्योत्तर काळात विकसित झालेल्या भ्रष्टाचाराच्या विकृत संस्कृतीने कॅन्सरच्या रोगाप्रमाणे सर्व समाजजीवनाला व्यापून टाकले आहे. समाजाच्या राजकीय, आर्थिक, शैक्षणिक, सांस्कृतिक व धार्मिक क्षेत्रांत या भ्रष्टाचाराची पाळेमुळे खोलवर जाऊन पोहोचली आहेत. विविध व्यावसायिक क्षेत्रांत भ्रष्टाचार निरनिराळ्या स्वरूपांत व कमीअधिक प्रमाणात आढळून येतो. भ्रष्टाचाराच्या या विकृत संस्कृतीचे दृश्य व अदृश्य परिणाम सामाजिक, आर्थिक व राजकीय व्यवस्थेवर होत आहेत. त्यांतील काही तात्कालिक, तर काही दूरगामी स्वरूपाचे आहेत.

ह्या संस्कृतीने सर्वत्र आपला प्रभाव दाखविला आहे. विकसित राष्ट्रे, विकसनशील राष्ट्रे व अविकसित राष्ट्रे भ्रष्टाचारापासून मुक्त नाहीत. उद्योगधंद्यांच्या स्वातंत्र्याचा पुरस्कार करणाऱ्या भांडवलशाही राष्ट्रांत भ्रष्टाचार आहे, त्याचप्रमाणे सर्वंकष नियोजनाचा मार्ग स्वीकारणाऱ्या साम्यवादी राष्ट्रांत भ्रष्टाचार आहे. समाजवादी राष्ट्रांत व समाजवादी कल्याणकारी राज्यांतही भ्रष्टाचार आहे. अर्थात भ्रष्टाचाराचे स्वरूप, प्रमाण व प्रकार यांबाबत अनेक ठिकाणी भिन्नता आढळून आली असली तरी भ्रष्टाचारामागील मानवी प्रवृत्ती सर्वत्र सारख्याच आहेत. सत्ता, संपत्ती व सन्मानाच्या आकांक्षा व त्यांची पूर्तता करण्यासाठी भ्रष्ट मार्गांचा व साधनांचा उपयोग करण्याची वृत्ती सर्वत्र आढळते. म्हणूनच भ्रष्टाचाराची समस्या ही अखिल मानवी समाजाला भेडसावणारी एक प्रमुख समस्या आहे. भ्रष्टाचार सर्वत्रच आहे असे म्हणून त्याचे समर्थन करता येणार नाही. त्याचप्रमाणे भ्रष्टाचाराच्या परिणामांकडे दुर्लक्ष करून चालणार नाही. कारण भ्रष्टाचारामुळे मानवी कल्याण व मानवी प्रगती यांवर विपरित परिणाम होत आहेत. मानवी कल्याणाला व प्रगतीला धोके निर्माण होत आहेत. म्हणून भ्रष्टाचाराच्या प्रश्नाकडे मानवी दृष्टिकोनातून पाहणे आवश्यक आहे.

## संक्रमणकाळातील समाज

भारतासारख्या विकसनशील देशातील समाजजीवनावर भ्रष्टाचाराचे परिणाम कोणत्या प्रकारांत व प्रमाणात जाणवतात, याचे मूल्यमापन करणे अधिक संयुक्तिक ठरेल. कारण, विकसनशील समाज हा संक्रमणकाळातून जात असतो. सरंजामशाही व्यवस्थेकडून आधुनिक लोकशाहीकडे वाटचाल करणारा, मागासलेल्या कृषिव्यवस्थेकडून प्रगत औद्योगिक अर्थव्यवस्थेकडे वाटचाल करणारा व जुन्या मूल्यव्यवस्थेकडून नव्या मूल्यव्यवस्थेकडे वाटचाल करणारा समाज अनेकविध सामाजिक तणावांतून व संघर्षांतून मार्गक्रमण करत असतो. अशा अवस्थेत भ्रष्टाचाराच्या विकृत संस्कृतीचे या समाजावर जटिल स्वरूपाचे परिणाम घडून येत असतात. कारण जुन्या–नव्या शक्तिप्रवाहांना, जुन्या–नव्या प्रवृत्तींना भ्रष्ट्राचाराची संस्कृती विकृत वळण देत असते, उदाहरणार्थ, जुनाट सरंजामदारी जमीनदारी पद्धतीतील भ्रष्टाचार व आधुनिक उद्योगधंद्यांतील भ्रष्टाचार समाजातील बहुसंख्य लोकांचे शोषण घडवून आणण्यास मदत करतो. सत्तेची जुनी व नवी केंद्रे ही भ्रष्टाचाराच्या उगमाची जुनी व नवी केंद्रे ठरतात. त्यांतून परंपरागत व आधुनिक स्वरूपांत भ्रष्टाचार ग्रामीण व शहरी जीवनात निर्माण होतो. या भ्रष्टाचाराचे स्वरूप लक्षात घेणे आवश्यक ठरते.

## भ्रष्टाचाराचे परिणाम

समाजजीवनाच्या सर्व अंगोपांगांवर भ्रष्टाचाराचे परिणाम घडून येतात. त्यांपैकी भ्रष्टाचाराच्या प्रमूख परिणामांची कारणमीमांसा करणे अधिक संयुक्तिक ठरेल : (१) भ्रष्टाचाराच्या विकृत संस्कृतीचे परिणाम समाजाच्या मूल्यपद्धतीवर होतात.

अनुक्रमणिका

समाजातील लोकशाही मूल्यपद्धती आणि मानवी मूल्यपद्धती यांवरील निष्ठा व श्रद्धा यांना भ्रष्टाचारामुळे तडा जातो. (२) भ्रष्टाचारामुळे आर्थिक क्षेत्रातील कार्यक्षमता कमी होऊन प्रगतीचा वेग मंदावतो. (३) राजकीय भ्रष्टाचारामुळे शुद्ध व आदर्शवादी राजकीय संस्कृतीचा विकास घडवून आणता येत नाही. परिणामतः उदारमतवादी लोकशाहीच्या विकासास बाधा येते. (४) मागासलेल्या समाजात सत्तेच्या विकेंद्रीकरणाबरोबरच सत्तेच्या दुरुपयोगाचेही विकेंद्रीकरण घडून येते. परिणामतः समाजातील दुर्बल घटक भ्रष्टाचाराचे बळी ठरतात. समाजातील दुर्बल घटकांचे भ्रष्टाचारामुळे अधिक शोषण होते. विशेषतः मागासलेल्या समाजात भ्रष्टाचार आणि शोषण हातात हात घालून वाटचाल करत असताना दिसतात. जितका भ्रष्टाचार जास्त, तितके शोषणाचे प्रमाण जास्त, असे समीकरण दिसून येते. समाजातील शोषितवर्ग सर्वत्र भ्रष्टाचाराचा बळी ठरतो. समाजातील शोषकवर्ग भ्रष्टाचाराच्या मार्गाने गरीब लोकांचे शोषण करतो.

## भ्रष्टाचारातून शोषण

भ्रष्टाचार कोण करतो ? कोणत्या पातळीवर भ्रष्टाचार चालतो ? भ्रष्टाचाराची साधने व मार्ग कोणते ? या प्रश्नांना अधिक महत्त्व द्यावे लागते. कारण, अमेरिकेत भ्रष्टाचारी राज्यकर्ते जेव्हा समृद्ध भांडवलदारांकडून पैशाची लूट करतात, किंवा प्रशासकीय अधिकारी समाजातील सधन लोकांकडून भ्रष्टाचारी मार्गाने पैसा मिळवितात, तेव्हा त्याचे परिणाम समाजातील वरच्या स्तरात जाणवतात. हा भ्रष्टाचार सहन करण्याची क्षमता सधनवर्गात असते. परंतु भारतासारख्या देशात जेव्हा खालच्या श्रेणीतील प्रशासकीय अधिकारी, सामान्य लोकांकडून लाच खातात, तेव्हा त्यातून समाजातील आर्थिक दृष्टया दुर्बल घटकांचे शोषण होते.

स्वयंरोजगारासाठी पाचशे रुपये कर्ज घेणाऱ्या चांभाराकडून जेव्हा अधिकारी अथवा दलाल तीनशे रुपये लाच म्हणून घेतो, त्यावेळी कर्ज घेणाऱ्या दुर्बल चांभाराचे शोषण होते. एकाद्या कामगाराची दिवसाची मजुरी सात रुपये असताना, वेतनपत्रकावर सात रुपये मिळाल्याबद्दल त्याची सही घ्यावयाची व प्रत्यक्षात त्याला फक्त दोन रुपयेच द्यावयाचे, असा प्रकार घडत असल्यास कामगाराचे शोषण झाल्याशिवाय राहत नाही. अशा प्रकारे होणाऱ्या भ्रष्टाचाराचे शोषणात्मक स्वरूप लक्षात घेणे आवश्यक आहे.

## मागासलेपणा व शोषण

मागासलेपणा, अज्ञान आणि आर्थिक दुर्बलता यांमुळे दलित समाजातील लोक शोषणाला बळी पडतात. समाज जितका मागासलेला व अज्ञानी असेल, तितका तो अधिक भ्रष्टाचारी शोषणाला बळी पडतो. कारण लोकांच्या अज्ञानाचा व मागासलेपणाचा गैर फायदा घेऊन भ्रष्टाचारी लोक आपला स्वार्थ साधत असतात. या भ्रष्टाचारी लोकांत जातीय गटाचे नेते, सांप्रदायिक गटाचे नेते आणि अधिकारीवर्ग यांचा समावेश होतो. जनकल्याणाच्या योजना राबवताना पैशांची उधळपट्टी करणे, पैसा स्वार्थासाठी वापरणे, लाच खाणे इत्यादी प्रकार नित्याचे होऊन बसतात. या प्रकारांना पायबंद घालण्याची क्षमता मागासलेल्या व अज्ञानी लोकांत नसते. नेमका त्याचाच फायदा शासकीय अधिकारी व राजकीय नेते घेतात व आपला स्वार्थ साधतात.

## अभिजनाची भूमिका

भारतातील भ्रष्टाचाराच्या उगमस्थानी अभिजनगट ( Elite ) आहेत. या भ्रष्टाचाराच्या क्षेत्रात तीन अभिजनगट महत्त्वाची भूमिका बजावतात. [१] राजकीय अभिजनगट ( Political Elite ) [२] प्रशासकीय अभिजनगट ( Administrative Elite) आणि [३] आर्थिक अभिजनगट (उद्योगपती-व्यापारी.)

भारतातील भ्रष्टाचाराचे विश्लेषण करताना आर्थिक, राजकीय व प्रशासकीय सत्तेची उगमस्थाने विचारात घेणे आवश्यक ठरते, त्याचप्रमाणे राजकीय भ्रष्टाचार व आर्थिक भ्रष्टाचार यांच्यांतील संबंध विचारात घ्यावे लागतात. राज्यकर्ते, प्रशासकीय अधिकारी व सधन उद्योगपती–व्यापारी हे भ्रष्टाचाराच्या क्षेत्रात प्रभावी ठरतात. आपल्या अधिकारपदाचा व अधिकाराचा दुरुपयोग स्वार्थासाठी व भौतिक सुखासाठी करण्याच्या प्रवृत्तीतून हा भ्रष्टा-



अनुक्रमणिका

चार उदयास येत असतो. आपल्याकडे भांडवलदार व व्यापारी यांच्यांत इतरांना भ्रष्ट करण्याची क्षमता आहे; तर आपले राज्यकर्ते व प्रशासकीय अधिकारी भ्रष्टाचाराला सहज बळी पडणारे आहेत. त्यांच्याकडून होणाऱ्या अयोग्य कृतींमुळे भ्रष्टाचारी वृत्तीचा प्रभाव वाढण्यास मदत होते.

भ्रष्टाचाराचा उगम वरच्या स्तरात होतो व हा भ्रष्टाचार झिरपत झिरपत खालच्या स्तरापर्यंत येऊन पोहोचतो.

## राजकीय भ्रष्टाचार

भारतातील राजकारणात व राजकीय जीवनात "धंदेवाईक" दृष्टिकोन तयार होण्यास येथील निवडणुकीचे राजकारण जबाबदार ठरले आहे. पक्षबांधणीसाठी व निवडणुकीसाठी प्रचंड प्रमाणावर पैसा लागतो. राजकारणातील "पैशाची सत्ता" राजकीय भ्रष्टाचाराचे उगमस्थान ठरते. राजकीय पक्षाचे नेते उद्योगपतींकडून व व्यापाऱ्यांकडून पैसा जमा करतात व निवडणुकांनंतर त्यांच्या स्वार्थाची जोपासना करण्याच्या दृष्टीने उद्योगविषयक व व्यापारविषयक धोरण आखतात. जो पक्ष सधनवर्गाकडून पैसा जमा करण्यात व जातीय-सांप्रदायिक गटांची मते मिळविण्यात यशस्वी होतो, तो पक्ष निवडणुकीत यशस्वी होतो.

सधनवर्गाच्या पैशावर निवडणुका लढविणारे पक्ष एका बाजूला समाजवादाच्या घोषणा देतात; तर दुसऱ्या बाजूला उद्योगपतींना परवाने व इतर सवलती देऊन आर्थिक सत्तेच्या केंद्रीकरणाला साहाय्य करतात. राजकारणात दांभिकता वाढते. सांप्रदायिक व जातीय शक्तींना प्रोत्साहन दिले जाते. जातीय व सांप्रदायिक गटांतील मतपेढ्यांतून ("व्होट बँकां"मधून) मते मिळविण्यासाठी विविध धार्मिक संप्रदायांशी व बहुसंख्याक जातीय गटांशी सौदेबाजी करण्याचा प्रयत्न राजकीय पक्षाचे नेते करतात. उद्योगपती-व्यापाऱ्यांना जसे रुपयाचे प्रलोभन असते, तसेच राजकीय नेत्यांना मताचे प्रलोभन महत्त्वाचे वाटते. उद्योगपती-व्यापारी पैसे मिळविण्याचा प्रयत्न करतात, त्याप्रमाणे राजकीय नेते मते मिळविण्याचा प्रयत्न करतात. अशा प्रकारच्या राजकीय भ्रष्टाचाराला आळा घालण्यासाठी अभिजनगटांनी सामाजिक, राजकीय व नैतिक दबाव आणला पाहिजे[१] म्हणजे अभिजनवर्गाने विधायक भूमिका बजावली पाहिजे. राजकीय पक्ष चालविण्यासाठी उद्योग-व्यवसायांत प्रामाणिक फायदे मिळविण्यासाठी आर्थिक व राजकीय अभिजनवर्गाने वैधानिक, सामाजिक व नैतिक दबाव आणला पाहिजे. अशा प्रसंगी वैधानिक, नैतिक दडपण आणून भ्रष्टाचारी प्रवृतीला आळा घालणे शक्य आहे.

## नैतिक मूल्यांचा त्याग

अलीकडच्या काळात, विशेषत: १९६६ नंतर, भ्रष्टाचाराने अगदी खालची पातळी गाठली. गांधी-नेहरू यांच्या विचारसरणीतील नैतिक मूल्यांचा त्याग करण्यात आला. एवढेच नव्हे, तर सत्ताधारी राज्यकर्ते राजकीय भ्रष्टाचार ही एक विकृती आहे, असे मान्य करण्यासही तयार नाहीत. राजकारणात भ्रष्टाचार चालणारच, असे सत्ताधारी राज्यकर्ते गृहीत धरून चालतात,[२] ही सखेद आश्चर्याची गोष्ट आहे. राजकीय भ्रष्टाचाराबद्दल बेपर्वाई अथवा उदासीनता दाखविणे हा नैतिक अध:पतनाचा परमोच्च बिंदू मानला पाहिजे.

## राजकीय भ्रष्टाचाराचे प्रकार

राजकीय भ्रष्टाचाराचे स्वरूप, प्रकार व प्रमाण देशपरत्वे भिन्न आहे. भारतातील राजकीय भ्रष्टाचाराचे पुढील चार प्रकार महत्त्वाचे आहेत : १) राज्यकर्ते स्वतःला अथवा आपल्या नातेवाईकांना सवलतीच्या दरात काही फायदे मिळवून देतात. तसेच विकासयोजनेचे फायदे मिळवून देतात. राज्यकर्ते आपल्या नातेवाईकांना अधिकारपदांवर नेमतात. २) विविध प्रकारचे निधी जमविण्यासाठी अधिकारपदाचा वापर करून पैसा गोळा करतात (महाराष्ट्रातील विश्वस्त निधीची प्रकरणे.). ३) कारखान्याचे राष्ट्रीयीकरण करण्याची धमकी देऊन उद्योगपतींकडून पैसा जमा करणे व त्यांचा पाठिंबा मिळविणे. ४) राजकीय विरोधकांविरुद्ध खोटे आरोप करणे व भ्रष्टाचाराला विरोध करणाऱ्यांविरुद्ध खटले दाखल करण्याची धमकी देऊन त्यांना नियंत्रणाखाली ठेवणे इत्यादी.[३]

भारतातील राज्यकर्ते सत्तेचा दुरुपयोग करून भ्रष्टाचार करतात, किंवा आपल्या अधिकारपदाचा

अनुक्रमणिका

दुरुपयोग करून भ्रष्टाचार करतात. सत्तेच्या दुरुपयोगातून होणारा राजकीय भ्रष्टाचार अधिक गंभीर स्वरूपाचा असतो. कारण अशा प्रकारच्या भ्रष्टाचाराविरुद्ध सत्तेचा वापर करता येणे अवघड आहे. सत्ताधारी राज्यकर्ते कायद्याच्या ढालीचा, विधिमंडळातील विशेषाधिकारांचा व वैधानिक संरक्षणाचा वापर करून भ्रष्टाचारावर पांघरूण घालतात. उदाहरणार्थ, विधिमंडळातील सदस्याविरुद्ध भ्रष्टाचाराचा खटला चालविण्यासाठी विधिमंडळाची संमती लागते. बहुमतवाला पक्ष अशी संमती देत नाही. परिणामतः भ्रष्ट राज्यकर्त्यांवर कोर्टात खटले चालविण्यात वैधानिक अडचणी निर्माण होतात.

राजकीय नेत्यांना कार्यकर्त्यांचा संच आपल्याभोवती निर्माण करण्यासाठी आर्थिक साधनाचा वापर करावा लागतो. राजकीय कार्यकर्त्यांच्या आकांक्षांची पूर्तता करण्यासाठी राजकीय नेत्याकडून सत्तेचा दुरुपयोग होत असतो. याचा एक मोठा परिणाम घडून येतो. राजकीय पक्षाकडून विविध फायदे मिळविणाऱ्या कार्यकर्त्यांमध्ये राजकीय मिंधेपणा निर्माण होतो, त्यातून राजकीय लाचारी, राजकीय खुषामतगिरी, आत्मस्तुतीची प्रवृत्ती आदी दुर्गुणांना वाव मिळतो. राजकीय निष्ठा व राजकीय लाचारी यांच्यांतील सीमारेषा पुसट होत जाते. सत्ताप्राप्तीसाठी स्वाभिमान विकण्यास राज्यकर्ते तयार होतात. त्याचे परिणाम राजकीय संस्कृतीवर होतात. राजकीय भ्रष्टाचारामुळे मानवी सद्‌गुणांना सर्वत्र दुय्यम स्थान प्राप्त होते. नैतिक मूल्यांना सार्वजनिक जीवनात महत्त्व राहत नाही. कारण सर्वसामान्य लोकांपुढे राज्यकर्त्या वर्गातील वाईट प्रवृत्तींचा आदर्श उभा राहतो. समाजाला मार्गदर्शन करणारे राज्यकर्तेच भ्रष्ट असतील, तर सर्वसामान्य लोक कोणाचा आदर्श पुढे ठेवणार ? हा प्रश्न आज महत्त्वाचा ठरला आहे.

## मतांची खरेदी

राजकीय भ्रष्टाचाराचा एक नमुना म्हणजे नागरिकांच्या मतांची खरेदी करणे, हा होय. निवडणुकीच्या प्रचारात अज्ञानी व असहाय नागरिकांची मते खरेदी केली जातात. त्यासाठी किंमत मोजली जाते. अर्थात त्यासाठी पैसा, भेटवस्तू, दारूच्या बाटल्या, अन्नदान यांचा वापर केला जातो. अर्थात, जातीय व सांप्रदायिक गटांच्या मतपेढ्यांवर नियंत्रण ठेवणाऱ्या नेत्यांना विविध फायदे मिळविणे शक्य होते. हार्डग्रेव्ह यांच्या मते, भारतीय राजकीय व्यवस्थेत मतदार उमेदवाराकडून पैशाची अपेक्षा करतो. अर्थात कमी-अधिक प्रमाणात मतांवर नियंत्रण ठेवणाऱ्या ग्रामीण नेत्यांना व जातीय गटांच्या नेत्यांना मतांच्या बदल्यात पैसा व इतर फायदे द्यावे लागतात. अलीकडे व्यक्तिगत मतदारांऐवजी जातीय व सांप्रदायिक गटांना पैसे (अथवा इतर लाभ) देण्याचे तंत्र वापरले जाऊ लागले आहे.[४] निवडणुकीच्या प्रचारयंत्रणेतील नेते व कार्यकर्ते आपल्या उमेदवारासाठी जातीय व सांप्रदायिक गटांच्या नेत्यांशी सौदेबाजी करतात. या तंत्रामुळे निवडणुकीतील "उमेदवार" प्रत्यक्षपणे राजकीय भ्रष्टाचारात अडकत नाही. परंतु त्याच्या आशीर्वादाने अथवा पक्षाच्या साहाय्याने हा भ्रष्टाचार चालतो. त्यासाठी राजकीय पक्ष विविध प्रकारे पैसा उभा करतात. एवढेच नव्हे, तर परकीय पैसा व साहाय्यही प्रसंगी वापरले जाते, असा आरोप राजकीय पक्षाचे नेते परस्परांवर करीत असतात. जनतेला मात्र निवडणुकीतील पैशाची उगमस्थाने कळत नाहीत. याबाबत एक उपाययोजना करता येईल. निवडणुकीसाठी व पक्षबांधणीसाठी राजकीय पक्षांना पैसा उभा करण्यासाठी काही साधने उपलब्ध करून देता येतील :

(१) विविध राजकीय पक्षांना उद्योगसमूह व व्यापारी पेढ्या यांच्याकडून देणगी म्हणून काही रकमा घेता याव्या, अर्थात त्यासंबंधीचा हिशोब राजकीय पक्षाने ठेवावा व तो प्रसिद्ध करावा, म्हणजे राजकीय पक्षावर कोणत्या गटाकडून स्वार्थासाठी दबाव येऊ शकेल, याची कल्पना जनतेला येईल.

(२) विविध सांप्रदायिक व जातीय गटांच्या नेत्यांचे मतपेढीवरील नियंत्रण कमी करण्यात यावे.

(३) निवडणुकीसाठी लागणाऱ्या पैशाची तरतूद शासनाने करावी. प्रचारखर्चासाठी विविध पैसा शासनाने पुरवावा.

(४) राजकारणातील पैशाची सत्ता कमी करण्यासाठी आवश्यक त्या उपाययोजना करण्यात याव्यात. त्यामुळे राजकीय सत्तेच्या बळावर आर्थिक

सत्ता मिळविणे आणि आर्थिक सत्तेच्या बळावर राजकीय सत्ता मिळविणे या प्रकारे अव्याहत चाललेल्या दुष्टचक्राला थांबविता येईल.

राजकीय भ्रष्टाचाराचे स्वरूप रॉबर्ट सी. ब्रुक्स यांनी पुढील शब्दांत व्यक्त केले आहे. त्यांच्या मते राजकीय भ्रष्टाचार म्हणजे हेतुपुरस्सर अयोग्य कार्य करणे, किंवा कर्तव्याकडे दुर्लक्ष करणे, किंवा कमी-अधिक प्रमाणात प्रत्यक्ष व्यक्तिगत फायद्यासाठी सत्तेचा अयोग्य व अनपेक्षितपणे वापर करणे होय.[५] सारांश, राजकीय भ्रष्टाचार हा अधिकारपद आणि सत्तेच्या वापराचा उद्देश यांच्याशी संबंधित असतो. राज्यकर्त्यांनी आपले नियोजित कार्य करण्यास अथवा कर्तव्य बजावण्यास नकार देणे, अथवा व्यक्तिगत फायद्यासाठी सत्तेचा वापर करणे, हा राजकीय भ्रष्टाचार ठरतो. या भ्रष्टाचाराचे स्वरूप संबंधित व्यक्तीच्या आंतरिक हेतूशी निगडित असते. म्हणूनच अशा प्रकारच्या भ्रष्टाचारावर लोकमताचे दडपण व सदसद्विवेकबुद्धीची प्रेरणा यांद्वारे नियंत्रण ठेवता येईल. कारण राज्यकर्त्यांचे हेतू व प्रेरणा नैतिक असतील व त्यात व्यक्तिगत फायद्याला स्थान नसेल, तर राजकीय भ्रष्टाचार होऊ शकणार नाही. परंतु असे घडत नाही. अधिकारपद आणि सत्ताकेंद्र यांत स्वार्थ असलेल्या राज्यकर्त्यांना भ्रष्टाचारापासून दूर ठेवता येत नाही. यावर ग्रीक विचारवंत प्लेटो यांनी राज्यकर्त्यांनी निःस्वार्थी व संन्यस्त वृत्तीने राज्यकारभाराची कर्तव्ये पार पाडावीत, हा उपाय सुचविला होता व राज्यकर्त्यांनी व्यक्तिगत स्वार्थापासून दूर राहावे, असा सल्ला दिला होता.

राजकीय भ्रष्टाचाराला प्रतिबंध घालण्यासाठी पुढील उपाय सुचविले जातात : १) राजकीय भ्रष्टाचाराशी चौकशी करून भ्रष्ट राज्यकर्त्यांना शिक्षा करण्यासाठी 'लोकपाला'ची नेमणूक करणे. २) राज्यकर्त्यांच्या भ्रष्ट व्यवहाराला कायद्याने प्रतिबंध घालण्यासाठी वैधानिक उपाययोजना कार्यवाहीत आणणे. ३) राज्यकर्त्यांच्या सद्सद्विवेकबुद्धीला जागृत ठेवणे. लोकशाही राजकीय व्यवस्थेत या पद्धतींनी राजकीय भ्रष्टाचार कमी करणे शक्य आहे. अर्थात त्यासाठी वापरल्या जाणाऱ्या काही पद्धती वस्तुनिष्ठ आहेत, तर काही पद्धती आत्मनिष्ठ आहेत. भ्रष्टाचाराच्या बाह्य वर्तनावर कायदेशीर मार्गाने नियंत्रण ठेवता येईल, तर भ्रष्ट व्यक्तीच्या आंतरिक प्रेरणेवर आत्मनिष्ठ पद्धतीने– सदसद्विवेकबुद्धीच्या प्रेरणेने– नियंत्रण ठेवणे शक्य आहे. राज्यकर्त्यांच्या मनोवृत्तीतून भ्रष्टाचाराची बीजे नष्ट करणे आवश्यक आहे. सरतेशेवटी असा निष्कर्ष काढता येईल की, राज्यकर्त्यांनी निःस्वार्थी वृत्तीने आपली कर्तव्ये पार पाडली, तर राजकीय भ्रष्टाचारांची पाळेमुळेच नष्ट होऊ शकतील. अर्थात राज्यकर्त्यांचा सत्ता व संपत्ती यांत असलेला स्वार्थ नष्ट करणे अवघड आहे, परंतु या स्वार्थाला कायद्याचा व सदसद्विवेकबुद्धीचा लगाम घालता येणे शक्य आहे.

## आर्थिक क्षेत्रातील भ्रष्टाचार

राजकीय भ्रष्टाचार आणि आर्थिक व्यवहारातील भ्रष्टाचार यांचा निकटचा संबंध आहे. आर्थिक व्यवहारातील भ्रष्टाचार हा उच्च राजकीय व प्रशासकीय पातळीवरून केला जातो. विशेषतः आर्थिक व्यवहार हाताळणाऱ्या प्रशासकीय खात्याकडून आर्थिक क्षेत्रातील भ्रष्टाचार होण्याची शक्यता अधिक असते. कारण या खात्याकडून अथवा मंत्र्याकडून नियमबाह्य आर्थिक फायदे उचलण्याचा प्रयत्न होतो. त्याच्या खात्याकडून मोठ्या प्रमाणावर खरेदी, बांधकाम व प्रकल्प कार्यवाहीत आणताना मोठ्या प्रमाणावर पैसा खर्च केला जातो. अशा वेळी संबंधित मंत्री आणि प्रशासकीय खात्याचे अधिकारी प्रलोभनाला बळी पडण्याची शक्यता असते. त्यांच्या खात्याशी कंत्राटदार आणि इतर व्यावसायिक संबंधित असतात. म्हणून येथे भ्रष्टाचार वाढतो. हा भ्रष्टाचार कमी करण्यासाठी मंत्र्यांनी व प्रशासकीय अधिकाऱ्यांनी एखादी आचारसंहिता तयार करून कार्यपद्धतीच्या नियमांनुसार ती पाळली, तर भ्रष्टाचाराचे प्रमाण कमी होऊ शकेल. वरिष्ठ अधिकाऱ्यांनी स्वेच्छेने आचारसंहितेचे बंधन स्वीकारल्यास त्याचे अपेक्षित परिणाम घडून येतील.[६] भ्रष्टाचाराची क्षेत्रे कोणती आणि भ्रष्टाचारात सहभागी होणाऱ्या व्यक्ती कोणत्या हे निश्चित स्पष्ट केल्यास भ्रष्टाचारविरोधी खात्याला भ्रष्टाचारावर नियंत्रण ठेवता येईल. अशा क्षेत्रातील आर्थिक गुन्हे दखलपात्र गुन्हे म्हणून समजण्यात यावेत. या खात्याशी संबं-

धित अधिकारी व मंत्री यांच्या संपत्तीवर विशेष लक्ष ठेवण्यात यावे.

कल्याणकारी राज्यात भ्रष्टाचाराच्या संधी विविध प्रकारांत उपलब्ध असतात. राज्यातर्फे राबवल्या जाणाऱ्या विकासाच्या योजना, पूरग्रस्तांना मदत, निर्वासितांना साहाय्य, अपंगांना साहाय्य, रोजगार-हमी-योजना आदी कार्यक्रमांत कोटयवधी रुपयांचा अपहार होत असतो. भारतात समाजवादाचा प्रयोग सुरू झाला, तेव्हापासून राज्यकर्त्यांची आर्थिक सत्ता वाढली आणि विकासकार्याच्या नावाखाली राजकीय पक्षातील नेत्यांना व कार्यकर्त्यांना भ्रष्टाचार करण्याची संधी मिळाली. उदाहरणार्थ, सार्वजनिक उद्योगधंद्यांची स्थापना व व्यवहार, दळणवळणाच्या साधनांची बांधणी, कालवे, पूरनियंत्रण-योजना, उद्योगधंद्यांचे परवाने, अन्न व खते यांचे वाटप, भांडवल-गुंतवणूक, आयात-निर्यात परवाने, धरणाचे बांधकाम, शिक्षणाचा प्रसार, समाजकल्याण-योजना, दळणवळण व्यवस्था, दुष्काळी कामे, उपयुक्त वस्तूंचे वितरण इत्यादी क्षेत्रांत भ्रष्टाचार मोठ्या प्रमाणावर करण्यात येऊ लागला.[९] या क्षेत्रांशी संबंधित प्रशासकीय अधिकारी व त्यांचे राजकीय आश्रयदाते यांच्याकडे भ्रष्टाचारांचे फायदे जातात. राजकीय व उच्च पातळीवरील भ्रष्टाचाराला आळा घालण्यासाठी वैधानिक उपाययोजना करता येणे शक्य आहे. या क्षेत्रातील आर्थिक गुन्ह्याबद्दल त्वरित व हमखास शिक्षा करण्याची व्यवस्था केली पाहिजे. त्यासाठी आर्थिक गुन्हेगारीला आळा घालण्यासाठी स्वतंत्र न्यायमंडळाची स्थापना करण्यात यावी. म्हणजे आर्थिक गुन्हे करणाऱ्याला शासन करता येईल.

## आर्थिक प्रगतीला बाधा

भ्रष्टाचारामुळे आर्थिक क्षेत्रात अकार्यक्षमता वाढते व परिणामत: प्रगतीला खीळ बसते. भ्रष्टाचाराची जेव्हा अकार्यक्षमतेला साथ मिळते, त्यावेळी साधनसामग्रीचा हळूहळू ऱ्हास होऊन आर्थिक प्रगतीपुढे एक आव्हान उभे राहते. अशा वेळी कंत्राटदार कमी दर्जाच्या सिमेंटच्या साहाय्याने कालवे बांधतो. काहीतरी बक्षीस हातात ठेवल्याशिवाय टयूबवेलचा (नलिका–कूपाचा) कर्मचारी काम पूर्ण करीत नाही. सहकारी पतपेढीचा सुपरवायझर आपल्या भ्रष्ट व्यवहारामुळे प्रामाणिक शेतकऱ्याला नाउमेद करतो. एवढेच नव्हे, तर ग्रामीण भागात वीज पुरविताना अभियंता अनेक नियमांवर बोट ठेवतो. अशा परिस्थितीत विकासकार्याला गती मिळू शकत नाही. म्हणूनच गुन्नर मायर्‌डल ( Gunner Myrdol ) या आंतरराष्ट्रीय ख्यातीच्या अर्थशास्त्रज्ञाने म्हटले आहे की, भ्रष्टाचाराचे अस्तित्व हे विकासकार्यात अडथळे निर्माण करते.[१] भ्रष्टाचारामुळे आर्थिक विकासात बाधा येते.

## नैतिक चळवळ

भारतीय समाजव्यवस्थेत भ्रष्टाचाराचे प्रमाण वाढले आहे. समाजाची नैतिक पातळी घसरत चालली आहे. याची जाणीव प्रत्येकाला आहे. तथापि आश्चर्याची गोष्ट म्हणजे प्रत्येकाकडून या घटनेचा निषेध केला जात नाही. खरे पाहता समाजातील भ्रष्टाचाराविरुद्ध प्रत्येकाने निषेध व्यक्त केला पाहिजे.[१०] कारण भ्रष्टाचाराविरुद्धच्या लढाईत प्रत्येकाच्या सदसद्विवेकबुद्धीचे सामर्थ्य उपयोगी पडू शकते. समाजातील प्रत्येकाने भ्रष्टाचाराविरुद्ध निषेध व्यक्त केला आणि भ्रष्टाचाराला प्रतिकार करण्याचा प्रयत्न केला, तर भ्रष्टाचाराविरुद्ध नैतिक चळवळ उभारणे शक्य होईल. अर्थात या कार्यात प्रत्येकाने भ्रष्टाचाराच्या विरोधात आवाज उठविला पाहिजे. म्हणजे भ्रष्टाचाराविरुद्ध प्रभावी लोकमत तयार होऊ शकेल. लोकमताच्या दडपणाखाली भ्रष्टाचाराला प्रतिबंध घालणे शक्य होईल. त्यासाठी समाजातील नैतिक नेतृत्व करणाऱ्या समाजसुधारकांनी, धर्मसुधारकांनी व शिक्षणतज्ज्ञांनी पुढाकार घेतला पाहिजे. कारण समाजात नैतिक शिक्षणाचा प्रसार झाल्याशिवाय भ्रष्टाचाराविरुद्ध नैतिक चळवळ सामर्थ्यवान होऊ शकणार नाही. समाजाच्या सर्व स्तरांतील लोकांत भ्रष्टाचाराविरुद्ध नैतिक जाणीव निर्माण करण्यासाठी हेतुपूर्ण प्रयत्न झाले पाहिजेत. भ्रष्टाचाराला आळा घालण्यासाठी दोन प्रकारच्या उपाययोजना करणे शक्य आहे :

(१) भ्रष्टाचार होऊ नये म्हणून काही दक्षतेच्या उपाययोजना करणे शक्य आहे.

(२) भ्रष्टाचाराला प्रतिबंध घालण्यासाठी काही प्रतिबंधक उपाययोजना करणे शक्य आहे.






### दक्षतेच्या उपाययोजना

भ्रष्टाचाराचा रोग सर्वत्र पसरू नये, म्हणून काही दक्षतेच्या उपाययोजना करणे आवश्यक आहे :

(१) आर्थिक व्यवहार करणाऱ्या शासकीय खात्यावर व त्यातील अधिकाऱ्यांवर सतत देखरेख ठेवण्यासाठी गुप्तचरविभागाचे एक पथक नेमणे.

(२) शासकीय अधिकाऱ्यांच्या कामात दिरंगाई करण्याच्या प्रवृत्तीवर आळा घालणे. कारण शासनाकडून आपले काम योग्य वेळी व त्वरित करून घेण्यासाठी नागरिक, व्यापारी व उद्योगपती उच्च पदाधिकाऱ्यांना लाच देत असतात.

(३) शासकीय कर्मचाऱ्यांना प्रशासकीय कार्यपद्धतीतील जाचक व गुंतागुंतीच्या नियमांचा फायदा घेऊन लाच खाता येते. म्हणून प्रशासकीय कार्यपद्धती व कार्यपद्धतीचे नियम सुलभ बनविणे आवश्यक आहे.

(४) कोणत्याही स्वरूपातील भ्रष्टाचाराचा गुन्हा हा दखलपात्र गुन्हा समजण्यात यावा. कोणत्याही तक्रारीशिवाय या गुन्ह्याचा तपास सुरू करण्यात यावा.

(५) राजकीय आणि प्रशासकीय अधिकाऱ्याच्या मालमत्तेची माहिती दरवर्षी उत्पन्नकरविभागाला देण्याचे वैधानिक बंधन त्याच्यावर असावे. या संबंधीची माहिती वृत्तपत्रात प्रसिद्ध केली जावी.

(६) राजकीय पदाधिकारी आणि प्रशासकीय अधिकारी यांच्या नातेवाईकांच्या मालमत्तेची माहिती जमा करून प्रसिद्ध करण्यात यावी. कारण राज्यकर्त्या वर्गातील लोक व प्रशासकीय अधिकारी आपल्या नातेवाईकांच्या नावावर संपत्ती ठेवतात. अशा परिस्थितीत बेनामी आर्थिक व्यवहार केवळ बेकायदेशीर घोषित करून चालणार नाही; तर बेनामी आर्थिक व्यवहार हा दखलपात्र आर्थिक गुन्हा समजण्यात यावा.

(७) भ्रष्टाचारप्रतिबंधक-लोकप्रतिनिधी-समित्यांची स्थापना करण्यात यावी. अशा प्रकारच्या समित्या, राष्ट्रीय पातळीपासून ग्रामीण पातळीपर्यंत स्थापन करण्यात याव्यात. या समित्या अ-राजकीय स्वरूपाच्या असाव्यात.

न. भा. १२

(८) भ्रष्टाचाराच्या बातम्या देणाऱ्या वृत्तपत्रांना व नियतकालिकांना, त्यांतील संपादक-पत्रकारांना-खास संरक्षण देण्यात यावे. प्रशासकीय यंत्रणेकडून अथवा राजकीय गुंडांकडून पत्रकारांना त्रास होणार नाही, याची काळजी घेण्यात यावी.

(९) राजकीय नेत्यांना व प्रशासकीय अधिकाऱ्यांना बक्षिसी अथवा देणगी वा भेटी स्वीकारण्यास कायद्याने प्रतिबंध घालण्यात यावा. कोणत्याही स्वरूपात देणगी देणे अथवा भेट-देणगी स्वीकारणे हा दखलपात्र गुन्हा समजण्यात यावा.

(१०) सत्तेच्या दुरुपयोगातून होणाऱ्या भ्रष्टाचाराला प्रतिबंध घालण्यासाठी सत्ता वापरणाऱ्या पदाधिकाऱ्यांना विशिष्ट कार्यपद्धतीच्या नियमांनुसार कार्य करण्याचे बंधन घालण्यात यावे. या संदर्भात त्यांना वैधानिक बंधनातून सवलती देऊ नयेत. त्याचप्रमाणे सत्तेच्या वापराबाबत कार्यपद्धतीचे नियम इतके निर्दोष असावेत, की सत्तेचा दुरुपयोग होऊ शकणार नाही. कायद्यातील पळवाटांमुळेच भ्रष्टाचाराला वाव मिळतो.

(११) वर्तमानपत्रांतून वा नियतकालिकांतून भ्रष्टाचारविषयक व भ्रष्टाचार करणाऱ्या व्यक्तीसंबंधीच्या बातम्या प्रसिद्ध करण्यात याव्यात. विशेषतः भ्रष्टाचार करणाऱ्या व्यक्तींना कोणत्या शिक्षा देण्यात आल्या, किती व्यक्तींवर भ्रष्टाचाराचे आरोप ठेवण्यात आले, किती व्यक्तींना भ्रष्टाचाराबद्दल शिक्षा करण्यात आली यांसंबंधीची आकडेवारी प्रसिद्ध करण्यात यावी. या आकडेवारीमुळे जनतेमध्ये भ्रष्टाचाराविरुद्ध लोकमत तयार होऊ शकेल. त्याचप्रमाणे जनतेचे प्रतिनिधी भ्रष्टाचाराला आळा घालण्यात किती प्रमाणात यशस्वी ठरले, ते जनतेला कळू शकेल. तद्वतच भ्रष्टाचाराबाबत राजकीय नेते उदासीन आहेत की जागृत आहेत, याची कल्पना जनतेला येऊ शकेल.

(१२) भ्रष्टाचाराबद्दल संबंधित भ्रष्टाचार-निवारण-खात्याला निनावी पत्रे पाठविण्यात यावीत. ह्या पत्रांत व्यक्त केलेल्या आरोपांची अथवा संशयाची योग्य ती दखल घेऊन त्यावर एका महिन्याच्या आत कायदेशीर कारवाई करण्यात यावी. भ्रष्टाचाराबद्दल शासकीय विभागातील अधिकाऱ्यांच्या बाबत संशय येत असला, तरी त्यांची त्वरित चौकशी करण्यात यावी.

**टीपा :**


१) Abbas K. A. " The Cancer of Corruption" in Suresh Kohli's (ed.) *Corruption in India*, New Delhi 1975. p. 31.

२) Dev Dutt, " In Politics " in Suresh Kohli's (ed.) *Corruption in India*, New Delhi, 1975, pp. 79–80.

३) Ibid p. 81.

४) Hardgrave, Robert L. Jr. *India Government and Politics in Developing* Newyoık, 1975. p. 198.

५) Brooks, C. Robert, "The Nature of Political Corruption" in Arnold J. Heidenheimer (ed.) *Political Corruption*, New York, 1970, p. 58.

६) *Santhanam Committee Report on Prevention of Corruption*, Govt. of India, New Delhi, 1964.

७) Dev Dutt, " In Politics ", op. cit. p. 95.

८) Asian Drama *An Inquiry into the Poverty of Nation, Vol.* 2, Harmond Sworth, 1968, p. 180.

९) Ibid p. 952.

१०) *Economic and Political Weekly*, 23rd Sept. 1972.
















अनुक्रमणिका

फार प्राचीन काळापासून बलात्कार होत आले आहेत. जगात सर्व ठिकाणी सर्व काळी स्त्रिया बलात्काराला बळी पडत आल्या आहेत. मानवी संस्कृतीइतकाच या अत्याचाराचा इतिहास जुना आहे. या हजारो वर्षांच्या काळात मानवी संस्कृती विकसत गेली, समाज प्रगत होत गेला असे आपण मानतो. परंतु रानटी अवस्थेप्रमाणेच आजच्या प्रगत समाजातही स्त्रीअत्याचार दृढमूल आहेत. असे असूनही आतापर्यंत एकाही जगप्रसिद्ध तत्त्वज्ञाने किंवा युगप्रवर्तक विचारवंताने या प्रश्नाची फारशी मीमांसा केली नाही. फ्राइडने मनोविश्लेषणात नवे युग सुरू केले. परंतु त्याने बलात्काराचे विश्लेषण करण्याचा मात्र फारसा प्रयत्न केला नाही. फ्राइडप्रमाणेच वर्गकलह व आर्थिक पिळवणूक यांचा जगप्रसिद्ध ऐतिहासिक सिद्धान्त मांडणाऱ्या कार्ल मार्क्सनेही स्त्रीअत्याचारावर कोणताच प्रकाश टाकला नाही. कुटुंबपद्धतीचा अभ्यास करणाऱ्या एंजलनेदेखील या प्रकरणी मौनच पाळले. १८८३ मध्ये ऑगस्ट बेबल याने "Women Under Socialism" हे पुस्तक लिहिले. त्यात मात्र त्याने स्त्रीअत्याचाराचे मार्क्सप्रणीत अर्थशास्त्रीय पृथःकरण करताना टोळी-व्यवस्थेत जमीन, गुरेढोरे व श्रमशक्ती यांच्या मालकीहक्कासाठी टोळी–टोळीमध्ये अव्याहत संघर्ष होत त्या काळात श्रमशक्ती मिळवण्यासाठी स्त्री-अत्याचार सुरू झाले असावेत, असा सिद्धांत मांडला आहे.

"एका व्यक्तीने दुसऱ्या व्यक्तीवर केलेला अत्याचार" इतकाच व एवढाच बलात्काराचा प्रश्न मर्यादित नाही. स्त्रीअत्याचारांची सोयीसाठी दोन प्रकारे विभागणी करावी लागेल. एका माणसाने दुसऱ्या माणसावर केलेला अत्याचार हा एक प्रकार; तर हेतुपूर्वक, संघटितपणे केलेला अत्याचार हा दुसरा प्रकार होय. युद्धात झालेले स्त्रीअत्याचार, दंगे किंवा राज्यक्रांत्यांमध्ये होणारे स्त्रीअत्याचार, दुर्बल घटकांचा सामाजिक वा आर्थिक लढा दडपून टाकण्यासाठी सबल घटकाकडून दुर्बल घटकातील स्त्रियांवर (दलित, आदिवासी, शेतमजूर) होणारे बलात्कार एक प्रकारे इन्स्टिटयुशनालाइज्ड आहेत. याचा अर्थ असा, की शत्रुपक्षातील स्त्रियांवर केलेले अत्याचार त्या त्या समाजाने स्वीकारले आहेत; निषेधार्ह मानलेले नाहीत. अमेरिकेत स्त्रियांवर किंवा भारतात दलित स्त्रियांवर आजही होणारे अत्याचार याची साक्ष होत. युद्धात बांगला देशात झालेले भयानक स्त्रीअत्याचार किंवा भारतीय जवानांनी नागालॅंडमध्ये केलेले बलात्कार ही संघटित अत्याचारांची आणखी दोन ताजी उदाहरणे होत.

बलात्काराची आणखी एक भयावह बाजू म्हणजे लहान मुलांवर होणारे अत्याचार. इतर गुन्ह्यांप्रमाणेच या गुन्ह्यांचेही प्रमाण वाढत आहे. पाश्चात्त्य देशांत पुरुषाने पुरुषावर केलेल्या बलात्कारांचाही (homosexual attacks) आणखी एक प्रश्न आहे. जगभरच्या तुरुंगांत असे अत्याचार घडत आले; घडत आहेत. बलात्काराच्या वेगवेगळ्या बाजू व तऱ्हा लक्षात घेतल्यानंतर स्पष्ट होईल, की बलात्कार वरवर भासतो तितका साधा सरळ गुन्हा नाही. ही समस्या तशी अतिशय गुंतागुंतीची असून त्या त्या समाजाच्या सामाजिक जडणघडणीशी, सांस्कृतिक मूल्यांशी तिचे फार अतूट नाते आहे. या प्रश्नाचे खरे व वास्तव स्वरूप समजून घेण्यासाठी त्याचे समाजशास्त्रीय व मानसशास्त्रीय विश्लेषण करून परंपरागत सांस्कृतिक मूल्यांच्या संदर्भात तो तपासला गेला पाहिजे.

स्त्रियांवरील अत्याचारांचा विचार करताना या लेखात दोन्ही दृष्टीने विचार करणे आवश्यक आहे असे मला वाटते. या समस्येचे सैद्धांतिक विवेचन करून स्त्रीअत्याचाराच्या मुळाशी कोणत्या प्रवृत्ती आहेत, बलात्कार का होतात, कोणकोणत्या कारण-परंपरा याच्या मागे आहेत याचा शोध घेण्याचा प्रयत्न जसा केला पाहिजे, तसाच दुसऱ्या दृष्टीने आपल्या समाजात या प्रश्नाशी कशा प्रकारे मुकाबला झाला पाहिजे याचेही विवेचन आवश्यक आहे.

मथुरा प्रकरणानंतरच आपल्या देशात या प्रश्नावर वादळ सुरू झाले. गेली चारपाच वर्षे वर्तमानपत्रे, मासिकांतून या प्रश्नाची उलटसुलट चर्चा चालू

# बलात्कार

सुनीती पुंगलिया






आहे. मथुरा खटल्यातील सुप्रीम कोर्टाच्या निर्णयानंतर याविषयीचा स्त्रियांच्या मनातील असंतोष एकदम पेट घेतल्याप्रमाणे उफाळून वर आला. परंतु या प्रश्नाचा शास्त्रीय व सखोल अभ्यास आणि संशोधन मात्र अद्यापही सुरू झाले नाही. बलात्काराचे किती गुन्हे पोलिसांकडे नोंदविले जातात याची प्रांतवार सरकारी आकडेवारी सोडली, तर इतर कसलीच आकडेवारी किंवा यासंबंधीची इतर कोणतीही पाहाणी फारशी उपलब्ध नाही. पाश्चात्त्य देशांतही या प्रश्नाचा सखोल व पद्धतशीर अभ्यास सुरू झाला तो १९७० नंतरच. तोपर्यंत या प्रश्नाचा समाजशास्त्रीय, मानसशास्त्रीय बैठकीवरून तुरळक तुरळक अभ्यास झाला होता; क्रिमिनॉलॉजीच्या दृष्टीने काहीसे संशोधन होत होते; पण या प्रश्नाकडे पाश्चात्त्य विचारवंतांचे अधिक लक्ष वेधले गेले ते अलीकडच्या काळातच. १९६० मध्ये पाश्चात्त्य देशात 'विमेन लिब'ची चळवळ सुरू झाली. जीवनाच्या विविध क्षेत्रांत स्त्रीहक्कासाठी संघर्ष करताना स्त्रियांच्या अनेक प्रश्नांना या काळात प्रथमच वाचा फुटली. औद्योगिक अशा प्रचंड लोकसंख्येच्या शहरात इतर गुन्ह्यांबरोबरच बलात्कारांची संख्याही प्रचंडपणे वाढतच होती. बलात्काराचा प्रश्न विमेन्स लिबपुढे एक मोठे प्रश्नचिन्ह घेऊन उभा होता. यातून बलात्काराचा पद्धतशीर अभ्यास व संशोधन सुरू होऊन विविध सामाजिक पाहाण्या व मुलाखती, बलात्काराच्या पोलीसनोंदी व कोर्टातील खटले यांचे पृथ:करण होऊ लागले. १९७५ मध्ये सुझन ब्राऊनमिलर या अमेरिकन स्त्री-पत्रकाराने Against Our Will या नावाचे बलात्कारावर एक अतिशय अभ्यासू व संशोधनात्मक पुस्तक प्रसिद्ध केले. रानटी अवस्थेपासून आजपर्यंत घडत आलेल्या स्त्रीअत्याचारांचा त्यात तिने मागोवा घेतला आहे. बलात्काराच्या प्रवृत्तीची, पुरुषी मनोवृत्तीची तिच्याइतकी निर्भिड चिरफाड दुसऱ्या कुणी अद्याप केली नव्हती. "पुरुषांनी स्त्रियाविरुद्ध बलात्काराचा एखाद्या शस्त्रासारखा उपयोग केला आहे," हा सुझन ब्राऊनमिलरचा निष्कर्ष किंवा "बलात्कार म्हणजे दुसरे तिसरे काही नसून साऱ्या पुरुषजातीने साऱ्या स्त्रीजातीला सतत धाक घालून भीतीच्या दडपणाखाली ठेवण्याची एक जाणीवपूर्वक क्रिया होय" हा सिद्धांत, वरवर कितीही धक्कादायक वाटला तरी थोड्या तटस्थपणे व वस्तुनिष्ठपणे पाहिला तर सर्वांनाच अंतर्मुख केल्याशिवाय राहणार नाही. तत्पूर्वी १९४५ मध्ये Sexual Revolution या आपल्या पुस्तकात Wilhelm Reich या जर्मन विचारवंताने बलात्काराचे विवेचन करताना वास्तवाला सामोरे जाण्याचा प्रयत्न केला होता. पुरुषप्रधान संस्कृतीशी, पुरुषत्वाच्या पारंपरिक कल्पनेशी बलात्काराच्या प्रवृत्तीचा कसा जवळचा संबंध आहे याची त्याने त्यात थोडी मीमांसा केली आहे.

गेल्या काही वर्षांत आपल्या देशात बलात्काराचे गुन्हे अधिकाधिक प्रमाणात घडत आहेत. त्यांतही व्यक्तिगत अत्याचारांपेक्षा संघटित अत्याचारांची संख्या जास्त असण्याची दाट शक्यता आहे. बलात्कारांची संख्या खरोखर वाढली आहे, की अधिक प्रकरणे अलीकडे उजेडात येऊ लागली आहेत, की वर्तमानपत्रांत या प्रकरणांना जास्त प्रसिद्धी मिळते असे प्रश्न येथे उपस्थित होऊ शकतात. मला वाटते या दोन्हींतही तथ्य आहे. एक तर गुन्ह्यांची जी सरकारी आकडेवारी जाहीर होते तीवरूनही या गुन्ह्यांची संख्या वाढलेली दिसते. औद्योगीकरण, शहरांची बेताल वाढ यांमुळे भारतात सर्वच प्रकारची गुन्हेगारी वाढते आहे; त्याला स्त्रीअत्याचार अपवाद नाही. दुसरे म्हणजे आपली राजकीय व सामाजिक परिस्थितीही आज या गुन्ह्यांना खतपाणी घालण्यासारखी आहे. एकीकडे राजकीय, शासकीय किंवा आर्थिक सत्ता हाती असलेले लोक (राजकीय स्थानिक पुढारी, पोलीस, जमीनदार-बागाईतदार वगैरे) सत्तेचा गैरवापर करून स्त्रियांवर जसे अत्याचार करतात तद्वत दुर्बल घटकांचा सामाजिक संघर्ष वा आर्थिक लढा दडपून टाकण्यासाठी सबल घटक संघटितपणे, योजनापूर्वक दुर्बळ घटकांतील स्त्रियांवर (दलित, आदिवासी इत्यादी) अत्याचार करतात. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर गेल्या काही वर्षांत असे सामाजिक, आर्थिक संघर्ष तीव्रतर होत आहेत हे सर्वश्रुतच आहे. या परिस्थितीत निश्चित आकडेवारी उपलब्ध नसली, तरी स्त्रीअत्याचारांची संख्या वाढत आहे असा निष्कर्ष काढणे शक्य आहे. शिवाय बलात्कारांची जी काही प्रकरणे उजेडात येतात, त्यांहून अनेक पटींनी ती अजूनही उजेडात येत

नाहीत, हेही सर्वमान्य आहे अर्थात या प्रकरणांना वर्तमानपत्रांतून आता अधिक प्रसिद्धी मिळते, हेही खरे आहे.

बलात्काराच्या प्रवृत्तीचे मूळ कशात आहे, पुरुष बलात्काराला का प्रवृत्त होतात याचे विश्लेषण करताना जनमानसात प्रचलित असलेले काही समज व अपसमज यांचाही ऊहापोह अपरिहार्य आहे. माणूस सोडून इतर कोणत्याही प्राणिमात्रात बलात्कार नाही हेही येथे नमूद करणे आवश्यक आहे. "बलात्कार पाशवी वासनेमुळे होतात" हा समज पूर्णपणे चुकीचा आहे. जगात ज्या ज्या वेळी युद्धे, राज्यक्रान्त्या किंवा दंगे-धोपे होतात त्या त्या वेळी स्त्रियांवर अत्याचार होतात. गोऱ्या अमेरिकेत नीग्रो स्त्रियांवर आणि काळ्या आफ्रिकेत गोऱ्या स्त्रियांवर जे अत्याचार झाले किंवा भारतात सवर्णांकडून दलित स्त्रियांवर जे अत्याचार होतात त्यांचा संबंध पाशवी वासनेशी लावणे कठीण आहे. या समजाप्रमाणेच "बलात्कारी पुरुष मानसिक दृष्टया विकृत असतात, अर्धवट असतात" अशीही एक समजूत आहे. अर्थात काही गुन्हेगार विकृत असू शकतात. सर्वच प्रकारच्या गुन्ह्यांत अशी शक्यता असते; पण म्हणून सगळेच गुन्हेगार विकृत असतात हे सामान्यीकरण सत्यालाप करणारे व तर्कविसंगत होय. वस्तुस्थिती अशी आहे, की तथाकथित 'नॉर्मल' पुरुषही असे अत्याचार करतात; करायला प्रवृत्त होतात. इतर काही अपसमज तर सामान्य लोकांतच नव्हे तर बुद्धिवाद्यांतही आढळून येतात. 'बलात्कार नैसर्गिक आहे', 'बलात्काराला स्त्रीच जबाबदार असते', 'सुंदर वा तरुण स्त्रियांवरच बलात्कार होतात', 'स्त्रियांच्या फॅशन्समुळे बलात्काराचे गुन्हे वाढतात' अशी अनेक कारणे सामान्य बुद्धीने पुढे केली जातात. प्रचलित असलेल्या सर्व अपसमजांतून अगदी न चुकता एक समान सूत्र ओवलेले आढळून येते. पुरुषप्रधान समाजव्यवस्थेत पद्धतशीरपणे पुरुषाला दोषी ठरवण्याचे टाळले असून सगळी जबाबदारी स्त्रीच्या अंगावर टाकली आहे.

बलात्कार हा माणसाने माणसाविरुद्ध केलेला सर्वांत भयंकर गुन्हा होय. स्त्रीच्या व्यक्तित्वावरच तो प्रहार करतो. गुन्हेगाराच्या नैतिक अधःपाताची ती एक निशाणी होय. अशा गुन्ह्याला प्रवृत्त होणाऱ्या माणसाच्या मनात स्वतःविषयी, एकूण मानवजातीविषयी काहीसा अनादर असल्याशिवाय असे कृत्य तो करू शकणार नाही. त्या त्या समाजाच्या सामाजिक व्यवस्थेतून, सांस्कृतिक मूल्यांतून ही मानवी अपप्रवृत्ती निर्माण होते. पुरुषीपणाचा भ्रामक अहंकार जोपासणाऱ्या सामाजिक मूल्यातून या अपप्रवृत्तीला प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षरीत्या खतपाणी मिळते. लहानपणापासून पुरुषांच्या मनात 'पुरुषपणा', 'पुरुषत्व' यासंबंधी जे सामाजिक–सांस्कृतिक आदर्श रुजविलेले असतात, त्यांचा हा एक अपरिहार्य परिणाम होय.

बलात्काराच्या प्रश्नावर आजपर्यंत जे संशोधन झाले आहे, अभ्यास झाला आहे त्यातून अनेक अनपेक्षित निष्कर्ष निघाले आहेत. बहुसंख्य स्त्रीअत्याचार हे पूर्वनियोजित असतात; जिथे प्रतिकाराची क्षमता कमी आहे किंवा प्रतिकार अपेक्षित नाही तिथे हे गुन्हे अधिक प्रमाणात घडतात आणि बहुसंख्य गुन्हेगार विवाहित असतात. या निष्कर्षांवरून समाजात बलात्काराविषयी जे समज प्रचलित आहेत ते कसे निखालस चुकीचे आहेत हे दिसून येईल.

बलात्काराच्या मुळाशी अनेक कारणे असू शकतात. स्वाभाविक, नैसर्गिक, लैंगिक प्रवृत्तीकडे पाहण्याची समाजाची एक विकृत दृष्टी जशी त्यातून व्यक्त होते, त्याचप्रमाणे बलात्कारामागे येनकेन प्रकारेण दुसऱ्या माणसावर वर्चस्व प्रस्थापित करण्याची, अवहेलना करण्याची विकृत व विघातक सुप्त वा उघड अशी जबरदस्त इच्छा असते. मग ते युद्ध, राज्यक्रान्त्या यांत होणारे संघटित अत्याचार असोत, की व्यक्तिगत अत्याचार असोत. बलात्काराचे हे वास्तव स्वरूप एकदा समजून घेतले तर लक्षात येईल की बलात्काराची समस्या केवळ कायद्याच्या मदतीने सुटणार नाही, बलात्कारावर आपल्याकडे जी तीव्र प्रतिक्रिया झाली, त्यातून कायद्यात सुधारणा करण्याची, शिक्षा कडक करण्याची मागणी पुढे आली. अर्थात कायद्यात सुधारणा होणे आवश्यक आहे. कोणत्याही सामाजिक प्रश्नाला कायद्याचे फार मोठे पाठबळ लाभू शकते, हे खरे आहे. पण केवळ कायद्याने मूळ प्रश्न सुटत नाही, हेही तितकेच खरे आहे. कायद्यात सुधारणा झाली, की बलात्काराला मोठा आळा बसेल, ही समस्या

सुटल्यात जमा होईल अशी जी एक हवा समाजात निर्माण होऊ पाहत आहे ती चुकीची तर आहेच, पण मूळ प्रश्नाला वळसा घालून तो सोडून दिल्यासारखे होणार आहे.

आपल्या देशात बलात्काराची 'बलात्कार' नव्हे तर स्त्रीला शीलभ्रष्ट, पतिता व कलंकिता मानणे हीच खरी आणि सर्वांत मोठी शोकांतिका आहे. पातिव्रत्याच्या व शीलभ्रष्टतेच्या आपल्या अन्यायी आदर्शांनी स्त्रीला घरातून व समाजातून बहिष्कृत केले जाते. बलात्काराने स्त्रीचे भावविश्व उद्ध्वस्त होते. शारीरिक, मानसिक व भावनिक दृष्ट्या जखमी झालेल्या स्त्रीला जीवनातून उठविण्याचे खरे कार्य नंतर कुटुंब व समाज करतो. अशी आपल्याकडे होणाऱ्या या बलात्काराच्या समस्येची दुहेरी शोकांतिका आहे. म्हणून बलात्काराचा लढा कायद्याच्या तराजूवर नव्हे, तर सामाजिक पातळीवरच प्रथम जिद्दीने लढवला पाहिजे. स्त्रीपावित्र्याची ही संकुचितकल्पना घुडकावून देतांना लोकापवाद येताच पत्नीचा त्याग करणारा राम आणि शरीरपावित्र्य सिद्ध करण्यासाठी अग्निपरीक्षा देणारी सीता यांचा आदर्श नवसमाजाला नाकारावा लागेल. याचा अर्थ असा, की बलात्काराच्या प्रवृत्तीचा परिपोष करणाऱ्या आजच्या पुरुषप्रधान समाजव्यवस्थेविरुद्ध आवाज उठवला पाहिजे. परंपरागत सामाजिक मूल्ये व सांस्कृतिक आदर्श यांविरुद्ध सामाजिक बंड उभारले पाहिजे.

स्त्रीची अब्रू म्हणजे काचेचे भांडे असे बाळकडू पाजणाऱ्या संस्कृतीविरुद्ध उभे राहण्याशिवाय बलात्काराच्या प्रश्नाला तोंड देण्यासाठी स्त्रीपुढे दुसरा पर्याय नाही. या अत्याचाराविरुद्ध उभे राहण्याइतपत स्त्रीचे व्यक्तित्व जेव्हा प्रतिकारक्षम व कणखर बनेल, वास्तवाचे तिला भान येईल तेव्हाच तिचे बलात्काराविरुद्ध पहिले पाऊल समर्थपणे उचलले जाईल.

बलात्कारित स्त्रीकडे पाहण्याची पौर्वात्य देशांतील दृष्टी किती दूषित आहे याचे, बांगला देशातील स्त्रियांवरील अत्याचार हे एक ज्वलंत उदाहरण होय. समाजाची ही दूषित दृष्टी बदलणे ही गोष्ट आज सर्वांत महत्त्वाची आहे. पण त्याच वेळी स्वतः स्त्रीची स्त्रीकडे पाहण्याची, स्वतःकडे पाहण्याची दृष्टी आमूलाग्र बदलणे त्याहीपेक्षा अधिक महत्त्वाचे आहे. स्वतःला स्त्रीने माणूस म्हणून, एक व्यक्ती म्हणून मान द्यायला शिकले पाहिजे; माणूसपणाची प्रतिष्ठा जपायला तिने सिद्ध झाले पाहिजे. त्यासाठी परंपरागत दुबळेपणाच्या, अबलत्वाच्या, पराभूत अशा स्त्रीत्वाच्या सांस्कृतिक कल्पना व आदर्श नष्ट करण्याचे आव्हान भारतीय स्त्रीचळवळीने स्वीकारणे आवश्यक आहे.

थोडक्यात आणखी एका मुद्द्याकडे मी आवर्जून समाजाचे लक्ष वेधू इच्छिते. बलात्काराची समस्या हा फक्त स्त्रियांचा प्रश्न आहे असा गैरसमज पुरुषांनी आणि स्वतः स्त्रियांनीही करून घेता कामा नये. बलात्काराचे गुन्हे करणाऱ्या साऱ्या पुरुषजातीचा हा प्रश्न आहे; पुरुषांच्या भ्रामक प्रवृत्ती हे या समस्येचे मूळ आहे हे आम्ही लक्षात घेतले पाहिजे. अत्याचाराला स्त्रिया बळी पडतात म्हणून तिला प्रतिकाराला सज्ज व्हावे लागेल; संघर्षाला उभे राहावे लागेल. पण अत्याचारी पुरुषजातीलाही याचे उत्तरदायीत्व पत्करून कठोर आत्मपरीक्षणाला तयार व्हायला हवे. आणि म्हणून बलात्काराचा लढा हा साऱ्या समाजाचा आहे; साऱ्या समाजानेच त्याविरुद्ध संघर्षाला उभे राहिले पाहिजे.









अनुक्रमणिका

# केंद्र-राज्य संबंध : राजकीय व सामाजिक पार्श्वभूमी

सत्यरंजन साठे

भारताच्या संविधानाने संघराज्यपद्धतीचा स्वीकार केला आहे का ? हा प्रश्न तात्त्विक पातळीवर अनेक वर्षे चर्चिला गेला. के. सी. व्हिलर ह्या तत्त्ववेत्त्याने संघराज्यपद्धतीचे जे निकष मांडले, ते अमेरिकेतील व ऑस्ट्रेलियातील संघराज्यीय सरकारांवरून घेतले असल्याने त्यांनुसार भारतीय संविधानाने पुरस्कारिलेले सरकार हे संघराज्यीय नाही– ते निमसंघराज्यीय (quasi federal) आहे असे त्यांनी मांडले, पण असे निकष जसेच्या तसे विभिन्न भौगोलिक व राजकीय-सामाजिक संदर्भात पाळणेच चूक, असा विचार त्यानंतर मांडला गेला. अमुक सरकार संघराज्यीय आहे की नाही हे त्यातील तरतुदींची छाननी करून त्यातून केंद्र व राज्ये ह्यांची अधिकारक्षेत्रे वेगळी आहेत की नाही, व एकाच वेळी दोन सरकारे काम करतात की नाही ह्यावरून ठरवायचे. संघराज्यपद्धती म्हणजे केंद्राला मोजके अधिकार देऊन सर्व उर्वरित अधिकार राज्यांना देणे येवढा संकुचित अर्थ करून भागणार नाही. अमेरिकेत किंवा ऑस्ट्रेलियात अधिकाराची तशी वाटणी झाली असेल तर त्याला त्या देशांतील राजकीय–सामाजिक–आर्थिक कारणे होती. कॅनडामध्ये त्याउलट व्यवस्था करण्यात आली. तिथे केंद्राला उर्वरित अधिकार देण्यात आले व राज्यांचे अधिकारक्षेत्र निर्देशित करण्यात आले. भारताच्या संविधानात तीच व्यवस्था स्वीकारण्यात आली. भारताच्या घटनाकारांनी केंद्रसरकारला जास्त अधिकार दिले व त्यास झुकते माप दिले हे निर्विवाद. पण त्यांना राज्ये म्हणजे केंद्राच्या मर्जीवर चालणारी निःसत्त्व सरकारे असावीत असे अभिप्रेत होते, असे म्हणता येणार नाही.

भारतात संघराज्यपद्धती १९३५ च्या कायद्यानुसारच यायची होती. त्यात ब्रिटिशांच्या प्रशासनाखाली असलेल्या भारतातील प्रांत, केंद्रसरकार व भारतीय नरेशांची संस्थाने ह्या तीन शासनांचा सहभाग व्हायचा होता. संस्थाने सामील झाली नाहीत व कॉंग्रेस पक्षाने असहकार पुकारला. त्यामुळे १९३५ चा कायदा अगदी स्वातंत्र्याची घोषणा होईपर्यंत अमलात आलाच नाही. पहिले भारतीय सरकार १९४७ मध्ये स्थापन झाले. व त्याकरता १९३५ चा कायदा, काही बदल करून अमलात आणण्यात आला. घटनासमितीमध्ये पहिला जो मसुदा आला, त्यात केंद्रसरकारला संरक्षण, परराष्ट्रसंबंध, चलन, परराष्ट्रीय व्यापार व आंतरप्रांतीय दळणवळण ह्यांसारख्या विषयांवर कायदे करण्याचे अधिकार देऊन इतर सर्व विषयांवर कायदे करण्याचे अधिकार राज्यांना असावेत अशी व्यवस्था होती. अखंड भारत राहणार ह्या गृहीतकृत्यावर ती सूचना आधारित होती. मुस्लिम लीग दुसऱ्या कुठल्याही व्यवस्थेला मान्यता देणार नाही ह्या जाणिवेमुळे तशी सूचना करण्यात आली असावी. परंतु एकदा फाळणी होणार हे निश्चित झाल्यावर ती सूचना रद्द झाली. फाळणीचा निर्णय झाल्यावर व त्यानंतरच्या जातीय दंगलींमुळे झालेल्या मनुष्य व मालमत्तेच्या हानीच्या अनुभवानंतर केंद्रसरकारला जास्त अधिकार असावेत हा विचार साहजिकच दृढ झाला.

इंग्रजपूर्व काळात भारत एक एकसंध राष्ट्र म्हणून अस्तित्वात नव्हता. ही एकसंधता इंग्रजी भाषेमुळे, इंग्रजी राज्यामुळे व एकन्यायपद्धतीमुळे स्थिरावली होती. भारताची परंपरा फुटीरतेची होती. एकराष्ट्रसंकल्पना कितपत खोल गेली आहे ह्याबाबत भारतातला बुद्धिजीवी वर्ग साशंक होता. भारताचा इतिहास हा फुटीरतेचा होता. सबंध भारताचा असा इतिहासही नव्हता. एकराष्ट्रीयत्व जोपासण्यासाठी भूतकाळाकडे बघता येणे कठीण होते. म्हणून भविष्यकालीन (Futuristic) उद्दिष्टेच एकात्मता साधण्यास उपयोगी पडणार होती. फाळणीनंतर त्या जातीय दंगलींची भीषणता, काही अंतर्गत शक्तींनी उठाव करण्यासाठी केलेल्या हाल-

चाली व नवजात स्वतंत्र भारताच्या संरक्षणाच्या समस्या ह्या सर्वांचा विचार घेऊन प्रबल केंद्र राज्य असावे हा निर्णय घटनाकारांनी घेतला.

प्रबल केंद्र सरकार असण्याचे आणखी एक कारण म्हणजे नव्या भारताच्या विकासासाठी योजनाबद्ध प्रयत्न करण्याचे धोरण काँग्रेसने स्वातंत्र्यपूर्व काळातच ठरवले होते. आर्थिक नियोजनाच्या धोरणाचे प्रणेते होते पंडित जवाहरलाल नेहरू आणि तेच भारताचे पहिले पंतप्रधानही झाले. काँग्रेस पक्षातल्या ज्या पुढाऱ्यांनी घटनेच्या जडणघडणीत प्रमुख जबाबदारी पार पाडली ते सर्व पुढारी राष्ट्रीय पातळीवरचे व सबंध भारताचे म्हणून ओळखले जात होते. प्रादेशिक नेतृत्व हे त्या वेळी एका अर्थाने अस्तित्वातच नव्हते. महात्मा गांधी हे गुजराथी होते, पण गुजराथी म्हणून कधीच त्यांची प्रतिमा नव्हती. नेहरू, पटेल, आझाद, राजाजी, पंत ह्या पुढाऱ्यांबाबतही असेच म्हणता येईल. काँग्रेसबाहेरचे जे पुढारी होते, तेही प्रादेशिक प्रतिमा असलेले नव्हते. डॉ. आंबेडकरांना कुणी फक्त महाराष्ट्रीय म्हणून ओळखत नव्हते. ह्या नेतृत्वाने अर्थातच संघराज्यपद्धती केवळ सोय म्हणून स्वीकारली. प्रादेशिक अस्मिता व स्वायत्तता ह्यांचा विचार त्या वेळी पुरेशा प्रमाणात झालाच नाही. शिवाय इंग्रजीशिक्षित मध्यमवर्गाला प्रादेशिक भाषा आणि प्रादेशिक अस्मिता ह्यांबाबत फारशी आत्मीयता नव्हती. प्रबल केंद्रराज्य असणे म्हणजे इंग्रजी भाषेचे महत्त्व कायम राहणे हे त्यांनी ओळखले होते व त्यामुळे तसे ते असणे त्यांना सोयीचे होते. भारतीय नागरिकत्व, एकन्यायव्यवस्था व अखिल भारतीय सनदी नोकरशाही ह्या तीन एकात्मतेच्या खुणा म्हणून घटनेत अग्रभागी ठेवण्यात आल्या. तसेच भारताच्या नागरिकांना भारताच्या कुठल्याही भागात संचार करण्याचे, वास्तव्य करण्याचे किंवा स्थायिक होण्याचे स्वातंत्र्य मूलभूत हक्क म्हणून देण्यात आले.

मग संघराज्यपद्धती का स्वीकारली ? ह्याची मुख्य कारणे माझ्या मते तीन होत. भौगोलिक दृष्टया संघराज्यपद्धती घेणे हे अनिवार्य होते. भारतासारख्या खंडप्राय देशाचे संचलन फक्त एका सत्ता-केंद्रातून होणे अत्यंत कठीण होते. राजकीय दृष्टया संघराज्यपद्धतीत राज्यकारभारात अनेकांचा सहभाग होऊ शकतो व त्यामुळे लोकशाही तळागाळापर्यंत नेण्यास मदतच होणार होती. प्रौढ मतदान व संघराज्यपद्धती ही भारतीय लोकशाहीस स्थैर्य देणारी साधने होती; कारण त्यामुळे सामान्य माणसाचे हितसंबंध लोकशाही शासनाशी निगडित होणार होते. दुसरे कारण असे, की जरी स्वातंत्र्याच्या क्षणाला प्रादेशिक राज्ये अस्तित्वात नव्हती तरी प्रादेशिक अस्मिता व निष्ठा ह्या अस्तित्वात होत्याच. त्या अस्तित्वात असण्यामुळे भारताच्या ऐक्याला बाध येतो असे काही लोकांना वाटते; पण ते खरे नाही. प्रादेशिक निष्ठा ही राष्ट्रनिष्ठेस पूरक असते, असायला हवी. मी भारतीय आहे, पण मी मराठी भाषिक आहे–आणि मी पुण्याचा आहे–ह्या सर्व निष्ठा एकत्र असू शकतात; नव्हे, असाव्यात. कारण तशा त्या असण्याशिवाय देशाचा विकास होणार नाही भाषावार प्रांतरचनेची मागणी १९२० पासून काँग्रेस पक्षाच्याच व्यासपीठावर होत होती. सत्तेचे विकेंद्रीकरण झाल्याने आर्थिक विकासास चालना मिळते. विकासाची प्रक्रिया वरून खाली येऊन चालत नाही; ती खालून म्हणजे खेड्यांपासून दिल्लीपर्यंत यायला हवी. ह्या सर्व कारणांमुळे संघराज्यीय चौकट घटनेत स्वीकारायची असे ठरले. त्याकरता १९३५ चा जो घटनाकायदा होता, तोच प्रमाणभूत मानला गेला. संघराज्याची महत्त्वाची तत्त्वे मान्य करण्यात आली : (१) दोन शासनव्यवस्था एकाच वेळी कार्यान्वित असणे. म्हणजे केंद्राचे सरकार व राज्यातील सरकारे वेगळी वेगळी असणे. ही राज्ये स्वतंत्रपणे निवडून आलेली, एकमेकांवर अवलंबून नसलेली. दोन्हींच्या अधिकारांचा उगम राज्यघटनेतूनच होतो. राज्यसरकार हे केंद्रसरकारचे 'डेलिगेट' नसून स्वतंत्र आहे, हेच ह्यावरून प्रतीत होते. (२) केंद्रसरकार व राज्यसरकारे ह्यांतील अधिकारक्षेत्राच्या सीमा राज्यघटनेने तपशीलात ठरवलेल्या; मात्र जास्त महत्त्वाचे अधिकार केंद्रसरकारकडे. तसेच उर्वरित अधिकारही केंद्राकडेच. पण जे अधिकार राज्यांना दिले त्यांवर त्यांचे सार्वभौमत्व मान्य. राज्यांना दिलेल्या विषयांवरही काही विशिष्ट परिस्थितीत कायदे करण्याचा अधिकार केंद्राला आहे. उदा., राज्यसभेने हजर असलेल्यांपैकी दोन तृतीयांश सभासदांच्या पाठिंब्याने संसदेने

राज्यांच्या क्षेत्रातील विषयांवर कायदा करावा, असे ठरवले तर किंवा आणीबाणी घोषित झाली असता किंवा दोन किंवा अधिक राज्यांनी ठराव करून पार्लमेंटला कायदा करण्यास सांगितले, तर पार्लमेंटला म्हणजेच केंद्रीय कायदेमंडळाला कायदा करता येतो. आंतरराष्ट्रीय कराराची कार्यवाही करण्याकरता जर आवश्यक असेल, तर राज्याच्या क्षेत्रातील विषयांवरही केंद्राला कायदा करता येतो. ह्याचा अर्थ असा आहे, की सातव्या परिच्छेदातील दुसऱ्या यादीत जे विषय नमूद केले आहेत, त्यांवर राज्यांनाच कायदे करता येतात. तर सांगितलेल्या अपवादात्मक परिस्थितीतच केंद्रास त्या विषयांवर कायदा करता येतो. पहिली यादी ही संपूर्णपणे फक्त केंद्रालाच कायदा करता येणाऱ्या विषयांची तर तिसरी यादी सामायिक म्हणजे केंद्र व राज्ये ह्या दोघांनाही त्यावर कायदे करता येतात. मात्र केंद्राने केलेला कायदा जर आधीच अस्तित्वात असेल आणि त्यावर राज्यांना कायदा करायचा असेल, तर राज्यांना राष्ट्रपतींची अनुमती मिळवावी लागते. कुठल्याही यादीत जो विषय नसेल त्यावर कायदा करण्याचा अधिकार केंद्रालाच म्हणजे यादी क्रमांक दोन वगळता सर्व विषयांवर कायदे करण्याचा अधिकार केंद्राला देण्यात आला आहे. शिवाय यादी क्रमांक एकमधील काही विषय असे आहेत, की त्यांवर कायदे केले असता, यादी क्रमांक दोनवरील विषयांबाबतचा राज्यांच्या कायदे करण्याच्या अधिकारांचा संकोच होतो. उदा., यादी क्रमांक दोनमधील २४ वा विषय हा उद्योगधंद्याबाबतचा आहे. उद्योगधंद्याबाबत कायदे राज्यांना करता येतात. मात्र ह्या अधिकार यादी क्रमांक एकवरील ७ व ५२ ह्या क्रमांकांच्या विषयांनी मर्यादित झाला आहे.

क्रमांक ७ प्रमाणे संरक्षणाशी निगडित असलेल्या उद्योगधंद्यांवर केंद्रच कायदे करते, तर क्रमांक ५२ प्रमाणे सामाजिक हिताकरिता जे उद्योगधंदे केंद्रीय नियंत्रणाखाली आवश्यक आहेत असे संसद ठरवते, त्यांवर कायदे केंद्रालाच करता येतात. ह्या ५२ क्रमांकाच्या विषयामुळे केंद्राचा उद्योगधंद्यांवर कायदे करण्याचा अधिकार वाढत गेला.

यादी क्रमांक दोनवर कायदे करण्याचा अधिकार जरी राज्यांना असला, तरी त्यावर दोन मर्यादा घालण्यात आल्या. एक म्हणजे राज्यांनी केलेल्या कायद्यास राष्ट्रपतींच्या संमतीकरता राखून ठेवण्याचा अधिकार राज्यपालांना देण्यात आला. काही विशिष्ट बाबतीतले कायदे तर राष्ट्रपतींच्या अनुमतीशिवाय केलेच जाऊ शकत नाहीत. राष्ट्रपती म्हणजे केंद्र सरकार. राष्ट्रपतींच्या संमतीकरता विधेयक राखून ठेवण्याचा अधिकार राज्यपालाने क्वचित व अपवादात्मक परिस्थितीतच वापरायला हवा; तसेच घटनाकारांना अभिप्रेत असावे; पण प्रत्यक्षात मात्र विधेयके राखून ठेवण्याची अनिष्ट प्रथा बोकाळली. मग विषय महत्त्वाचा असो वा नसो. राज्यपालाने विधेयक राष्ट्रपतींच्या संमतीसाठी राखून ठेवण्याची प्रथा रूढ झाल्यामुळे राज्यांच्या स्वायत्ततेस उगीचच बाध आला. भारतीय राज्यघटनेत आधीच केंद्राचे कायदे करण्याचे अधिकार व्यापक आहेत. राज्यांच्या सीमा ठरवणे, त्यांची नावे बदलणे हे सर्व अधिकार केंद्राला आहेत. घटनादुरुस्तीच्या प्रक्रियेतही काही अपवाद वगळता सहभाग देण्यात आलेला नाही. यादी क्रमांक दोनवरील विषयांपुरती तरी त्यांना स्वायत्तता हवी. विधेयके राष्ट्रपतींच्या संमतीसाठी राखून ठेवण्याच्या प्रथेमुळे ती स्वायत्तता नाकारण्यात येत आहे.

राज्यघटनेत कायदे करण्याच्या अधिकारांची वाटणी इतक्या तपशीलात करण्यात आली आहे, की अधिकारक्षेत्रांच्या संघर्षाची बीजेच त्यात रद्द झाली. त्यामुळे ह्या बाबतीत फारसे वाद झालेले नाहीत. जे झाले त्यांबाबत न्यायालयांनी यादीतील शब्दांना उदार अन्वयार्थ देऊन केंद्र-राज्य ह्यांच्या कायद्यांना मान्यता दिली. अधिकारक्षेत्राचे उल्लंघन केल्याच्या कारणावरून कायदे रद्दबातल झाल्याची फारशी उदाहरणे नाहीत. कायदे करण्याच्या अधिकारातच करवसुली व कर आकारण्याच्या अधिकाराचा समावेश आहे. प्राप्तिकर, मालमत्ता कर, अबकारी कर ह्यांसारखे कर केंद्राच्या क्षेत्रात आहेत तर जमिनीवरचा सारा, जमीन व इमारतीवरील कर, शेतकी उत्पन्नावरील कर ह्यांसारखे कर राज्यांच्या क्षेत्रात आहेत. कर जरी केंद्राने लादला असला व त्यानेच तो वसूल केला, तरी त्या करात राज्यांना वाटा मिळतोच. कर-भागिदारीची तत्त्वे फायनान्स कमिशन दर पाच वर्षांनी घालून देते व त्यांनुसार

ही विभागणी होते. राज्यांवर सर्व कल्याणकारी योजनांची जबाबदारी टाकण्यात आली आहे. शिक्षण, वैद्यकीय सेवा, पोलीस, कमकुवत लोकांसाठी व बेकारांसाठी सुविधा ह्यांसारख्या जबाबदाऱ्या राज्यांवर असून त्या मानाने त्यांची करआकारणीची क्षमता व एकंदर करआकारणीतला हिस्सा फार कमी आहे, असे म्हटले जाते. करआकारणीचे व्यापक अधिकार केंद्राला देण्यात अनेक हेतू आहेत. एक तर केंद्राजवळ जास्त कार्यक्षम अशी यंत्रणा आहे. दुसरे म्हणजे केंद्राला सर्व देशाच्या विकासाचा विचार करायचा असल्याने ज्या विभागांकडे पुरेसे लक्ष देण्यात आलेले नाही, जे मागे राहिले आहेत त्यांना जास्त साधनसंपत्ती पुरवता येते. त्या-उलट, राज्यांनी आपल्या करआकारणीच्या अधिकाराचा उपयोगच न केल्याचे आढळते. सर्वत्र लोकप्रियतेसाठी करात सवलती देण्याकडेही राज्य-सरकारांचा कल असतो. पण केंद्राला राज्यांना अनुदान द्यायचा जो अधिकार घटनेत आहे तो सर्वांत निर्णायक आहे. हे अनुदान विकास कार्या-करता देण्यात येते– तसेच भूकंप, दुष्काळ, पूर ह्यांसारख्या दुर्घटनांमुळे निर्माण झालेल्या परिस्थि-तीला तोंड द्यावयासही देण्यात येते. नियोजनमंडळ ही संस्था शासकीय ठरावानुसार स्थापन झाली आहे. त्या मंडळावर राज्यशासनाचे प्रतिनिधित्व नसते. अनुदान देण्याबाबत पक्षपात होण्याची शक्यता आहे व तसा तो होतो अशी कॉंग्रेसेतर राज्य-सरकारांची तक्रार आहे. केंद्र–राज्य संबंधातील आर्थिक बाब ही अत्यंत महत्त्वाची आहे. पैशाच्या नाड्या केंद्राच्या हातात असल्याने राज्यांच्या स्वायत्ततेला मर्यादा पडतात. सरकारिया आयोगाला ह्याबाबत अभ्यास करून मार्ग सुचवणे आवश्यक होईल. राज्यांनी आपल्या कार्यकारी अधिकारांचा वापर करताना केंद्राने केलेल्या कायद्यास किंवा त्या कायद्याच्या कार्यवाहीस अडथळा होणार नाही, ह्याची काळजी घेतली पाहिजे. केंद्राला त्याने केलेल्या कायद्यांच्या कार्यवाहीबाबत राज्यांना आदेश देण्याचा अधिकार आहे. केंद्राच्या क्षेत्रातील जबाबदारी राज्यांवर किंवा राज्यांच्या प्रशासकीय अधिकाऱ्यां-वर त्या राज्यांच्या संमतीने टाकता येते. ह्या जबाबदारीकरता जो जादा खर्च करावा लागेल, त्याबद्दल भरपाई केंद्राकडून राज्याला मिळते. राज्यांनाही आपली जबाबदारी केंद्रावर सोपवता येते. ह्या तरतुदी केंद्र-राज्य सहकार्यास पोषक आहेत.

केंद्राला कायदे करण्याच्या अधिकाराच्या नात्यात जरी झुकते माप दिलेले दिसते, तरी संघराज्यपद्ध-तीचा स्वीकार घटनाकारांनी निःसंदिग्धपणे केल्याचे दिसते. उदा., राष्ट्रपतीच्या निवडणुकीत राज्यांच्या विधानसभांच्या सभासदांना व संसदेच्या सभासदांना मतदान करता येते; एवढेच नव्हे, तर संसदसद-स्यांच्या मतसंख्येइतकेच मूल्य विधानसभा सद-स्यांच्या मतसंख्येस देण्यात आले आहे. राज्यसभा हे संसदेचे दुसरे सभागृह आहे व त्यात राज्यांना प्रतिनिधित्व देण्यात आले आहे. घटनादुरुस्तीच्या प्रक्रियेत केंद्र–राज्य संबंधाबाबतच्या तरतुदीबाबत कमीत कमी अर्ध्याहून अधिक राज्यांच्या विधान-सभांची संमती आवश्यक ठरविण्यात आली आहे.

केंद्र–राज्य संबंधाबाबत राज्यघटनेत लवचीकता आहे. ह्याचे उत्तम उदाहरण म्हणजे जम्मू व काश्मीर ह्या राज्याला दिलेला खास दर्जा. कलम ३७० प्रमाणे ह्या राज्याबाबत केंद्राला कायदे करण्याचा मर्यादित अधिकार आहे. सामील होताना विलीनीकरणकरारात ज्या विषयांवर कायदे करण्याचे अधिकार भारत सरकारला देण्यात आले त्यांच्या व्यतिरिक्त सर्व विषयांवर कायदे करण्याचा अधिकार जम्मू आणि काश्मीरच्या विधिसभेला आहे. भारतीय राज्यघटनेची फक्त कलम १ व ३७० ही त्या राज्याला लागू होती. इतर तरतुदी लागू करायच्या झाल्यास राज्यसर-कारची अनुमती लागते. काश्मीरच्या बाबतीत ३५६ सारखे कलम लागू करायचे झाल्यास जम्मू आणि काश्मीरच्या घटनेप्रमाणे राज्य सरकार चालत नाही असा अहवाल यावा लागेल. शिवाय जम्मू आणि काश्मीरच्या घटनेप्रमाणेही राज्य सर-कार चालत नाही असा निर्णय घ्यावा लागेल. केंद्र सरकारचा त्या बाबतीतला निर्णय मात्र अंतिम असतो. म्हणजे इतर राज्यांप्रमाणेच जम्मू-काश्मी-रातही राष्ट्रपती-राजवट आणली जाऊ शकते. पण प्रत्यक्षात आजवर राष्ट्रपती-राजवट कधीच आणली गेली नाही. काश्मीर प्रश्नाची आंतरराष्ट्रीय

गुंतागुंत पाहता केंद्र सरकारने त्या राज्याबाबत जे संयमाचे धोरण अवलंबिले ते योग्यच होते. पण असेच धोरण इतर राज्यांबाबत का अवलंबू नये ? कलम ३५६ अपवादात्मक परिस्थितीत वापरायचे हत्यार आहे. ज्या वेळी राज्यात कुठल्याच पक्षाला बहुमत नसेल, त्या वेळी राष्ट्रपतीची राजवट आणणे योग्य. पण बहुमत आहे की नाही हे मात्र सभागृहातील मतदानानेच ठरायला हवे. ह्या बाबतीत दुर्दैवाने केंद्रसरकारने अनुदार धोरणच अवलंबिल्याचे दिसते. विरुद्ध पक्षांची सरकारे या ना त्या प्रकारे पाडण्यासाठी ह्या कलमाचा उपयोग केला गेला. १९५९ मध्ये केरळातले कम्युनिस्ट सरकार विधिसभेत बहुमताचा पाठिंबा असताना बडतर्फ करण्यात आले. १९६७ मध्ये बंगालमधील अजय मुखर्जींचे सरकार, त्या सरकारास विधिसभेत बहुमताचा पाठिंबा नाही हे प्रत्यक्ष मतदानावरून सिद्ध होण्यापूर्वीच बडतर्फ करण्यात आले. १९७७ मध्ये केंद्रीय सरकार जनता पक्षाचे असताना एक अत्यंत अनिष्ट व घटनाविरोधी अशी कृती करण्यात आली. लोकसभेच्या निवडणुकीत काँग्रेस पक्षाचा दणदणीत पराभव झाला होता. पण अनेक राज्यांत काँग्रेस सरकारे होती. लोकसभा निवडणुकीत काँग्रेस पक्षाला दारुण पराभव पत्करावा लागला, त्याअर्थी त्या पक्षाच्या राज्यसरकारांनी पुन्हा लोकमत अजमावले पाहिजे ह्या गृहीतकृत्यावर केंद्रसरकारने कलम ३५६ खाली ९ राज्यांत विधानसभांचे विसर्जन केले व त्या राज्यांची सरकारे बडतर्फ करून तिथे राष्ट्रपती-राजवट आणली. हा युक्तिवाद संघराज्यपद्धतीशी संपूर्ण विसंगत आहे. दुर्दैवाने या निर्णयावर सर्वोच्च न्यायालयाने शिक्कामोर्तब केल्याने तो एक घटनात्मक पायंडाच पडला.

१९८० मध्ये लोकसभा निवडणुकीत जनता पक्षाचा दारुण पराभव झाला व पुन्हा इंदिरा गांधींचे राज्य आले. त्या सरकारने त्या पायंड्याचा उल्लेख करून काँग्रेसेतर सरकारे असलेल्या राज्यांमध्ये राष्ट्रपती-राजवट आणली. घटनेत जरी राज्यांची स्वायत्तता तत्वतः मान्य असली, तरी प्रत्यक्षात ती अमलात आली नाही. जिथे काँग्रेस पक्षाचीच सरकारे होती तिथे पक्षातील अंतर्गत राजकारणामुळे राज्यसरकारे कोसळली. पक्षात अंतर्गत लोकशाही नामशेष झाल्यामुळे राज्यातील नेतृत्व हे केंद्रीय हायकमांडकडूनच निवडले जाऊ लागले. ह्यामुळे साहजिकच राज्यात नेतृत्व निर्माण होणे थांबले. जे नेतृत्व पुढे आले ते संपूर्णतः केंद्रीय उच्च पदस्थांवर आणि मुख्यतः पंतप्रधान व त्यांचे चिरंजीव यांच्या कृपेवर अवलंबून असलेलेच. ह्या नेत्यांना स्वतःचा आत्मविश्वास राहिला नाही. पक्षातील एकमेकांना पाडण्याच्या वृत्तीमुळे अस्थिरता आली. मग मुख्यमंत्री सारखे दिल्लीला धावू लागले, पंतप्रधान आणि इतर वरिष्ठ नेत्यांचे अनुनय करू लागले. विरोधी पक्षांची सरकारे एक तर पाडण्यात आली किंवा त्या सरकारांना स्वायत्ततेबाबत तडजोड करावी लागली. राष्ट्रपती-राजवट आणण्याची तरतूद ही अपवादात्मक परिस्थितीतच वापरली जावी हे त्या तरतुदीमागील गृहीतकृत्य विसरले गेले. राज्यांनी पास केलेल्या विधेयकांना राज्यपालाची संमती लागते. राज्यपाल ती देईल किंवा न देईल. शिवाय ते विधेयक राष्ट्रपतींच्या संमतीसाठी राखून ठेवण्याचाही त्याला अधिकार आहे. अर्थातच जिथे एखाद्या विधेयकामुळे केंद्र-राज्य संबंधांना किंवा घटनेने दिलेल्या मूलभूत अधिकारांना बाध येत असेल, तिथेच हा अधिकार वापरला जावा असे घटनाकारांना अभिप्रेत होते. पण प्रत्यक्षात मात्र ह्या अधिकाराचा वापर सरसकट होत असल्याचे दिसते. काँग्रेस सरकारे आपल्यावर जबाबदारी नको किंवा वरिष्ठ नेत्यांची नामर्जी नको म्हणून विधेयके राखून ठेवण्याचा सल्ला देतात व काँग्रेसेतर सरकारांचे राज्यपाल केंद्राची आपल्यावर नामर्जी नको म्हणून तसेच करतात.

आपल्या राज्यघटनेत संसदीय शासनपद्धतीचा स्वीकार करण्यात आला. ह्या पद्धतीनुसार विधिसभेत बहुमताचा पाठिंबा असणाऱ्या पक्षाचे राज्य असते. केंद्रात पंतप्रधान व राज्यांमध्ये मुख्यमंत्री हे त्या सरकारचे नेते असतात. राष्ट्रपती हा केंद्रसरकारच्या प्रमुखपदी असतो. तो संसदेच्या दोन्ही सभागृहांच्या सभासदांकडून व राज्य विधानसभांच्या सभागृहांच्या निवडून आलेल्या सभासदांकडून निवडला जातो. त्याची मुदत ५ वर्षांची असते. पण त्याने मंत्रिमंडळाच्या सल्ल्यानेच वागले पाहिजे, हा नियम सुरवातीला संकेतांवर ठेवलेला होता. कारण

इंग्लिश घटनापद्धतीचा स्वीकार करताना त्या पद्धतीला अभिप्रेत असणारे संकेत व अलिखित नियमही लेखी तरतुदीबरोबर कार्यवाहीत येतील अशी अपेक्षा होती. राष्ट्रपती मंत्रिमंडळाच्या सल्ल्याने वागण्यास बांधला आहे किंवा नाही ह्या विषयावर उलट सुलट चर्चा झाली आहे. जे घटनेच्या शब्दांवरच जोर ठेवून बोलत, ते अर्थातच तो बांधलेला नाही असा निष्कर्ष काढत. १९७६ साली बेचाळिसाव्या घटनादुरुस्तीने मात्र राष्ट्रपतींनी मंत्रिमंडळाच्या सल्ल्यानेच वागले पाहिजे अशी स्पष्ट व निःसंदिग्ध अशी तरतूद करण्यात आली. राष्ट्रपती जसा केंद्रात तसाच राज्यपाल राज्यामध्ये असतो. पण राज्यपाल हा निवडला जात नाही. त्याची नेमणूक राष्ट्रपती (मंत्रिमंडळाच्या सल्ल्याने) करतात आणि राष्ट्रपतींची मर्जी असेतोवरच तो अधिकारावर राहतो. एका बाजूला तो राज्यसरकारचा घटनात्मक प्रमुख आहे. त्या भूमिकेनुसार त्याने मंत्रिमंडळाच्या सल्ल्याने वागायला हवे. पण दुसऱ्या बाजूने त्याच्यावर काही जबाबदाऱ्या टाकण्यात आल्या आहेत. उदा., राज्यातले विधेयक राष्ट्रपतीच्या संमतीकरता राखून ठेवणे किंवा राज्याचे सरकार घटनेप्रमाणे चालत नसून घटनात्मक प्रक्रिया कोसळली आहे असा अहवाल राष्ट्रपतींना सादर करणे. ही कामे मंत्रिमंडळाच्या सल्ल्याने करताच येणार नाहीत. ह्या अधिकाराचा मोठ्या प्रमाणावर दुरुपयोग झाला आहे. राज्यपालपद हे पक्षस्वार्थाकरता वापरण्यात आल्याची उदाहरणे आहेत. राज्यपालपदी दुर्दैवाने राजकारणातून बाद झालेल्या राजकारण्यांची किंवा निवृत्त सनदी नोकरांचीच वर्णी लागली असल्याचे दिसते. काही अपवाद वगळता आपली स्वतःची प्रतिमा किंवा छाप राज्यपालाने पाडल्याचे अनुभवास आलेले नाही.

राज्यपाल हा निवडलेला असावा, असा पर्याय घटनासमितीपुढे आला होता ; पण तो मुद्दामच नाकारण्यात आला. निवडून आलेला राज्यपाल व निवडून आलेला मुख्यमंत्री ह्यांत स्पर्धा होण्याची शक्यता वाटल्याने हे झाले असणे शक्य आहे. राज्यपाल हा स्थानिक राजकारणापासून अलिप्त असावा म्हणूनच तो त्या प्रांतातला नसावा असेही एक कारण असणे शक्य आहे. इंग्रजी राज्यात परका माणूस हा चांगला न्याय करतो अशी समजूत दृढ झाली होती, त्याचाच हा अंश असावा. काही प्रमाणात लोकशाहीवरचा अविश्वासही त्याच्या मागे आहे. पण ह्या सर्वांचा परिणाम असा झाला, की राज्यपाल हा केंद्रसरकारचा प्रतिनिधी ही प्रतिमा खोलवर कोरली गेली. त्यामुळे त्याच्यावर केंद्रसरकारच्या बाजूने वागण्याचे दडपणही आले आणि पक्षीय राजकारणात ज्या पक्षाचे केंद्रसरकार, त्या पक्षाचे हित हेच केंद्रसरकारचे हित असा समजही करून देण्यात आला. ह्यामुळे राज्यपाल हा पक्षपाती, केंद्रसरकारचा हस्तक ह्या स्वरूपात अनेक वेळेला दिसला आहे हे सत्य आहे.

केंद्र-राज्य संबंधाबाबतच्या घटनेतील तरतुदींमध्ये फारसे आक्षेपार्ह नाही असे माझे मत आहे. त्यांच्या आर्थिक संबंधाबाबत काही उपाय करावे लागतील व त्या सरकारिया आयोगाने सुचवाव्यात. इतर उपाय मात्र घटनेसंबंधीचे नसून कार्यकारिणीसंबंधीचे आहेत. कलम ३५६ मधील अधिकार कुठल्या परिस्थितीत वापरले जावेत ? राज्याचे विधेयक राष्ट्रपतीच्या संमतीसाठी केव्हा राखून ठेवण्यात यावे ? राज्यपालाची नेमणूक कोणत्या निकषांवर व्हावी ? केंद्र–राज्य संबंध जास्त सलोख्याचे होण्यासाठी काय करावे ? ह्या प्रश्नांची उत्तरे सरकारिया आयोगाला द्यावी लागतील. ह्या बाबतीत एक गोष्ट सांगावीशी वाटते. उदारमतवादी लोकशाही शासनपद्धतीचा साचा आपण ज्या देशांच्या घटनांमधून घेतला, त्यांच्या अलिखित संकेतांनाही आपण स्वीकारायला हवे होते. तसे व्हायचे, तर राजकर्त्या पक्षावरच ती जबाबदारी अधिक असते. लेखी कायद्यावर बोट ठेवून लोकशाही चालत नाही तर लोकशाहीला अभिप्रेत असलेली नैतिक मूल्ये ही लोकशाही राबवणाऱ्या सर्व व्यक्तींवर व संस्थांवर बंधनकारक समजली जाणे आवश्यक आहे. इंग्लंडमध्ये प्रोफ्यूमोला मंत्रिपद गमवावे लागते –पार्किन्सला राजीनामा द्यावा लागतो. ह्याचे कारण लेखी कायद्यात तशी तरतूद आहे हे नसून इंग्रजी जनतेत त्या नैतिक मूल्यांना फार मोठे स्थान आहे. आपण फक्त लेखी कायदा घेतला पण त्या कायद्याला पूरक असणारे अलिखित नियम मानले नाहीत. म्हणूनच पक्षांतरा-

अनुक्रमणिका

सारख्या पद्धती आपल्याकडे बोकाळल्या. सरकारिया आयोग नेमून किंवा त्या आयोगाने शिफारशी करून केंद्र–राज्य संबंधात सुधारणा होईल अशी कुणाची समजूत असेल तर ती फार भोळेपणाची आहे. घटनेच्या तरतुदी त्यातल्या आशयासह कार्यवाहीत आणण्याची जबाबदारी सर्व राजकीय पक्षांची आहे. त्यांनी संयम व निष्ठा या दोन्ही गुणांचा वापर केला तर हे होणे कठीण नाही.

○ ○ ○





अनुक्रमणिका

# केंद्र–राज्य वित्तीय संबंध : शोध आणि बोध

दिगंबर रघुनाथ राणे

केंद्र व राज्य संबंधाचा प्रश्न संघराज्यात निर्माण होत असतो. त्यातही वित्तीय संबंधाचा प्रश्न विशेष महत्त्वाचा असतो. अमेरिका, ऑस्ट्रेलिया, कॅनडा, स्वित्झर्लंड ही जगातील प्रमुख संघराज्ये. तसेच अलीकडच्या काळात नव्याने प्रस्थापित झालेले भारत हेसुद्धा मोठे संघराज्य होय. संघराज्यात केंद्र, राज्य व स्थानिक अशी त्रिस्तरीय शासनपद्धती अस्तित्वात असते. हे तीन घटक समान दर्जाचे व स्वायत्त मानले जातात आणि त्या दृष्टीने त्यांच्यांत कायदेविषयक, कार्यकारी व वित्तीय अधिकार व सत्ता यांचे विभाजन केले जाते. घटना सार्वभौम, निरंकुश, सर्वश्रेष्ठ मानली जाते. घटनेनेच वरील तीनही राज्यघटकांचे अधिकार, सत्ता, कर्तव्ये, मार्गदर्शक तत्त्वे व त्यांच्या मर्यादा, जबाबदाऱ्या इ. नियंत्रित केले जातात. त्यांच्यांत समन्वयी प्रशासनाची मूल्ये व घटनात्मक सार्वभौमत्व प्रमाणभूत असतात. भारतीय प्रजासत्ताकाच्या स्थापनेनंतर केंद्र व राज्ये यांच्यांत विशिष्ट संबंध घटनेच्या चौकटीत राहून प्रस्थापित झालेले आहेत. मागचा अनुभव व अडचणी लक्षात घेऊन बदलत्या परिस्थितीच्या संदर्भात हे संबंध अधिक सुदृढ, फलदायी व व्यापक करण्याच्या दृष्टीने, त्यांचे नव्याने परीक्षण करून शिफारशी करण्याकरिता एकसदस्य आयोग नेमण्याची घोषणा पंतप्रधान इंदिरा गांधींनी नुकतीच केलेली आहे. शिवाय आठवा वित्तआयोगही कार्यरत आहेच. कार्यविभाजन, विकेंद्रीकरण, आर्थिक न्याय, समता, स्वातंत्र्य, सहकार्य, स्वायत्तता, जबाबदारी, युक्तता, मितव्ययता, कार्यक्षमता, लवचीकता, पर्याप्तता ही संघराज्याच्या वित्तीय व्यवहारांची प्रमुख लक्षणे होत.

## उत्क्रांतीचा परिपाक

भारताच्या विकसनशील अर्थव्यवस्थेत सार्वजनिक वित्तव्यवहारांना अनन्यसाधारण महत्त्व आहे. त्यांचे क्षेत्र, व्याप्ती केवळ राज्याच्या उत्पन्न व खर्च यांपुरतीच मर्यादित नाही. त्यांना सामाजिक आशयही प्राप्त झालेला आहे. आर्थिक न्यायाच्या दृष्टीने संपत्ती, उत्पन्न व संधी यांची विषमता कमी करणे, मागास राज्यांना व वर्गाला झुकते माप देणे, आर्थिक विकासाची गती वाढविणे हेसुद्धा संघराज्यीय वित्तीय धोरणाचे महत्त्वाचे उद्दिष्ट आहे. ऐतिहासिक दृष्टया भारतीय संघराज्याचे वित्तीय व्यवहार विविध अवस्थांतून उत्क्रान्त होत गेलेले दिसतात व त्यांनुसार केंद्र–राज्य वित्तीय संबंधांचा विकास होत गेलेला आढळतो. ब्रिटिश राजवटीत भारत हे एककेंद्री राज्य होते. त्यामुळे वित्तीय व्यवहारांतही केंद्रीकरणाचे धोरण स्वीकारलेले होते. परंतु त्यामुळे अनेक अडचणींना तोंड द्यावे लागत असे. त्यावर उपाय म्हणून प्रथम लॉर्ड मेयोने १८७१ मध्ये अर्थसत्तेच्या विकेंद्रीकरणास सुरवात केली. त्यानुसार केंद्र व प्रांत दोहोंमध्ये आर्थिक कार्ये व अधिकार ह्यांची विभागणी केली गेली. लॉर्ड रिपनच्या सुधारणा, १९१९ चा भारत शासन कायदा, १९२० चा मेस्टन निवाडा, मॉंटेग्यू–चेम्सफोर्ड सुधारणा, नेमिभार निवाडा, देशमुख निवाडा, १९३५ चा प्रांतिक स्वायत्तता कायदा इत्यादींमुळे भारताच्या आय-व्ययपद्धतीत आमूलाग्र बदल झाले. विशेषतः १९३५ चा कायदा हा वित्तीय संबंधाच्या विकेंद्रीकरणाच्या दृष्टीने फार महत्त्वाचा टप्पा होता. या कायद्याने संघराज्य अस्तित्वात आले व प्रांतांना स्वायत्तता मिळाली. उत्पन्नाच्या बाबींचे केंद्रीय, प्रांतिक व सामुदायिक असे वर्गीकरण करण्यात आले. १९५० मध्ये भारताची नवी राज्यघटना अस्तित्वात आली. घटनेत केंद्र–राज्य वित्तीय संबंधांच्या सविस्तर तरतुदी करण्यात आल्या. अशा प्रकारे आज अस्तित्वात असलेली केंद्र–राज्य वित्तीय संबंधाची व्यवस्था दीर्घकालीन उत्क्रांतीचा परिपाक होय.

अनुक्रमणिका

## घटनात्मक तरतुदी

भारतीय राज्यघटनेतील वित्तीय तरतुदींवर १९३५ च्या कायद्याचा प्रभाव पडलेला असला, तरी १९३५ च्या कायद्यातील तरतुदींपेक्षा व इतर संघराज्यांच्या तुलनेने भारतीय संघराज्यातील वित्त-साधनांची विभागणी अधिक तर्कसंगत व परिपूर्ण आहे.

केंद्र व राज्ये या दोहोंत उत्पन्न आणि खर्च यांविषयीचे अधिकार वाटून देण्यात आलेले आहेत. काही निश्चित तत्त्वे व तरतुदी ग्रथित केलेल्या आहेत. केंद्र-राज्य वित्तीय संबंधाची यंत्रणा व तरतुदी घटनेच्या ११ व्या विभागात अप्रत्यक्षपणे, व १२ व्या, १३ व्या विभागांतील सातवे परिशिष्ट कलम २४६, २६८ ते २९३ मध्ये प्रत्यक्ष स्वरूपांत विशद करण्यात आलेल्या आहेत. त्यांपैकी २६९, २७०, २७२, २७५, २८०, २८१ ही कलमे वित्त-आयोगा-संबंधी आहेत. अभ्यासाच्या सोयीकरिता ह्या तरतुदींचे वर्गीकरण पुढीलप्रमाणे करता येईल : (१) उत्पन्नसाधनांची विभागणी, (२) कर-उत्पन्नाचे वाटप, (३) कर्जविषयक तरतुदी, (४) साहाय्यक अनुदाने, (५) खर्चविषयक तरतुदी (६) वित्त-आयोगाची नेमणूक.

कर हे उत्पन्नाचे प्रमुख साधन आहे. शिवाय कर्ज, अनुदाने, परकीय कर्ज, तुटीचा अर्थभरणा करणे हे-सुद्धा उत्पन्नाचे मार्ग आहेत. परंतु ह्या सर्व उत्पन्न-साधनांच्या बाबतीत केंद्र व राज्ये यांना समान अधिकार नाहीत. काही साधनांचे उत्पन्न केंद्राकडून राज्यांना संक्रमित होते. परकीय कर्ज व तुटीचा अर्थभरणा हे मार्ग केवळ केंद्रालाच उपलब्ध आहेत. करउत्पन्नाच्या वाटपासंबंधी तरतुदी हे भारतीय राज्यघटनेचे एकमेव वैशिष्टय म्हटले पाहिजे. करविषयक अधिकार २४६ कलमान्वये केंद्रसूची व राज्यसूचीमध्ये समाविष्ट केलेले आहेत. करविषयक सामायिक सूची नाही. त्यामुळे एकाच कराचा अधिकार केंद्र व राज्ये दोघांना प्राप्त होत नाही. जे कर केंद्रसूची व राज्यसूचीत नाहीत त्या अवशिष्ट करांची आकारणी करण्याचे अधिकार केंद्राला आहेत. घटनेच्या सातव्या परि-शिष्टातील पहिली यादी म्हणजे केंद्रसूची होय. तीत केंद्राच्या अखत्यारीतील करांचा समावेश होतो. त्यांचे वर्गीकरण चार प्रकारांत करता येते : (अ) ज्यांची आकारणी, वसुली केंद्र करते व ज्यांचे संपूर्ण उत्पन्नही केंद्रालाच मिळते असे कर; (ब) ज्यांची आकारणी व वसुली केंद्र करते, पण ज्यांचे उत्पन्न केंद्र व राज्ये यांच्यांत वाटून दिले जाते असे कर; (क) केंद्र आकारणी व वसुली करते, परंतु संपूर्ण उत्पन्न केवळ राज्यांना वाटून देते असे कर; (ड) ज्यांची आकारणी केंद्र करते, परंतु वसुली राज्यांकडून केली जाते व ज्यांचे सर्व उत्पन्न राज्यांकडेच राहते असे कर. केंद्रसूचीत प्रामुख्याने उत्पन्न, खर्च, संपत्ती, मालमत्ता यांच्या-वरील प्रत्यक्ष कर आणि वस्तू व सेवांवरील अप्रत्यक्ष करांचा समावेश होतो.

## राज्यसूची

घटक राज्यांच्या अखत्यारीतील १९ प्रकारचे कर दुसऱ्या यादीत नमूद केलेले आहेत. या करांची आकारणी, वसुली व उत्पन्नाचे सर्व अधिकार केवळ राज्यांकडे आहेत. शेती, उत्पन्न, व्यवसाय, माल-मत्ता व भांडवली वस्तूंवरील प्रत्यक्ष कर, वस्तू व सेवांवरील अप्रत्यक्ष कर यांचा प्रामुख्याने राज्य-सूचीत समावेश होतो. स्वतःच्या कराशिवाय, केंद्रीय कर्जे, स्वत: उभारलेली कर्जे, सहायक अनु-दाने, केंद्रीय करांचा वाटा, कर्जावरील व्याज, राज्यांच्या अधिकारांतील सार्वजनिक सेवा, उप-क्रम, उद्योग, इतर आर्थिक मदत इत्यादींच्या द्वारेही राज्यांना उत्पन्न मिळते. करविभागणीच्या घटना-त्मक तरतुदीवरून हे स्पष्ट होते, की प्रगतिशील, राष्ट्रीय महत्त्वाचे व आंतरराज्यीय कर केंद्राकडे, तर स्थानिक दृष्टया महत्त्वाचे कर राज्यांकडे सोपविलेले आहेत. करांची न्याय्य आकारणी, एक-वाक्यता, कार्यक्षम वसुली, संरक्षण, आर्थिक विकास व कल्याण इत्यादींवरील वाढता खर्च यांमुळे उत्पन्न-साधनांचे केंद्रीकरण होते व अधिक उत्पन्नाचे कर केंद्राच्या अधिकारकक्षेत जातात. याविरुद्ध विकास व लोककल्याणाची महत्त्वाची कार्ये राज्यांकडेच अधिक सोपविलेली आहेत. परंतु त्या मानाने त्यांची उत्पन्न-साधने कमी पडतात. त्यामुळे कार्ये व उत्पन्नसाधने यांमध्ये असमतोल उद्‌भवतो. ही शक्यता लक्षात घेऊन भारतीय घटनेने पुढील संतुलक उपाययोज-नांची तरतूदही केलेली आहे : (१) साधारणतः

अनुक्रमणिका

केंद्राला राज्यांच्या मालमत्तेवर व उत्पन्नावर कर बसविता येत नाही, तर राज्यांना केंद्रीय मालमत्ता व उत्पन्नावर कर बसविता येत नाही. (२) विभाज्य करांच्या तरतुदी केलेल्या आहेत. प्राप्तिकर राज्यांमध्ये वाटून द्यावाच लागतो, परंतु उत्पादन-कराची वाटणी ऐच्छिक आहे.

## सहायक अनुदाने

घटनेच्या २७५ (१) कलमान्वये राज्यांच्या कल्याण व विकासखर्चातील तूट भरून काढण्याकरिता, वित्त आयोग ठरवील त्या उद्दिष्टांकरिता, आवश्यक त्या प्रमाणात राज्यांना सहायक अनुदाने देण्याचे अधिकार संसदेला आहेत. ह्या अनुदानांमुळे, मागासराज्यांना आवश्यक मदत मिळते, वर्गीकृत जाती-जमातींचे कल्याण, समतोल विकास यांकडे अधिक लक्ष देता येते, प्रशासनाचा दर्जा सुधारतो, राज्यांच्या कल्याण व विकासयोजनांवर नियंत्रण ठेवता येते, समन्वय साधता येतो आणि केंद्र-राज्य संबंध अधिक दृढ होतात. कलम २८२ अन्वये केंद्र किंवा कोणतेही राज्य दुसऱ्या कोणत्याही सरकारला, कोणत्याही सार्वजनिक हेतूंसाठी अनुदाने देऊ शकतात.

## कर्जे

घटनेतील तरतुदीप्रमाणे, केंद्र व राज्ये स्वतः कर्जे उभारू शकतात. परंतु केंद्राकडून राज्यांना कर्जे उपलब्ध करून देण्याची व्यवस्था करण्यात आली आहे. घटनेच्या २९२ व २९३ कलमान्वये केंद्र व राज्ये एकमेकांकडून कर्जे घेऊ शकतात. अलीकडच्या काळात ह्या कर्जांमध्ये लक्षणीय वाढ झालेली आहे. करांचे हिस्से व अनुदाने यांच्यापेक्षाही त्यांचे प्रमाण जास्त आहे. ही कर्जे प्रामुख्याने भांडवली स्वरूपाच्या विकासखर्चाकरिता वापरली जातात. उदा., – पाणीपुरवठा योजना, धरणे, शेतीविकास, पुनर्वसन, समाजविकास योजना, औद्योगिक घरबांधणी इत्यादी. ह्या कर्जांच्या द्वारे केंद्रशासनाला राज्यांच्या कर्ज व खर्चव्यवहारांवर प्रभावी नियंत्रण ठेवता येते व घटक राज्यांना आपले आर्थिक प्रश्न सोडविण्यास मदत होते.

## वित्त आयोगाची नियुक्ती

भारताच्या राज्यघटनेने २८० व २८१ कलमांनुसार दर पाच वर्षांनी किंवा त्या अगोदरही वित्त आयोगाची नेमणूक करण्याचा अधिकार राष्ट्रपतीला दिलेला आहे. घटनात्मक तरतुदीनुसार, परंतु बदलत्या गरजा व परिस्थितीच्या संदर्भात, केंद्र व राज्ये यांच्यांत करउत्पन्नाच्या वाटपासंबंधी शिफारशी करणे, सहायक अनुदानाची तत्त्वे ठरविणे, केंद्र व घटक राज्ये यांचे वित्तीय संबंध सुदृढ राहण्याच्या दृष्टीने शिफारशी करणे, सरकारला सल्ला व सूचना देणे ही वित्त आयोगाची विहित कार्ये होत. आतापर्यंत १९५१, १९५६, १९६०, १९६४, १९६९, १९७२, १९७७ व १९८२ या वर्षी अनुक्रमे आठ वित्त आयोगांची नेमणूक करण्यात आलेली आहे. वित्तीय संबंधात आवश्यक ती लवचीकता किंवा परिवर्तनशीलता आणण्याच्या दृष्टीने घटनेतील ही तरतूद वैशिष्ट्यपूर्ण व महत्त्वाची आहे.

घटनात्मक तरतुदींच्या संदर्भात केंद्र व घटकराज्यांच्या वित्तीय संबंधाची वैशिष्टये किंवा प्रमुख तत्त्वे पुढीलप्रमाणे नमूद करता येतील :

(१) उत्पन्न व खर्चाच्या बाबींची सविस्तर स्पष्ट विभागणी.

(२) कार्यक्षमता, पर्याप्तता व सुयोग्यता यांचा समन्वय.

(३) केंद्राला प्रबल करण्याची, राज्याराज्यांत एकसूत्रता आणण्याची व्यवस्था.

(४) केंद्र व राज्य यांच्यांतील वित्तीय संघर्ष टाळण्याकरिता संतुलक उपाययोजना. वित्त आयोगाची नियुक्ती.

(५) सामाजिक न्याय, आर्थिक समता प्रस्थापित करण्याची लोककल्याणकारी राज्याची भूमिका.

(६) राज्यांच्या वाढत्या जबाबदाऱ्या, परंतु उत्पन्नसाधनांची कमी उपलब्धता व कमी लवचीकता.

(७) करविषयक, राष्ट्रीय, आंतरराज्यीय व स्थानिक दृष्टिकोनांचा, अधिकारांचा समन्वय.

(८) स्थानिक स्वराज्य संस्थांना पुरेशी उत्पन्नसाधने उपलब्ध करून देण्याची तरतूद.

(९) उत्पन्न व खर्चावर आवश्यक ते नियंत्रण ठेवण्याची अंतर्गत यंत्रणा.

(१०) वित्त आयोगाव्यतिरिक्त नियोजन आणि योजनांतर्गत आर्थिक साहाय्यासंबंधीच्या समस्या नियोजन मंडळाकडून हाताळल्या जातात.

अनुक्रमणिका

(११) वित्त आयोग व नियोजन मंडळाच्या अखत्यारीत न येणाऱ्या काही आकस्मिक अडचणींना तोंड देता यावे म्हणून केंद्रसरकार राज्यांना खास अनुदाने आणि कर्जे देते.

नियोजनकालात भारतीय राज्यघटनेतील केंद्र-राज्य वित्तीय संबंधांविषयीच्या तरतुदी अमलात आल्यापासून, या विषयाबद्दल बरीच साधक-बाधक चर्चा होत आलेली आहे. या प्रश्नाची जाणीवही झालेली आहे. परंतु ठरलेली उद्दिष्टे साध्य करण्याच्या बाबतीत पुरेसे यश आलेले नाही. विशेषतः वित्त-आयोग, नियोजन मंडळ, केंद्रसरकार व इतर संस्था खूप प्रयत्न करीत असूनही, कार्यक्षम वाटप-पद्धतीवर आधारलेली आंतरराज्यीय समानता अजूनही प्रस्थापित करता आलेली नाही. भारतीय संघराज्यातील वित्तीय व्यवहाराचा व्याप प्रचंड असूनही मोठ्या प्रमाणावरील व्यवहारांचे फायदे उपलब्ध झालेले दिसत नाहीत. यासंबंधीची आकडेवारी बोलकी आहे. वस्तुस्थिती विदारक आहे. केंद्र व राज्यशासनांची अर्थसंकल्पीय जमा किंवा उत्पन्न सातत्याने वाढत असूनही जमाखर्चाची तोंडमिळवणी करणे अशक्य झालेले आहे. १९८१-८२ मध्ये जमेची एकूण रक्कम ८८०२० कोटी रुपये इतकी प्रचंड होती. १९७१ ते १९८१ या दशकात प्राप्ती चालू किंमतीच्या संदर्भात ४·५ पटीने वाढली तर अर्थसंकल्पीय तूट ४·४ पटीने वाढलेली दिसते. स्थिर किंमतीच्या स्वरूपात तर उत्पन्नवाढ फार कमी म्हणजे १·७ पटीची होती. वर्षानुवर्षे एकूण तुटीचे प्रमाण वाढत आहे. विशेष हा, की संकल्पित तुटीपेक्षाही प्रत्यक्षातील तूट जास्त आहे.

मागच्या दाराने होणारी तूट आणखी वेगळीच आहे. केंद्रसरकारची एकूण अंदाजपत्रकी तूट फेब्रुवारी ते एप्रिल १९८१-८२ ह्या तीनच महिन्यांत ५० टक्क्यांनी वाढली. रिझर्व्ह बँकेकडे ठेवलेल्या केंद्राच्या मुदतीच्या कर्जरोख्यांतील रक्कम (म्हणजेच तूट) १९७८-७९ ते १९८०-८१ या काळात ४२ पटींनी म्हणजे २९ कोटी ते १२२९ कोटी रुपयांपर्यंत वाढली. अर्थसंकल्पीय तूट, प्रत्यक्ष तूट व इतर मागच्या दाराने अनधिकृत रीत्या केली जाणारी तूट यांच्यातील अप्रमाणबद्ध वाढीमुळे केंद्रीय वित्त व्यवहारास असंतुलन निर्माण झालेले दिसते. घटकराज्यांची परिस्थिती यापेक्षा वेगळी नाही हे, वाढती जादा उचल व वाढती तूट यांवरून स्पष्ट होते. मार्च १९८१ ते ऑक्टोबर १९८१ या अल्पकालातच राज्यांनी रिझर्व्ह बँकेकडून घेतलेली अनधिकृत जादा उचल (प्रकर्षित सवलतीची रक्कम) स्थूल मानाने २७७ ते ७३७ कोटी रुपये इतकी वाढली. विशेष म्हणजे प्रगत व अधिक उत्पन्नाच्या राज्यांनीही या सवलतीचा फायदा उपटलेला दिसतो. १९७९-८० व १९८१-८२ या दरम्यान राज्यांची संकलित तूट १८७ कोटी रुपयांवरून ३२४ कोटींवर गेली. केंद्र व घटकराज्यांच्या अर्थव्यवहारांतील तुटीला आंतरराष्ट्रीय नाणेनिधीच्या व कर्जासंबंधीच्या अटींमुळे आंतरराष्ट्रीय स्वरूप प्राप्त झालेले आहे. कारण निधीने सरकारला द्यावयाच्या बँक-कर्जावर कमाल मर्यादा घातलेली आहे. या भयावह वित्तीय तुटीची अनेक कारणे असली, तरी सार्वजनिक खर्चाची प्रचलित संरचना व त्यातील अलीकडचे बदल हे कारण उल्लेखनीय आहे. केंद्र व राज्य दोहोंच्या महसुली खात्यांतील विकासेतर खर्चाचे प्रमाण विकासखर्चापेक्षा वेगाने वाढत आहे. केंद्राचा विकासेतर खर्च राज्यांपेक्षाही जास्त आहे. ही घटना क्लेशदायक म्हटली पाहिजे. भांडवली खात्यात मात्र विकासखर्चाचे प्रमाण विकासेतर खर्चापेक्षा जास्त आढळते. परंतु राज्यांच्या विकासखर्चाचे प्रमाण केंद्रापेक्षा अधिक आहे.

वित्त-आयोग व नियोजन मंडळ यांच्या शिफारशींनुसार गेल्या ३० वर्षांच्या कालखंडात पहिल्या योजनेपासून ते सहाव्या योजनेपर्यंत सुमारे ९०३५८ कोटी इतक्या रकमेचे केंद्राकडून राज्यांकडे संक्रमण झाले. यापैकी केवळ १४ टक्के रक्कम वित्त आयोग व नियोजन मंडळाच्या कक्षेबाहेरील होती. चालू किंमतीच्या स्वरूपात ही रक्कम फार फुगलेली दिसत असली तरी स्थिर किंमती (मूल वर्षाच्या) गृहीत धरल्यास गेल्या दशकात ह्या संक्रमित रकमेचे प्रमाण अत्यल्प म्हणजे ५२ टक्केच पडते.

केंद्राकडून वर्ग करण्यात आलेल्या रकमांचे प्रमुख तीन प्रकार करता येतील : (१) वित्तमंडळाच्या शिफारशीनुसार वर्ग रकमा, (२) नियोजन मंडळाद्वारे वर्ग रकमा व (३) इतर रकमा. यांना अनुक्रमे वैधानिक संक्रमण, योजना-संक्रमण व अवैधानिक

किंवा ऐच्छिक संक्रमण अशा संज्ञा वापरता येतील. गेल्या पाच पंचवार्षिक योजनांमध्ये योजनासंक्रमणाचे महत्त्व घटत आहे; तर वैधानिक ( वित्त आयोग ) व त्याहीपेक्षा ऐच्छिक संक्रमणांचे महत्त्व वाढत आहे. योजना-संक्रमण व वैधानिक संक्रमण काही विशिष्ट तत्त्वावर आधारलेले आहे; परंतु ऐच्छिक संक्रमण कोणत्याही ठरलेल्या तत्त्वानुसार होत नाही. नियोजनकालात योजना-संक्रमणाच्या रकमेत १२ पटींनी, वैधानिक ( वित्त आयोग ) संक्रमणाच्या रकमेत ३१ पटींने, तर ऐच्छिक संक्रमणाच्या इतर रकमेत ( कलम २८२ अन्वये ) ३९ पटींनी वाढ झालेली दिसते. म्हणूनच ऐच्छिक संक्रमण अन्याय्य असल्याची राज्यांकडून ओरड केली जाते.

## वित्तआयोग आणि नियोजनमंडळ

वित्त-आयोगाद्वारे राज्यांना वर्ग होणाऱ्या वित्तीय वाटपधोरणावर सर्वत्र चर्चा होते. मात्र नियोजनमंडळाद्वारे दिल्या जाणाऱ्या आर्थिक साहाय्याविषयी फारशी चर्चा होत नाही, विशेष लक्ष दिले जात नाही. परंतु वित्त-आयोग आणि नियोजनमंडळ यांच्या कामाचे स्वरूप बरेचसे समान व जवळिकीचे आहे, हे लक्षात घ्यायला हवे. राज्यांचा योजनाबाह्य खर्च प्रत्येक योजनेत वाढत आहे. त्याकरिता वित्त-आयोगाला कर व अनुदानांचा राज्यांचा वाटा वाढवून देण्याची शिफारस करावी लागते. नियोजनमंडळाचे कार्यक्षेत्र वित्त-आयोगापेक्षा अधिक व्यापक असते. वित्त-आयोगाची कक्षा संपते, तेथूनच नियोजनमंडळाची जबाबदारी सुरू होते. त्याला वित्त-आयोगाप्रमाणे केवळ चालू करपातळीनुसार उत्पन्नाचा विचार न करता, भावी काळात जादा कर-आकारणीमुळे जादा उत्पन्न कसे मिळेल, याचाही विचार करावा लागतो. सार्वजनिक सेवा, यंत्रणा, त्यांची कार्यक्षमता, उत्पन्नवाढ, यांशिवाय सार्वजनिक अंतर्गत व परकीय कर्जे, भांडवली उत्पन्न, तुटीचा अर्थभरणा इत्यादी बाबी केवळ नियोजनमंडळाच्या कक्षेत येतात. वित्तआयोगापेक्षा नियोजनमंडळाची कार्यपद्धती वेगळी असते. राज्य व केंद्र सरकारांच्या निवेदनांचा विचार केल्यावर वित्त-आयोग ज्या शिफारशी करतो, त्या एखाद्या निवाड्यासारख्या स्वीकारल्या जातात, तर नियोजन मंडळ, केंद्र व राज्ये यांमध्ये चर्चा होऊन नंतर सर्वसंमत नियोजनविषयक निर्णय घेतले जातात.

त्यानुसार विविध क्षेत्रांतील उद्दिष्टे सुसंगत कशी राहतील याकडे नियोजनमंडळाला विशेष लक्ष पुरवावे लागते. केंद्र व राज्ये यांच्यांतील अधिकाराच्या घटनात्मक तरतुदीनुसार, त्यांच्यांत क्षेत्रनिहाय खर्चाची विभागणी करण्यात येते. वित्त-आयोग काही कसोट्या ठरवून शिफारशी करतो; परंतु त्यांच्या अमलबजावणीचे परीक्षण नियोजनमंडळाला करावे लागते. योजनाखर्चासाठी आर्थिक साहाय्याचे राज्याराज्यांत वाटप करताना योजनेची उद्दिष्टे साध्य होतील, याकडे लक्ष द्यावे लागते. साधनसामग्री, दूरदृष्टीचा अभाव व अन्य कारणांमुळे पुष्कळदा राज्यसरकारे काही राष्ट्रीय महत्त्वाचे कार्यक्रम राबविण्यात पुढाकार घेत नाहीत. त्यासाठी केंद्राकडून साहाय्य देऊन त्यांना ही कामे करण्यास उद्युक्त करावे लागले. उदा. – लोकसंख्यानियोजन, अल्पभूधारक विकासयंत्रणा, भूधारक व शेत मजूर संस्था, भूमिहीनांचे पुनर्वसन, पूर्ण रोजगाराकरिता विभागीय नियोजन इत्यादी. सहाव्या योजनेतील सुधारित किमानगरजा कार्यक्रम, गटपातळीवरील नियोजन यांना अग्रक्रम देण्यात आला आहे. ह्या केंद्रपुरस्कृत कार्यावरील सर्व खर्च केंद्र करते, किंवा इतर घटक राज्यांबरोबर त्याची ५० : ५० टक्के अशा प्रकारे वाटणीही केली जाते. अर्थातच ह्या केंद्रपुरस्कृत योजनांवरील गत दशकातील खर्च वाढत आहे, असे दिसते.

केंद्राकडून राज्यांकडे वर्ग करण्यात येणाऱ्या वित्तीय साधनांचे संक्रमण विभाज्य कराचा वाटा, अनुदाने व कर्जे यांच्या द्वारे करण्यात येते. एकूण संक्रमणातील त्यांचे हिस्से, परस्परप्रमाण व महत्त्व कालौघात बदलत गेलेले आहे. तुलनात्मकदृष्ट्या करविभागणीचे महत्त्व वाढत आहे, तर अनुदाने व कर्जे यांचे महत्त्व कमी होत आहे. ही प्रवृत्ती इष्ट आहे. परंतु कर्जापेक्षा, अनुदानांच्या हिश्यापेक्षा कर्जाचा हिस्सा वृद्धिंगत होत आहे व त्याच्यावरील कर्जाच्या परतफेडीचा बोजा सातत्याने वाढत आहे, ही राज्यांच्या दृष्टीने अनिष्ट घटना आहे.









अनुक्रमणिका

तक्ता क्र. १

केंद्रीय संक्रमणातील उत्पन्नसाधनांचे हिस्से

(शेकडा प्रमाण)

| वर्ष | कराचा वाटा | अनुदाने | कर्जे |
|---|---|---|---|
| १९६०-६१ | २४ | ३१ | ४५ |
| १९६५-६६ | १९ | २४ | ५७ |
| १९७०-७१ | ३२ | २५ | ४३ |
| १९७५-७६ | ३७ | ३१ | ३२ |
| १९८१-८२ | ४१ | २७ | ३२ |

## केंद्र-राज्य तणाव :

## घटक राज्यांच्या वित्तीय समस्या

घटनात्मक तरतुदीनुसार केंद्र व राज्यांचे वित्त-व्यवहार चालू असले, तरी राज्यसरकारे त्यांविषयी वेळोवेळी तक्रारी, युक्तिवाद करीत आहेत. विशेषत: कर व अनुदाने यांसंबंधीची संवैधानिक तत्त्वे अभूतपूर्व टीकेचे विषय झालेली आहेत. राज्यांचे उत्पन्नमार्ग पुरेसे फलदायी नाहीत. त्यांना पुरेशी स्वायत्तता नाही, केंद्र त्यांच्या वित्तीय व्यवहारांत मोठ्या प्रमाणावर हस्तक्षेप करते. राज्यांना आर्थिक परावलंबीत्व स्वीकारावे लागते, त्यांच्या खर्चाच्या जबाबदाऱ्या वाढत आहेत. तूट भरून काढण्याकरिता त्याना वारंवार रिझर्व्ह बँकेकडून कर्जे व उचल करावी लागते; केंद्रशासन राज्यांचे उत्पन्न वाढवू शकणाऱ्या करांबद्दल उदासीन आहे, आपल्या अधिकाराचा राजकीय हेतूने ते वापर करते, केंद्रीय मदतीत अनिश्चितता आहे इत्यादी तक्रारी राज्यांकडून केल्या जातात. राज्यांच्या अखत्यारींतील बहुतेक कर अलवचीक स्वरूपाचे आहेत. उदा., जमीनमहसूल. अधिक फलदायी असे बहुतेक कर केंद्राच्या अखत्यारीत आहेत. उदा., उत्पादनकर, कंपनीउत्पन्नकर, आयकर, नफ्यावरील कर, प्राप्तिकरांवरील अधिकर इत्यादी.

प्राप्तिकराची प्रत्यक्ष आकारणी-वसुली कमी असल्याने वित्त-आयोगांनी शिफारशी करूनसुद्धा राज्यांना वाजवीपेक्षा कमी हिस्सा मिळतो. दिवसेंदिवस प्राप्तिकराची थकबाकी वाढत आहे. प्राप्तिकरापेक्षा त्यावरील अधिकराचे (केंद्रालाच मिळणारे) उत्पन्न लक्षणीयरीत्या वाढत आहे. गेल्या दशकात प्राप्तिकराचे उत्पन्न केवळ २०४ टक्क्यांनी वाढले तर अधिकराचे ७४३ टक्क्यांनी वाढले. अधिक उत्पन्न देणाऱ्या विभाज्य करांचे हिस्से कमी आहेत. जकाती किंवा अबकारी करांचे ४० टक्केच उत्पन्न राज्यांना वाटून दिले जाते. प्राप्तिकरासारख्या कमी फलदायी करांचे मात्र ८५ टक्के उत्पन्न विभाज्य आहे. अलीकडच्या सुधारणांप्रमाणे विक्रीकराच्या ऐवजी काही निवडक वस्तूंवरील जकातींचे संपूर्ण उत्पन्न राज्यांत वाटायचे आहे. परंतु अशा करांची आकारणीच केंद्राकडून केली जात नाही. करांव्यतिरिक्त इतर उत्पन्नसाधनांच्या बाबतींतही राज्यांची परिस्थिती शोचनीय आहे. सहाव्या योजनेच्या सुरुवातीला राज्यांनी खुल्या बाजारात उभारलेल्या कर्जांचे प्रमाण सुमारे ४० टक्क्यांनी (१९६१-६६ च्या मानाने) कमी झालेले दिसते. वास्तविक राज्यांना बेअरर बाँड्सच्या गुंतवणुकीतील हिस्सा मिळणे न्याय झाले असते. अलीकडच्या काळात, केंद्र व राज्ये यांच्यांत परस्पर अविश्वासाची भावना दृढमूल होत आहे. घटक-राज्ये आपल्या उत्पन्नसाधनांचा न्यून अंदाज करतात; तर गरजांचा अतिरिक्त अंदाज करतात, अशी केंद्राची तक्रार आहे. तर वित्त-आयोग आणि नियोजनमंडळ केंद्रीय हितसंबंधांचे पक्षपाती आहेत, असे राज्यांना वाटते.

राज्यांच्या ह्या युक्तिवादात बरेच तथ्य आहे. तुलनात्मक दृष्ट्या राज्यांपेक्षा केंद्राची आर्थिक व वित्तीय परिस्थिती अधिक चांगली आहे. यशस्वी आर्थिक नियोजन व विकास, राष्ट्रीय एकात्मता, कल्याणकारी राज्याचे वाढते क्षेत्र, सुसूत्रता इत्यादींकरिता वित्तीय बाबतींत केंद्राला प्रबल करणे आवश्यक आहे. घटक राज्यांनी राजकीय भावनेच्या आहारी जाऊन नवी उत्पन्नसाधने शोधली नाहीत, अधिक उत्पन्न देणाऱ्या कराचा व उत्पन्नसाधनांचा कार्यक्षमतेने वापर केलेला नाही, खर्च नियंत्रित केलेला नाही, रिझर्व्ह बँकेकडून अधिक उचल केली, इत्यादी युक्तिवाद केंद्राकडून केले जातात.

अनुक्रमणिका








## केंद्र–राज्य वित्तीय संबंध सुधारण्याच्या उपाययोजना

( आठव्या वित्त-आयोगापुढील आव्हान व अपेक्षा ).

केंद्र–राज्य वित्तीय संबंध सुधारण्याच्या दृष्टीने पुढील उपाययोजना दूरगामी महत्त्वाच्या ठरतील :

( १ ) घटकराज्यांच्या वित्तीय मदतीचा विचार त्यांच्या साधनसामग्रीच्या संदर्भात न करता केवळ गरजा लक्षात घेऊन केला जावा. कल्याणकारी राज्यांची उभारणी व महत्तम सामाजिक लाभ यांच्याशी तिची सांगड घातली जावी.

( २ ) श्रीमंत राज्यांकडून गरीब राज्यांकडे साधनांचे पुनर्वाटप करण्याकरिता एकच संस्थात्मक यंत्रणा उभारावी. राज्या-राज्यांतील असमतोल नष्ट करावा.

( ३ ) कर, अनुदाने व कर्जे यांच्या रकमा ठरविताना दरवर्षी किमतींतील बदल लक्षात घ्यावेत. राज्यांनी या रकमांचा व्यवहार्य व काटकसरीने उपयोग करावा.

( ४ ) राज्यसमितीच्या शिफारशींप्रमाणे सर्व घटकराज्यांनी उचित परंतु वाढत्या दराने शेती-उत्पन्न व संपत्तीवर कर बसवावेत. शिवाय अधिक उत्पन्न देणारे कर बसवावेत. प्रचलित करांची उत्पन्नक्षमता वाढवावी.

( ५ ) राजमन्नार-समितीच्या काही शिफारशींचा फेरविचार करावा.

( ६ ) वित्तीय बाबतीत केंद्र व घटकराज्ये यांना संपूर्ण समान अधिकार असले पाहिजेत, हा आग्रह सोडून द्यायला हवा. करांकडे उत्पन्नसाधनांबरोबरच आर्थिक विकासाला इष्ट ते वळण लावण्याचे अमोघ साधन या नव्या दृष्टिकोनातून पाहिले पाहिजे.

(७) श्री. यशवंतराव चव्हाण यांच्या अध्यक्षतेखाली नियुक्त केलेल्या आठव्या वित्त-आयोगाचे कार्य तारेवरची कसरत ठरणार आहे. वित्तीय मदतीची ठिगळे लावलेल्या बहुविध यंत्रणांमार्फत राज्यांच्या आर्थिक व्यवहारांतील केवळ तूट भरून काढण्याचा पूर्वीच्या वित्त-आयोगांचा दृष्टिकोन आता त्याज्य ठरविला पाहिजे. त्याऐवजी राज्याच्या निव्वळ वित्तीय गरजा लक्षात घ्यायला हव्यात. त्यासाठी मूलभूत पद्धतींत, यंत्रणेत बदल अपेक्षित आहे. प्रत्येक राज्यातील वाढता विकासदर, दरडोई खर्चाचे प्रमाण, उत्पन्नवृद्धीची सुप्त क्षमता, तिचा संपूर्ण वापर इत्यादींचा वस्तुनिष्ठ विचार करून राज्यांच्या तुटीचे प्रमाण निश्चित करायला हवे व त्या संदर्भात गरजू, अविकसित राज्यांना केंद्रीय मदत द्यायला हवी, हे आठव्या वित्त-आयोगापुढील आव्हान आहे.





अनुक्रमणिका








# सामाजिक अंतराय व मानसिक दुरावा

[ नवभारताच्या ह्या अंकासाठी, विद्यमान परिस्थितीच्या संदर्भात, प्रा. रा. ग. जाधव ह्यांनी प्रश्नावली तयार केली होती. ही प्रश्नावली खाली दिली आहे. विविध क्षेत्रांतील नामवंतांकडे ती पाठवून आम्ही ह्या प्रश्नावलीस त्यांचा प्रतिसाद, त्यांना सुचणारी उत्तरे मागविली होती. असा प्रतिसाद श्री. प्रभाकर पाध्ये व श्री. सय्यद नईमुद्दीन ह्या दोनच व्यक्तींकडून दिलेल्या मुदतीत मिळाला. त्यांनी ह्या प्रश्नांच्या अनुषंगाने लिहिलेली टिपणे प्रश्नावलीनंतर प्रसिद्ध केली आहेत. अन्य व्यक्तींच्या प्रतिक्रिया अद्याप अपेक्षित असून त्या जसजशा येतील, तसतशा प्रसिद्ध करण्याचा मनोदय आहे. –संपादक ]

विद्यमान परिस्थितीचे वा समस्यांचे एक वर्णन सामाजिक अंतराय, मानसिक दुरावा यांसारख्या काही कल्पनांनी करता येणे शक्य आहे. असे वर्णन करणे वस्तुस्थितिनिदर्शक ठरत असेल, तर या वस्तुस्थितीची व्यवस्थित ओळख करून घेणे इष्ट ठरेल. या दृष्टीने काही मुद्दे, काही प्रश्न सुचतात; ते पुढे देत आहे :

हिंदू, बौद्ध, मुस्लिम, शीख, ख्रिस्ती यांसारख्या धर्मनिष्ठा व्यक्तिगत आचारांत नसल्या, तरी सामूहिक, संघटन आणि कृती यांबाबतीत प्रभावी ठरताना दिसतात. सामाजिक अंतरायाचे क्षेत्र त्यामुळे अधिकच विस्तृत आणि सखोल केले जात आहेसे वाटते. संतचळवळीने धर्मप्रभावाच्या काळातही सामाजिक विषमता गृहीत धरून धार्मिक लोकशाही रुजवण्याचा प्रयत्न केला. ही सामाजिक विषमता धार्मिक निष्ठांना हाताशी धरून सामाजिक दुरावा वाढवताना दिसते.

लोकशाही शासनामुळे सामाजिक परिवर्तनाच्या चळवळींना आपल्या सामाजिक ध्येयवादांपासून व निष्ठांपासून दूर जाण्यास प्रवृत्त केले आहे, असे दिसते. राजकीय सत्तासंपादन आणि शासकीय संपर्क यांच्या प्रभावापलीकडे राहणाऱ्या सामाजिक-वैचारिक चळवळींना काही एक भवितव्य आहे किंवा काय ?

आधुनिक व्यक्तिवादी, इहलोकवादी आणि मानवतावादी मूल्यांची फसवी किंवा भ्रामक किंवा कोती समजूत ही कोत्या विभक्त निष्ठा आणि संकुचित अहंता यांची गरज तीव्र करीत आहेत किंवा काय ?

आधुनिक मूल्यविचारांना सतत जागृत आणि सचेतन राखण्याचे काम आमच्या सांस्कृतिक नेतृत्वाने पुरेशा निष्ठेने आणि समर्थपणे चालू ठेवले असे आपणास वाटते का ?

अतिसामान्यांच्या प्रभावाचा आणि नेतृत्वाचा कालखंड असे विद्यमान कालाचे स्वरूप झाले आहे का ?

स्वतंत्र भारतीय समाज ही अवस्था किंवा वस्तुस्थिती ऐन पंचविशीत आहे व तिचा संबंध विद्यमान समस्यांशी आहे, असे आपणास वाटते काय ? राष्ट्राच्या दृष्टीने ही अवस्था किंवा वस्तुस्थिती एक तात्पुरती अशी अवस्था (पासिंग फेज) म्हणणे बरोबर ठरेल काय ?

जात, वर्ग (आर्थिक दृष्टीने) आणि धर्म हे कल्याणकारी अर्थव्यवस्थेचे अंतिम आणि अन्यनिरपेक्ष असे निकष मानता येतील का ?

मानसिक दुरावा आणि सामाजिक अंतराय यांनी ग्रासलेल्या विद्यमान कालखंडात कलावाङ्मयाकडून कोणती अपेक्षा करणे योग्य ठरेल ?

प्राधान्याने प्राधिकारवादी (ऑथॉरिटॅरियन) असलेली भारतीय मनोरचना व आधुनिक लोकशाही-प्रणाली यांची कालदृष्ट्या उपयुक्त व कार्यक्षम ठरणारी, सांगड घालणारी विचारधारा इथे कधी निर्माण झाली काय ? विद्यमान परिस्थितीशी या परस्पर विसंगत मनोधर्मांचा कितपत संबंध आहे, असे आपणास वाटते ? भारतीय संविधान या दृष्टीने कितपत महत्त्वाचे आहे ?

अनुक्रमणिका

आपण एखाद्या विभूतीच्या किंवा युगपुरुषाच्या आगमनाची वाट पाहत आहोत किंवा तयार करत आहोत किंवा काय ?

* * *

**प्रतिसाद–**

१) **प्रभाकर पाध्ये**

२) **सय्यद नईमुद्दीन**

---

या टिपणाबद्दल एक गोष्ट प्रथमच स्पष्ट करायला हवी. राजकीय आणि सामाजिक प्रश्नांचे स्वरूपच असे असते, की तार्किक प्रश्नांप्रमाणे त्यांना निर्विवाद उत्तरे संभवत नाहीत. प्रत्येक प्रश्नाला दुसरी बाजू असते. कित्येक प्रश्नांना अनेक बाजू असतात. कोणती बाजू कोणत्या वेळी किती निर्णायक ठरेल हे त्या त्या वेळच्या परिस्थितीवर अवलंबून असते, आणि ही परिस्थिती व्यामिश्र असते. येथे मानवसमूहाबद्दल विधाने करावी लागतात आणि त्यांना अपवाद असतात.

प्रथम मला असे म्हणावेसे वाटते, की भारताला स्वातंत्र्य वेळेआधी मिळाले. ते आपण मिळविले किंवा ब्रिटिशांनी दिले असे म्हणण्यापेक्षा हिटलरमुळे मिळाले असे म्हणणे योग्य ठरेल. भारतीयांचा पुरेसा त्याग आणि पराक्रम यामुळे ते १५ ऑगस्ट १९४७ ला मिळाले असे म्हणता येणार नाही. यामुळे स्वातंत्र्य पेलण्यासाठी, गांधी-जयप्रकाशांसारख्या नेत्यांच्या आणि काँग्रेससारख्या (त्या वेळच्या काँग्रेससारख्या) संस्थेच्या मार्गदर्शनखाली जनतेचे जे बौद्धिक, भावनिक आणि नैतिक विकसन व्हायला हवे होते, ते होऊ शकले नाही. उलट, स्वातंत्र्याचा लाभ अपवादात्मक परिस्थितीत झाल्यामुळे जनतेच्या दृष्टीत एक विकृतीच शिरली. आणखी २५–३० वर्षे स्वातंत्र्य-संग्राम लांबला असता, तर त्यात काही विकृती शिरण्याचा संभव होता हे जरी मान्य केले, तरी जनतेचे विकसन अधिक व्यापक, विस्तृत व निरामय प्रमाणावर झाले असते आणि जनतेने या विकृतींवर विजय मिळविला असता, असे वाटते.

दुसरी दुर्दैवाची गोष्ट अशी की, स्वातंत्र्य मिळाल्यानंतर देशाला योग्य स्वरूपाचे नेतृत्व लाभले नाही. किंबहुना असे म्हणता येईल, की राष्ट्राला चुकीचे नेतृत्व मिळाले.

प्रथम म्हणजे स्वातंत्र्यानंतर सहा महिन्यांच्या आतच राष्ट्रपित्याची हत्या झाली. गांधींनी स्वतः सत्ता स्वीकारली नाही. त्यांनी कधी ती स्वीकारलीही नसती. सरकार चालविणाऱ्या नेत्यांवरचा त्यांचा प्रभाव कमी झालाच होता, तो आणखी कमी झाला असता. आणि तरी त्यांचे केवळ अस्तित्व राष्ट्राला उपकारक ठरले असते. त्यांनी जनतेला वेळोवेळी स्फूर्ती दिली असती, आणि सरकारच्या अपकृत्यांना स्वतः रोखले असते. त्यांच्या नुसत्या मतप्रदर्शनाची सरकारला गंभीर दखल घ्यावी लागली असती. गांधी गेल्यामुळे सरकारवर प्रभाव पाडणारी एक असामान्य शक्तीच गेली.

गांधीजींनंतर गांधीवाद्यांनी विनोबांना त्यांचे वारस मानले ही एक भयंकर चूक झाली. गांधीजींनी लोकशाहीला दिलेली दिव्य देणगी पेलण्याची ताकदच विनोबांत नव्हती. खरे म्हणजे विनोबांची ती प्रकृतीच नव्हती. मी राजकारण करीन, पण सत्ता स्वीकारणार नाही; मी वेळप्रसंगी सत्याग्रह करीन, पण त्याचे अहिंसा वगैरे पथ्य निकराने पाळीन; मी लोकसंग्रह करीन, पण तो सत्याग्रहासाठीच केवळ नव्हे तर विधायक कार्यासाठीही करीन– अशा निष्ठेने जगणाऱ्या यतींचा वर्ग निर्माण करणे विनोबांच्या प्रकृतीतच नव्हते. आणि यामुळे त्यांचा भूदानासारखा प्रतिभाशाली उपक्रमही फुकट गेला. लोकशाहीच्या कार्यावर गांधीवादी सत्याग्रहाचा अंकुश ठेवणे आणि भारतीय सरकारच्या कार्यक्रमास विकेंद्रीकरणाची विधायक दिशा दाखविणे हे गांधीवादी कार्य गांधींच्या या देशात होऊ शकले नाही, हा मोठा दैवदुर्विलास होता.

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर सव्वातीन वर्षांत सरदार पटेल गेले, हा दुर्दैवाचा आणखी एक फटका! आज असे निश्चयाने म्हणता येते, की सरदार पटेल हे नेहरूंहून किती तरी लायक असे राज्यकर्ते होते. नेहरू हे एक विचित्र व्यामिश्र मिश्रण होते. समाजवाद आणि सरंजामशाही, पाश्चात्त्य संस्कृतीचे आकर्षण आणि पाश्चात्त्यांबद्दल (विशेषतः अमेरिकेबद्दल) दुजाभाव, सुसंस्कृतता आणि क्रूर रानटी रशियन राजवटीबद्दल आकर्षण, वैयक्तिक स्वच्छपणा







अनुक्रमणिका

आणि आवडत्या अनुयायांच्या भ्रष्टाचाराबद्दल बेफिकीरपणा, स्वच्छ–संस्कारित जीवनाची आवड आणि कृष्णमेननसारख्या विकृत, अभद्र, गलिच्छ माणसावरची भक्ती– असे विचित्र विपरित मिश्रण त्यांच्यात होते. सरदार तसे स्वच्छ गृहस्थ होते. आपल्या पोटच्या पोराचे चाळे पाहिल्यावर त्यांनी त्याच्याशी असलेले संबंध साफ तोडून टाकले. तर नेहरूंनी इंदिरा गांधींचे अवास्तव कोडकौतुक केले, त्यांना काँग्रेसचे अध्यक्ष केले आणि अखेरच्या कालात चिनी फटक्याने ते विदीर्ण झाले नसते, तर इंदिराजींना त्यांनी कदाचित आपले वारसही केले असते.

पण अधिक महत्त्वाची गोष्ट म्हणजे सरदार पटेलांपाशी सत्तेचा सदुपयोग करण्याची जी ताकद होती, ती नेहरूंपाशी नव्हती. राज्यकर्ता म्हणून त्यांच्यापाशी जी दृष्टी आणि कर्तृत्व होते ते नेहरूंपाशी नव्हते. देशी संस्थानांचे (विशेषतः हैद्राबादचे) विलिनीकरण हे याचे बिनतोड उदाहरण आहे.

आज मागे वळून असे बिनदिक्कत म्हणता येते, की नेहरूंची बहुतेक धोरणे चुकली होती आणि देशापुढच्या आजच्या समस्या ही एका अर्थाने नेहरूंची देणगी आहे. नेहरूंचे परराष्ट्रीय धोरण चुकीचे होते हे १९६२ साली चीनने सप्रयोग सिद्ध केले. कम्युनिस्ट राष्ट्रांबद्दल (विशेषतः रशियाबद्दल) आपुलकी आणि पाश्चात्त्य राष्ट्रांबद्दल दुरावा हा त्यांच्या परराष्ट्रीय धोरणाचा स्थायीभाव होता, आणि म्हणून त्यांचा अलिप्ततावाद कधीच प्रामाणिक ठरला नाही. निदान त्याला अंतःकरणाची ओढ नव्हती. ती एक राजकीय क्लृप्ती होती. नेहरूंच्या कम्युनिस्ट पक्षपातीत्वामुळे १९५६ च्या हंगेरिअन-क्रांतीबाबत त्यांनी देशाला लाज आणणारे धोरण आखले. (त्या वेळी भारताची लाज जयप्रकाश नारायणांनी आपल्या तेजस्वी वक्तव्यांनी राखली.) खरे म्हणजे नेहरूंनी आपल्या अलिप्ततावादाचा पुरावा या प्रसंगी द्यायला हवा होता. नेहरू कम्युनिस्ट होते असे नाही, पण त्यांचा 'कम्युनिस्ट विरोधाबद्दलचा विरोध' जाज्वल्य होता.

नेहरूंची इतरही धोरणे अपेशीच ठरली. उदाहरणार्थ, निधर्मीपणा. नेहरू स्वतः निधर्मी (सेक्यूलर) होते; पण त्यांचे निधर्मी धोरण म्हणजे प्रत्येक धर्मास त्याच्या परंपरागत प्रतिगामित्वानुसार वागण्याची मुभा ! त्यातल्या त्यात 'हिंदू कोड' जारी करून त्यांनी हिंदूत थोडी सुधारणा केली. वस्तुतः त्यांनी समान नागरी कायदा जारी करून भारताच्या निधर्मी बाण्यास क्रियाशील रूप द्यावयास हवे होते. पण त्यांनी आपला 'निधर्मीपणा' असा अमलात आणला की, त्याने भारतात प्रतिगामी धार्मिकताच विशेष बळावली. त्यांची कन्या पक्की राजकारणी असल्यामुळे आणि कोणताही विधिनिषेध बाळगण्याची गरज तिला वाटत नसल्यामुळे तिने या धार्मिकतेचा उपयोग फक्त मतांची बँक उभारण्यासाठी केला. असम (आसाम) हे याचे ज्वलंत उदाहरण आहे.

खरे म्हणजे नेहरूंत अनेक विलोभनीय विशेष होते. त्यांची संस्कारितता, त्यांची ज्ञानप्रियता, त्यांची मानवता वगैरे गोष्टी प्रसिद्धच आहेत. आणि तरी त्यांनी आपल्या सहकाऱ्यांच्या आणि अनुयायांच्या भ्रष्टाचाराकडे कानाडोळा केला. जीपप्रकरणी त्यांनी कृष्णमेननना पाठीशी घातले, तसे पुढे प्रतापसिंग कैरोंना घातले. एकदा श्री. पु. य. देशपांडे यांनी एक लाखाच्या भ्रष्टाचाराचे प्रकरण लोकसभेत उभे केले तर, येथे अनेक महत्त्वाचे प्रश्न खोळंबले असताना असले क्षुल्लक प्रश्न कसले काढता, असा सवाल नेहरूंनी केला. या संदर्भात टी. टी. कृष्णामाचारी, के. डी. मालवीय वगैरे केंद्रीय मंत्र्यांची प्रकरणे कुप्रसिद्धच आहेत.

पण नेहरूंच्या राजवटीचा मुख्य दोष त्यांच्या आर्थिक धोरणात शोधावा लागेल. त्यांचे हे धोरण शुद्ध आर्थिक दृष्टीने आखलेले नव्हते. नेहरूंनी बेलगाम जलद उद्योगीकरणाचा जो पुरस्कार केला, त्याच्या मुळाशी औद्योगिक संस्कृतीबद्दलची चुकीची धारणा होती. उद्योगीकरणाने परंपरागत समाजाचा कायापालट होईल आणि जनतेच्या रूढीग्रस्त दृष्टीत क्रांतिकारक परिवर्तन होईल अशी त्यांची धारणा होती. म्हणून गांधींच्या या देशात शूमाकरच्या 'ॲप्रोप्रिएट टेक्नॉलॉजी'चा (सुयोग्य तंत्रयोजनेचा) अवलंब न करता त्यांनी अनियंत्रित जलद उद्योगीकरणाचे धोरण आखले. म्हणजे मुंबई-कलकत्त्यासारख्या शहरांतली केंद्रीभूत यंत्रव्यवस्था विकेंद्रित करण्याऐवजी, नवीन उद्योगधंदे यांसारख्या शहरांपासून दूर ठिकाणी योजायला हवेत असा आग्रह न

धरता, जिथे जसे उद्योगीकरण वाढेल तिथे तसे उद्योगीकरण वाढविण्यास परवानगी दिली. नवीन उद्योग काढणारांनी कारखान्यांच्या आसपास झाडे लावायला हवीत आणि कामगारांसाठी निवासस्थाने बांधायला हवीत, असा साधा आग्रहही त्यांनी धरला नाही. परिणामी एका टोकाला पंचतारांकित संस्कृती आणि दुसऱ्या टोकाला अवाढव्य झोपडपट्टी, आणि मध्ये तणावग्रस्त जीवन जगणारे असंख्य, यांचे दर्शन घडविणारी कलकत्ता-मुंबईसारखी औद्योगिक शहरे भारतात ठिकठिकाणी फोफावली. आपण आपल्या पत्रात ज्याला 'एलिएनेशन' म्हणता त्या परात्मतेच्या अनेक स्वरूपांचा उगम अशा औद्योगिक वास्तवात शोधता येईल. अशा परिस्थितीत 'सामाजिक परिवर्तन सामाजिक ध्येयवादापासून आणि निष्ठांपासून दूर जाणे' अपरिहार्यच ठरते. 'भ्रामक कोत्या समजुती आणि संकुचित अहंता' यांना ही परिस्थिती जन्म देणारच. 'आधुनिक मूल्यविचारां'ना या परिस्थितीत तसा अर्थ उरत नाही, कारण त्यांना योग्य ते 'सांस्कृतिक नेतृत्व' लाभतच नाही. सांस्कृतिक नेतृत्वाची जागा राजकीय नेतृत्व घेते आणि ते सत्तालोभी आणि भ्रष्ट असते. येथे नुसता 'अतिसामान्यांचा प्रभाव' नसतो, तर गुन्हेगारांचा प्रभाव असतो. 'कल्याणकारी राज्य' ही अशा परिस्थितीत नुसती घोषणा ठरते. या अशा व्यवस्थेमुळे सांस्कृतिक अधःपतन होते एवढेच नाही, तर संस्कृतीकडे पाहण्याचे चुकीचे दृष्टिकोन, 'पुरोगामित्वा'च्या नावाखाली, जन्माला येतात; आणि मग 'सामाजिक बांधीलकी' आणि 'कलात्मक बांधीलकी' यांचा घोटाळा होतो. एखादी 'विभूती' अगर 'युगपुरुष' आला तरी तो पराभूत होईल अशी ही परिस्थिती वाटते. या अर्थाने हा 'अतिसामान्यांचा काल' आहे असे म्हणता येईल.

भ्रष्टाचार हे या जीवनपद्धतीचे स्वाभाविक फळ आहे. भ्रष्टाचाराचा उगम केवळ भांडवलवाल्यांत आणि व्यापाऱ्यांत आहे असे नाही, तो भांडवलवाल्यांशी संगनमत करून सर्वसाधारण जनतेला लुटणाऱ्या कामगार-पुढाऱ्यांतही आहे. हा भ्रष्टाचार आणि गुन्हेगारी हातात हात घालून वावरतात. चैनबाजी, व्यसनबाजी ही याची नैसर्गिक अपत्ये आहेत. काळाबाजार, चोरटी आयात ही या आर्थिक व्यवस्थेची अपरिहार्य अंगे बनतात. अर्थात मग, उदात्त ध्येयाने जन्माला आलेली सहकारचळवळ विकृत होणारच.

भ्रष्टाचारी राजकारण हा या वस्तुस्थितीचा अपरिहार्य परिणाम आहे. आपले सारेच राजकारण आज या भ्रष्टाचाराने लडबडलेले दिसते. मग पंतप्रधानपदी वावरणारी व्यक्ती, केवळ स्वतःचे राष्ट्रीय-आंतरराष्ट्रीय माहात्म्य वाढविण्यासाठी कोटयवधी ( अक्षरशः कोटयवधी ) रुपयांची खैरात करताना दिसली, तर नवल ते काय ? इतकेच कशाला, तर ही व्यक्ती एका परकीय क्रूर हुकूमशाही राष्ट्राच्या प्रमुखाला एका भारतीय पक्षाला आवरण्याची, पत्र लिहून विनंती करते आणि देशाला त्याचे फारसे काही वाटत नाही ! आपल्या राजकीय अधःपतनाचा याहून मोठा पुरावा असू शकेल काय ?

सार्वत्रिक भ्रष्टाचार हा उद्योगीकरणाचा अपरिहार्य परिणाम असेलही. पण आपले उद्योगीकरण बेलगाम अनियंत्रित झाल्यामुळे या भ्रष्टाचाराचा भयंकर आविष्कार दृष्टीस पडतो. आजचे राजकारण, आजची राजकीय नीती हे याचे निर्विवाद उदाहरण आहे.

पण मला विशेष अस्वस्थ करणारी गोष्ट म्हणजे आपले वैचारिक, सांस्कृतिक अधःपतन. आपल्या शैक्षणिक क्षेत्रातले अधःपतन हे याचे विशेष व्यथित करणारे उदाहरण आहे. आपल्या अनेक शैक्षणिक संस्था हे राजकारणाचे अड्डे बनले आहेत. आपली अनेक विद्यापीठे भ्रष्टाचार, अंतःकलह आणि बहिष्कारादी विग्रह यांनी किडलेली आहेत. शिक्षणाचा दर्जा तर खाली गेलाच आहे. आपले सांस्कृतिक जीवनही निरामय नाही. गेल्या पंधरा–वीस वर्षांतील वाङ्मयाचा दर्जा खालावलेला दिसतो. 'सामाजिक बांधीलकी'च्या आणि पुरोगामीत्वाच्या नावाने जो धिंगाणा चालतो, तो विलक्षणच आहे. ( यांच्या आदर्श कम्युनिस्ट राष्ट्रांत माणसाचे आयुष्यमान खालावले आहे, खालावते आहे, ही ही एकच गोष्ट यांचा वैचारिक फुगा फोडण्यास समर्थ आहे. )

अनुक्रमणिका

कदाचित ही सारी संक्रमणकालाची लक्षणे असतील. त्या दृष्टीने दलितांतील आणि आदिवासींतील जागृती ही मोठी आशेची गोष्ट आहे. स्त्रियांच्या प्रश्नांना मिळणारे प्राधान्यही महत्त्वाचे आहे. पण या जागृतीला अद्याप विग्रहात्मक स्वरूप आहे; त्या मानाने विधायक स्वरूप कमी आहे. गांधींच्या या देशात विधायक कार्याचे महत्त्व कमी व्हावे ही दुर्दैवाची गोष्ट नव्हे काय ?

पण मानवी इतिहासाची किमया अशी आहे, की अगदी विपरीत परिस्थितीतही सज्जनतेचा आढळ होतो, आणि एखादा युगकर्ताही अवतरतो. काही ध्येयवादी व्यक्ती धडपडताना आजही भारतात दिसतात. त्यांचा प्रभाव वाढेल अशी आशा बाळगू या.

**—प्रभाकर पाध्ये**

* * *

विद्यमान परिस्थितीचे वा समस्यांचे वर्णन सामाजिक अंतराय आणि मानसिक दुरावा यांसारख्या काही संकल्पनांनी करता येणे शक्य असले, तरी एक गोष्ट आपण येथे लक्षात घेतली पाहिजे व ती ही, की विद्यमान समस्यांचे वर्णन करताना सामाजिक विचारक ज्या अनेक कल्पनांचा वा दृष्टिकोनांचा वापर करतात त्यांपैकी सामाजिक आणि मानसिक दुराव्याची कल्पना ही एक विचाराची दिशा असू शकते व तिला अनुसरून प्रचलित समस्यांचे विश्लेषण करून त्यांचा शोध घेतला जाऊ शकतो. पण ती एकमेव कल्पनाच फक्त त्या दृष्टीने उपयुक्त ठरेल असे सर्वार्थाने आपणास म्हणता यावयाचे नाही. भारतासारख्या परंपरावादी व रूढिप्रिय देशातील सामाजिक, राजकीय व आर्थिक परिस्थिती, औद्योगिक दृष्टीने प्रगत व सामाजिक आणि राजकीय दृष्टीने विकसित अशा देशांसारखी अजूनही आहे असे आपणास म्हणता यावयाचे नाही. पाश्चिमात्य देशांतील सामाजिक आणि राजकीय प्रक्रियांहून गैरपाश्चिमात्य देशांतील सामाजिक आणि राजकीय प्रक्रिया ( Non-western social and political process ) सर्वस्वी भिन्न प्रकारच्या आहेत, ही गोष्ट आधुनिक समाजशास्त्रज्ञ व राज्यशास्त्रज्ञांनी पुरेशी स्पष्ट केलेली आहे व गैरपाश्चिमात्य राजकीय प्रक्रियांवर प्रचंड प्रमाणात आज साहित्य उपलब्ध आहे. अशी वस्तुस्थिती असताना सामाजिक अंतराय आणि मानसिक दुराव्यासारख्या संकल्पना, ज्या प्रामुख्याने पाश्चिमात्य विचारकांनी वैचारिक विश्लेषणासाठी पाश्चिमात्य प्रगत औद्योगिक व्यवस्थांच्या ( systems ) संदर्भात वापरल्यात, त्या तशाच्या तशाच भारतासारख्या गैरपाश्चिमात्य राष्ट्रांतील राजकीय, सामाजिक व आर्थिक प्रक्रियांच्या संदर्भात लागू होणे किंवा करणे मुळातच पूर्णांशाने बरोबर ठरणारे नाही. तरी या संकल्पनेचा आधार घेऊन भारतीय विद्यमान परिस्थितीचे वस्तुस्थितिदर्शक आकलन करून घेण्याचा जर प्रयत्न कुणी करील, तर ते स्वागतार्हच मानले पाहिजे.

हिंदू, बौद्ध, मुस्लिम, ख्रिस्ती यांसारख्या अनेक धर्मियांचा भारत हा एक देश आहे. आपण म्हणता त्याप्रमाणे या धर्मांतील धर्मियांच्या धर्मनिष्ठा एखाद्या वेळी त्यांच्या व्यक्तिगत आचारात तेवढ्या तीव्र वा प्रभावी नसल्या, तरीही ज्या वेळी त्या त्या धर्मियांचा समूह म्हणून त्या निष्ठांना आवाहन केले जाते, त्या वेळी त्या अत्यंत प्रभावी व तीव्र स्वरूपात प्रकट होतात, हे खरे आहे. परिणामतः त्यातून नवा राजकीय समूहच निर्माण होतो, याचाही प्रत्यय भारताच्या फाळणीवरून आपणास आलेला आहेच. पाकिस्तानची धर्माच्या आधारावर मागणी करणारे व धर्माच्या आधारावर द्विराष्ट्रवादाचे ( " two–nations theory " ) प्रतिपादन करणारे जे बॅरिस्टर जीना, त्यांचे व्यक्तिगत आचरण किती प्रमाणात मुस्लिम धर्मातील तत्त्वांप्रमाणे होते ? अत्यंत आधुनिक व्यक्तिगत आचरणवादी बॅरिस्टर जीनांनी धर्माच्या नावावर सामूहिक संघटन व कृती करून मुस्लिम धर्मियांच्या धार्मिक निष्ठांना आवाहन करून आपली पाकिस्तानची मागणी पूर्ण केली. हा इतिहास फार जुना नाही. आपल्या संकुचित स्वार्थासाठी धार्मिक भावनांना आवाहन करून आपली वेगळिक इतर धर्मियांपासून दाखविल्याने सामाजिक अंतरायाचे क्षेत्र विस्तृत होत जाते, याबद्दल दुमत असण्याचे कारण नाही. आपण आपल्या सामाजिक अंतराय व मानसिक दुरावा यावर केलेल्या टाचणात म्हटले आहे की, " संतचळवळीने धर्मप्रभावाच्या काळातही सामाजिक








विषमता गृहीत धरून धार्मिक लोकशाही रुजवण्याचा प्रयत्न केला. ही सामाजिक विषमता धार्मिक निष्ठांना हाताशी धरून सामाजिक दुरावा वाढवताना दिसते." संतचळवळीने धार्मिक लोकशाही रुजवण्याचा खऱ्या अर्थाने प्रयत्न केला. सर्वात्मक चैतन्याचा साक्षात्कार हे ज्ञान संतांनाच झाले होते. म्हणून त्यांच्या चळवळीत सामाजिक ऐक्य साध्य होण्याचाच, सामाजिक दुरावा तर नव्हेच, अधिक संभव होता व ते कार्य अतिशय प्रामाणिकपणे संत आपापल्या परीने करीत होते. जनकल्याण ही संतांची स्वाभाविक प्रवृत्ती असल्याने संतचळवळ ही सामाजिक आणि मानसिक दुराव्यावर एक प्रभावी उपायच होता. सामाजिक विषमता हे सामाजिक दुराव्याचे कारण जरूर आहे. पण खऱ्या धर्मनिष्ठा सामाजिक दुरावा वाढवू शकत नाहीत. तसे करणाऱ्या धर्मनिष्ठा या खऱ्या धर्मनिष्ठा नाहीत, कारण खरी धर्मनिष्ठा ही सर्वात्मक प्रेमभावनेला नेहमी पोषक ठरणारीच असते.

लोकशाही शासनामुळे सामाजिक परिवर्तनाच्या चळवळींना आपल्या सामाजिक ध्येयवादापासून व निष्ठांपासून दूर जाण्यास प्रवृत्त केले आहे, हे पुष्कळ प्रमाणात खरे आहे असे वाटते. महाराष्ट्राच्या राजकीय आणि सामाजिक विचाराच्या वाटचालीतून हे फार स्पष्ट होते असे वाटते. महाराष्ट्रात महात्मा ज्योतिबा फुले यांच्या सत्यशोधक समाजाने सामाजिक परिवर्तनाच्या चळवळीची मूहूर्तमेढ केली. त्या चळवळीमागे एक सामाजिक ध्येयवाद होता. जातिनिरपेक्ष समाजाची प्रस्थापना, स्त्रीमुक्ती, स्त्री-शिक्षण, दलितोद्धार या सर्व ध्येयांनी ती चळवळ सुरू झाली; पण पुढे भिक्षुकशाहीवर टीका करून, प्रहार करून ती वृत्ती समाजातून संपुष्टात आणण्याच्या उद्देशाने सुरू झालेल्या सत्यशोधक चळवळीने ब्राह्मण-ब्राह्मणेतरवाद जो वाढीस लागला व महात्मा ज्योतिबांच्यानंतर ब्राह्मणेतरवादी चळवळीत त्या चळवळीचे जे अधःपतन झाले, ते याचे बोलके उदाहरण आहे. लोकशाहीशासनात आपला गट, आपली जात व जातीय निष्ठा कायम राखून राजकीय सौदेगिरी करून राजकीय स्वार्थ साध्य करण्याचा जो प्रयत्न होताना दिसतो, तो प्रयत्न सामाजिक परिवर्तनाच्या मार्गात फार मोठा अडथळा आणतो व सामाजिक परिवर्तनाची गती थोपवून धरतो. आपल्या भारतात सामाजिक मतभेद आहेत यात शंकाच नाही. समाजातील निरनिराळ्या जातींत व धर्मगटांत वेळोवेळी संघर्षही येथे घडतात. सत्तासंपादनाच्या लालसेमुळे ह्यांना येथे जोपासलेही जाते. स्वार्थी राजकारणी व्यक्ती आणि भ्रष्ट नोकरशाहीमुळे तर सामाजिक व मानसिक दुराव्याचे क्षेत्र अधिक विस्तृत होण्यास मदतच होत आहे. समर्पित भावनेने समाजसेवा करणाऱ्या समाजसेवकांबद्दल आवश्यक तेवढा आदरभाव स्वार्थी राजकारणी वा नोकरशहा दाखवीत नाहीत, हेही खरे आहे, पण त्याबरोबरच हेही खरे, की सध्याच्या लोकशाही स्वरूपाच्या आपल्या व्यवस्थेत ( system ) बुद्धिवादी वर्गातील लोक व समाजसेवेचे व्रत घेतलेले लोक आपले विचारस्वातंत्र्य व कृतिस्वातंत्र्य निर्भयपणे व्यक्तही करताना दिसतात. मदर टेरेसा, श्री. बाबा आमटे किंवा डॉ. शिवाजीराव पटवर्धन यांच्यासारख्या समाजसेवकाच्या कार्याचा आदर येथे शासन, समाज व सर्वच थरांतील लोक करताना दिसतात व त्यांच्या आश्रमांतून विभिन्न धर्मांच्या, जातींच्या व वर्गांच्या लोकांना आश्रय दिला जातो, हीदेखील वस्तुस्थिती आहेच. हे सर्व लोक राजकीय सत्तासंपादनाच्या पलीकडे गेलेले आहेत. त्यांच्या चळवळींना व कार्याला निश्चितच भवितव्य आहे व ते भवितव्य अतिशय उज्ज्वल आहे. वैचारिक वा सांस्कृतिक क्षेत्रांत मुल्कराज आनंद, निराद चौधरी, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, व्ही. व्ही. जॉन, बद्रुद्दिन तैय्यबजी, अरुण गांधी ही सर्व मंडळी सामाजिक समस्यांच्या बाबतीत सतर्क असणारी व समाजाला विशिष्ट वैचारिक दिशा देणारी म्हणूनच समाजात ओळखली जातात. आधुनिक व्यक्तिवादी, इहलोकवादी व मानवतावादी मूल्ये ही आपापल्या जागी अविवाद्य आहेत. पण त्यांबद्दलच्या कल्पना स्पष्ट असायला हव्यात. अन्यथा त्यातूनच कोत्या विभक्त निष्ठा आणि अत्यंत संकुचित प्रकारची अहंता निर्माण होणे स्वाभाविक आहे. भारतातील बहुसंख्य जनता अजूनही निरक्षर व दरिद्री असल्याने जोपर्यंत तिच्यातील हे दोष दूर होत नाहीत, तोपर्यंत खऱ्या अर्थाने तिच्याकडून व्यक्तिवादी, इहलोकवादी व मानवतावादी मूल्यांचे आचरण अपेक्षणे अयोग्य ठरेल.

अतिसामान्यांच्या नेतृत्वाचा कालखंड असे विद्यमान काळाचे स्वरूप कल्पणेदेखील वस्तुस्थितिदर्शक ठरणार नाही. केवळ निवडून येणाऱ्या व्यक्तीकडे बघून असे वाटणे स्वाभाविक आहे. पण असे सामान्य लोक निर्णयप्रक्रियेत किती प्रमाणात आपला वाटा घेतात याचे बारकाईने व चिकित्सक पद्धतीने अध्ययन केल्यास असे दिसते, की त्यांची निर्णयप्रक्रियेतील भूमिका जवळजवळ नगण्यच असते. निर्णय घेणारे खचित अतिसामान्य नाहीत. कारण प्रशासकीय अनुभव, वस्तुस्थितीचा अभ्यास या सर्व गोष्टी निर्णय घेताना महत्त्वाच्या ठरतात व तसा निर्णय घेणारे अतिसामान्य दर्जाचे लोक आहेत असे म्हणता यावयाचे नाही.

स्वतंत्र भारतीय समाज ही अवस्था अजून ऐन पंचविशीत आहे, हे खरे आहे. पण आपण म्हटल्याप्रमाणे ही एक तात्पुरती अवस्था आहे. त्यातूनच प्रयत्नपूर्वक योग्य दिशेने वाटचाल केल्यास आपल्या समोरच्या समस्यांची सोडवणूक करण्याइतकी पात्रता आपणांत निश्चितच आहे. ह्यासंबंधीचा निराशावादी दृष्टिकोन स्वीकारण्याची गरज मला तरी वाटत नाही. आपल्या कल्याणकारी योजनांचे मुख्य लक्ष्य समाजातील दुर्बल घटकांची उन्नती साध्य करण्यावर असायला हवे. दुर्बल घटकांची जात बघण्याचे कारण नाही. तो कोणत्याही जातीचा, पंथाचा असो; तो जर दुर्बल घटकात मोडणारा असेल तर त्याच्या उन्नतीचा मार्ग प्रशस्त करणारी कल्याणकारी योजना असावी. श्रीमती इंदिरा गांधींनी अंगिकारलेला विद्यमान वीस सूत्री कार्यक्रम हा, ह्या दृष्टीने टाकलेले एक महत्त्वाचे पाऊल आहे असे मला वाटते. वर्षानुवर्षे पददलित जीवन जगणाऱ्या माणसांच्या उन्नतीवर कल्याणकारी योजनांचा भर असायला हवा.

मानसिक दुरावा दूर करण्यात वाङ्मयाकडून महत्त्वाची भूमिका पार पाडली जाऊ शकते, यात संशय नाही. वाङ्मयाच्या अध्ययनाचा परिणाम जीवनात समतोल साध्य करण्याच्या दृष्टीने मोठा होत असतो, हे विसरून चालणार नाही. जीवनाच्या विविध अंगांना व्यापणारी साहित्याची व्याप्ती असते. निरनिराळे दृष्टिकोन साहित्याद्वारे व्यक्त होतात. ज्या साहित्यातून माणसाचे मन बनेल, त्याच्यात उदारमतवादी मूल्यांची पेरणी होऊ शकेल व त्याच्यात वैश्विक ऐक्याची भावना उत्पन्न होईल असे साहित्य समाजासमोर आले पाहिजे. ज्ञानेश्वरीचे पसायदान, नामदेव, एकनाथ, रामदास, तुकाराम, सुफी संप्रदायातील स्वभीचे साहित्य अशांसारखे वाङ्मय माणसामाणसांतील प्रेमभावना वाढीस लावण्याची प्रेरणा देते व असे साहित्य लोकांसमोर ठेवणे आवश्यकच आहे.

भारतीय मन हे पूर्णपणे प्राधिकारवादी मानणे योग्य नाही. एक जिवंत मन म्हणून कधी कधी प्राधिकारवादी प्रवृत्ती त्यातून व्यक्त होत असतील, कधीकधी सनातनी वृत्तीचे प्रदर्शनही ते मन करीत असेल; पण ते मन मुख्यत्वे उदारमनस्क आहे, ते सहिष्णुतावादी आहे. त्या मनाला चार्वाकवाददेखील जाणून घेण्याची आस्था आहे. ते आस्तिक व नास्तिकपंथीय दोघांनाही जवळ बाळगणारे आहे व त्यांतून योग्य ती निवड करणारे आहे व म्हणूनच ते लोकशाही मूल्यांशी जवळीक असणारे मन आहे. भारतात चार्वाकाची मुस्कटदाबी झाल्याचा पुरावा नाही. या मनाला अनुसरूनच येथे त्याच्याशी सुसंगत अशी लोकशाही राजकीय यंत्रणा स्वीकारण्यात आलेली आहे, ही येथील वस्तुस्थिती आहे. महाराष्ट्रातील आधुनिक संतांनी, उदाहरणार्थ राष्ट्रसंत तुकडोजी, पूज्य गाडगेमहाराज अशांसारख्यांनी लोकशिक्षकाच्या भूमिकेतून मानवी मूल्ये, मानवी प्रतिष्ठा व लोकशाहीविचार व आचार यांची शिकवण दिली आहे. तिचा दूरगामी परिणाम समाजावर होत असतोच. त्याला वेळ लागतो. येवढेच.

कोणताही अतिमानव (Superman) अवतार घेईल व आपल्या सर्व समस्या जादूची कांडी फिरवून दूर करेल असे मानणे केवळ चुकीचे आहे. तसा अतिमानव अवतार घेईल असे मानायचे कारणच काय? भारतात महात्मा गांधींसारखा मानव जन्माला आलाच होता ना? म. गांधी, अल्बर्ट श्वाईस्टर यांनी मानवाला व मानवतेला उंचावणारा संदेश दिलाच व प्रत्यक्षात आपले आचरणही मानवतेला उन्नत करणारेच ठेवले. ह्याच परंपरेतून तसेच गांधी किंवा तसेच महामानव जन्माला येतच असतात. ते बुद्धिपुरस्सर, जाणीवपूर्वक तयार करावे लागत नाहीत, हेही तेवढेच खरे आहे.

○ ○ ○


अनुक्रमणिका






## साभार पोच

* **संत एकनाथ दर्शन** (लेखसंग्रह) – संपा. हे. वि. इनामदार ; कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे ३० ; १९८३ ; पृ. ३६० ; कि. ५० रुपये.
* **पंचधारा** (तेलुगू साहित्य विशेषांक) – मराठी साहित्य परिषद, आंध्र प्रदेश, इसामिया बाजार, हैदराबाद ५०००२७ ; जाने.–मार्च ८३/एप्रिल–जून ८३ जोडअंक ; पृ. १२४ ; कि. १० रुपये.
* **धांडोळा** (संशोधन–लेखांचा संग्रह) – शे. दे. पसारकर ; महासारंग प्रकाशन, ९५१ अ, पश्चिम मंगळवार पेठ, सोलापूर ; १९८३ ; पृ. ८६; कि. १२ रुपये.
* **अरण्येर अधिकार** (कादंबरी) – महाश्वेतादेवी, मराठी अनुवाद-प्रभा श्रीनिवास ; श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८३; पृ. २६१; कि. ४५ रु.
* **गबाळ** (आत्मकथा) – दादासाहेब मल्हारी मोरे, श्रीविद्या प्रकाशन पुणे ३० ; १९८३ ; पृ. २०१; कि. ३५ रुपये.
* **मी परत येईन** (कथासंग्रह) – मा. कृ. पारधी ; श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३० ; १९८३ ; पृ. १३८ ; कि. ३० रुपये.
* **वाघ्यामुरळी** – अनिल अवचट; श्रीविद्याप्रकाशन, पुणे–३० (इंडियन इन्स्टिटयूट ऑफ एज्यूकेशन, पुणे २९ करिता); १९८३; पृ. ९४; कि. २५ रुपये.
* **सत्तांतर १९४७** (खंड २) – गोविंद तळवलकर, मौज प्रकाशन गृह, खटाववाडी, मुंबई ४००००४; १९८३ ; पृ. ३२२ ; कि. ६५ रुपये.
* **दिल्ली ते दिल्ली** – फ. मुं. शिंदे ; परिमल प्रकाशन, खडकेश्वर, औरंगाबाद ४३१००१ ; १९८३ ; पृ. ९६ ; कि. १५ रुपये.
* **देवदासी** – माधव कोंडविलकर; ग्लोरिया प्रकाशन, मु. पो. देवरुख– ४१५८०४ (ता. संगमेश्वर, जि. रत्नागिरी); १९८३; पृ. २५; कि. ४ रुपये.



हे मासिक श्री. ग. दीक्षित यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून मे. पुं. रेगे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.








